दादा भगवान प्ररूपित

# आप्तवाणी

## श्रेणी - 4

मूल गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

मराठी अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन** : +91 79 3500 2100



**प्रथम आवृत्ति** : 1000, नोव्हेंबर 2022

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 200 रुपए

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
Gujarat, India.
**फोन** : +91 79 3500 2142

**ISBN/eISBN :** 978-93-91375-22-5

**Printed in India**

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद





# दादा भगवान कोण?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवित आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

# आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञाना संबंधीत जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषायांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रूटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



## समर्पण

आधी, व्याधी आणि उपाधीच्या या कलियुगी त्रिविध तापात प्रचंडपणे तापत राहिलेल्या आणि एकमात्र आत्मसमाधी सुखासाठी तहानलेल्यांच्या परम तृप्तीसाठी प्रकट परमात्मा स्वरूपात स्थित वात्सल्यमूर्ती 'दादा भगवान' यांच्या जगत् कल्याण यज्ञात आहुती स्वरूप परम ऋणीय भावाने समर्पित.

## आप्त विज्ञापन

हे सूज्ञजन! हे तुझेच 'स्वरूप', आज मी तुझ्या करकमलात येत आहे! त्याचा परम विनय बाळग, जेणेकरून तू तुझ्याद्वारे तुझ्या 'स्व'च्याच परम विनयात राहून, केवळ स्व-सुखाने भरलेल्या, पराधीन नसलेल्या, अशा स्वतंत्र आप्ततेचा अनुभव घेशील.

हीच आहे सनातन आप्तता, अलौकिक पुरुषाच्या आप्तवाणीची.

हाच आहे सनातन धर्म, अलौकिक आप्ततेचा.

जय सच्चिदानंद

# संपादकीय

विश्व निमित्त-नैमित्तिक निरंतर प्रवर्तनशीलच आहे. मूळ अविनाशी द्रव्यांच्या संयोग-संबंधाचा हा विशेष परिणाम आहे.विशेष परिणामाचा विलय व्हावा आणि स्व-स्वभावात स्थित व्हावे अशी प्रत्येक जीवाची इच्छा असते. निमित्ताद्वारेच तो सुटू शकतो. आणि हे आत्यंतिक मुक्ती देणारे एकमेव निमित्त आत्मानुभवी प्रकट 'ज्ञानी पुरुष' आहेत. त्यांच्या संयोग संबंधाने मुक्तदशा निश्चितच अनुभवगम्य आहे, असा वर्तमान काळात अनेकांचा अनुभव आहे.

साधारणतः ज्याला ज्ञान म्हटले जाते, ते 'ज्ञानीं'च्या दृष्टीने बुद्धीचा आविर्भाव आहे. यथार्थ ज्ञान, आत्मज्ञान पारंपरिक ज्ञानापासून लाखो मैल दूर आहे. आत्मविज्ञान स्वरूपात आहे. ज्याने आत्मविज्ञान जाणून घेतले, तो जीवनमुक्त झाला. असे हे ज्ञानी अनेकांना भेटले आणि त्यांना जीवनमुक्त दशा प्राप्त झाली. प्रत्येकाला ती लाभो, हीच अभिलाषा!

आत्मा निःशब्द आहे, अवाच्य आहे, तरी पण प्रकट परमात्म्याला स्पर्श करून प्रकट झालेले संज्ञासूचक शब्द हृदय भेदून, अनंत आवरणांना भेदून आत्म्याला 'केवल' पर्यंत प्रकाशमान करतात. अशा अनुपम वाणीला 'आप्तवाणी'मध्ये अंकित करून ज्ञानपिपासूंपर्यंत पोहोचविण्याचा अल्प प्रयत्न झाला आहे. तशी तर 'आप्तवाणी' परोक्ष रूपातच आहे, पण वर्तमानात विद्यमान ज्ञानी पुरुषांची आभा अवश्य हृदयभेदी बनून वाचकांसाठी सम्यक् दर्शनाचे दरवाजे उघडून देईल. त्यातून प्रकट होणारे दर्शन जीवनात हळूहळू अंगुलीनिर्देश करत करत 'केवल आत्मानुभूती'चे शिखर हे अंतिम ध्येय साध्य करूनच राहील.

आप्तवाणी श्रेणी-४ मध्ये जगाने पूर्वी कधी न जाणलेल्या, न कल्पिलेल्या गहन निराकरण करणाऱ्या उपायांना, साध्या-सरळ स्थानीय भाषेत परम पूज्य श्री दादा भगवानांच्या श्रीमुखातून वाहिलेल्या प्रत्यक्ष सरस्वतीला संकलित केले आहे.

साधारणपणे जग जिला जागृती म्हणते, तिला ज्ञानी निद्रा म्हणतात. ज्याला द्रष्टा मानतात तोच दृश्य आहे. 'मी जागृत आहे' असे भान

ज्याला वर्तत असते तोच अनात्म विभाग आहे. आत्मप्रदेश तर याहून अगदीच वेगळा आहे.

'रिलेटिव्ह' आणि 'रियल'मधील तादात्म्य इतके जास्त असते की नव्व्याण्णवपर्यंत दोन्ही समांतरपणे अस्सल, 'रियल'च्या प्रतिबिंब स्वरूपात भास्यमान 'रिलेटिव्ह' सामीप्यभावात तादात्म्य रूपाने प्रवर्तत असतात आणि अंतिम कडीद्वारे ते दोन्ही वेगळे होतात. त्याचे रहस्य अनुभवी 'ज्ञानी पुरुषां'द्वारेच प्रकाशमान होते. तेव्हाच भ्रांतजागृती आणि आत्मजागृती यातील भव्य भेद अनुभवास येतो.

कितीतरी काळापासून प्रारब्ध आणि पुरुषार्थ यातील भेद स्पष्ट करण्यासाठी मंथन झाले आहे. अनुभवी ज्ञानी हा भेद सांगूनही गेले आहेत. परंतु परोक्ष ज्ञानाच्या प्रवर्तनात त्याची यथार्थ समज पूर्णपणे विच्छिन्न झाली आहे. साधारणपणे कर्तृत्वाच्या भानाला, त्यासाठीच्या प्रयत्नांना आणि त्यांच्या परिणामाला पुरुषार्थ मानले जाते. 'ज्ञानीं'च्या दृष्टीने ते संपूर्ण प्रारब्ध आहे. पाच इंद्रियांनी, मनाने, जे काही प्रवर्तन होते, ते सर्व प्रारब्धाधीन आहे. पुरुषार्थ विभाग सूक्ष्म आहे, जो कळणे कठीण आहे. जीवमात्रांकडून भ्रांत पुरुषार्थ होतच असतो. त्याच्या आधारे जीवाच्या कारण-कार्याचे कालचक्र अविरतपणे गतिमान राहते. यथार्थ पुरुषार्थ प्रकट झाल्यावर ते विराम पावते. यथार्थ पुरुषार्थ, पुरुष झाल्यावरच होऊ शकतो. यथार्थ पुरुषार्थ अखंड, अविरत आणि निरालंब आहे, ज्याच्या जागृतीमुळे निरंतर मुक्त दशा प्राप्त होते.

विश्वात वस्तूंची कमी नाही, पण त्यांची प्राप्ती होत नाही. कारण स्वत:च टाकलेले अंतराय त्यांना अडवून धरतात. या अंतरायांचे रहस्य तसेच त्यापासून जागृत राहण्याच्या सर्व गुप्त चाव्या प्रकट 'ज्ञानी पुरुषांनी' सरळ आणि सहजरूपात स्पष्ट केल्या आहेत.

कर्म काय आहे? कर्मबंधन कशामुळे होते? कर्माची माता कोण? पिता कोण? इत्यादी पडणाऱ्या अनेक गुह्य प्रश्नांचे निराकरण होणे अतिशय कठीण आहे. शास्त्रे सर्व सांगतात, पण ते अंगुलीनिर्देशासारखे आहे. दृष्टीत फरक झाल्यामुळे उत्तर दिशेचा निर्देश दक्षिणेचा मानून

चालत राहतात. मग दिल्ली कशी येणार? आणि अंतिम स्पष्टीकरण देण्यास तर शास्त्रे सुद्धा असमर्थ आहेत. तिथे तर 'ज्ञानी पुरुषां'चेच काम आहे. कर्मासारख्या अति अति गुह्य विषयाचे ज्ञान परम पूज्य दादाश्रींनी सहज हसत खेळत समजावून दिले आहे.

वाणी 'टेपरेकॉर्ड' आहे असे सर्वप्रथम सांगून वाणी बद्दलची सर्व तन्मयता परम पूज्य 'दादाश्रीं'नी फ्रॅक्चर करून टाकली आहे. ही रेकॉर्ड कशी वाजते? रेकॉर्ड तयार कशी होते? तिचे काय काय परिणाम होतात? वगैरे सर्व सूक्ष्मातिसूक्ष्म रहस्ये पू. दादाश्रींनी उलगडली आणि वाणीचे गुह्य विज्ञान सामान्य माणसांना सुद्धा समजावून दिले आहे.

अशा अनेक विषयांची रहस्ये उलगडली आहेत. शक्य तेवढी प्रकाशित करण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. आशा आहे की, पॉजिटिव्ह जीवनलक्षी विचारक, तत्वचिंतक, जिज्ञासू तसेच मुमुक्षूंना 'आप्तवाणी' क्षणाक्षणाची जागृती देणारी सिद्ध होईल.

प्रस्तुत ग्रंथात आढळणाऱ्या उणीवा, फक्त 'ज्ञानी पुरुषां'च्या श्रीमुखातून वाहिलेल्या प्रत्यक्ष सरस्वतीला परोक्षरूपात परिणमित करताना उद्भवलेल्या संकलनेच्याच त्रुटी आहेत, त्याबद्दल हृदयपूर्वक क्षमा प्रार्थना.

– **डॉ. नीरूबहन अमीन यांचे जय सच्चिदानंद**

# उपोद्‌घात

## [ 1 ] जागृती

'स्वत:' आत्मा आहे, संपूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशमान करण्याचे सामर्थ्य आहे, 'स्वत:' अनंत शक्तीचा स्वामी आहे, तरी पण ही सर्व लाचारी, वेदना, दु:ख, असहायता अनुभवतो. हे किती मोठे आश्चर्य आहे! याचे कारण काय? स्वत:च्या स्वरूपाचे, स्वत:च्या शक्तीचे, स्वत:च्या सत्तेचेच 'स्वत:ला' भान नाही. एकदा 'स्वत:' जागृत झाला की संपूर्ण ब्रह्मांडाच्या स्वामीसारखे सुख अनुभवेल.

सारे जग भावनिद्रेत अडकले आहे. या लोकाच्या आणि परलोकाच्या हिताहिताचा बेशुद्धपणा, क्रोध-मान-माया-लोभ, मतभेद, चिंता, इत्यादि सर्व भावनिद्रेमुळे टिकून राहिले आहे. जग पौद्‌गलिक जागृतीमध्येच पूर्णपणे रममाण आहे. याउलट ज्ञानी तर आत्मिक जागृतीत, केवळ आत्म्यातच रममाण असतात. संपूर्ण जागृती हे केवलज्ञान आहे. जागृती 100 टक्के झाली की केवलज्ञान प्रकट होते.

जागृतीच मोक्षाची जननी आहे. संसार-जागृती वाढली की संसार असार वाटू लागतो, आणि शेवटी त्याचा परिणाम उत्कृष्ट वैराग्यात होतो. आणि इंद्रियज्ञान जागृतीत पराकाष्ठेवर पोहोचलेला मग कधीही मतभेदात पडत नाही, 'एव्हरीव्हेर ॲडजस्टेबल' असतो. अजागृतीमध्येच क्रोध-मान-माया-लोभ निर्माण होतात. ज्याला कषाय झाले हे लक्षातही येत नाही त्याला महा-अजागृत, लक्षात येते त्याला कमी अजागृत आणि जो कषाय झाल्यावर प्रतिक्रमण करून धुऊन टाकतो त्याला जागृत म्हणतात. आणि खरा जागृत तर कषाय होण्याआधीच त्याचे शमन करतो. कषायांचे पोषण करतो त्याला भयंकर अजागृत म्हणतात.

स्वत:चे दोष दिसणे ही जागृतीची निशाणी आहे. दुसऱ्यांचे दोष दिसणे हे जागृतीवर भयंकर आवरण आणणारे आहे. ज्ञानी जागृतीच्या 'टॉप' वर (शिखरावर) विराजमान असतात. ज्ञानी, स्वत:च्या सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम चुका, की ज्या इतरांना अजिबात बाधक नसतात त्या ज्ञानात पाहून धुऊन टाकतात, स्वत: निर्दोष होऊन सर्व जगाला निर्दोष पाहतात, याला जागृतीची

अंतिम दशा म्हणतात. सर्वोच्च जागृती म्हणजे कोणाबरोबर संभाषण करताना समोरची व्यक्ती खरोखर तर शुद्धात्माच आहे, असे लक्ष्य असणे, ही.

क्रमिक मार्गात भावजागृतीला सर्वोत्तम समजली जाते, याउलट अक्रम मार्गात भाव-अभाव याच्याही पलीकडील स्वभाव जागृती, 'ज्ञानी' कृपेमुळे सहजच उत्पन्न होते. ज्ञाता-ज्ञेय रूपात संपूर्ण ज्ञान निरंतर हजर राहते, त्याला संपूर्ण जागृती म्हटले जाते. 'ज्ञानी पुरुषा'च्या आज्ञेत निरंतर राहणे याला उच्च जागृती म्हटले जाते. जीवमात्रांच्या आतील शुद्धात्म दर्शनाचा उपयोग राहत असेल, तर ती देखील उच्च जागृती म्हटली जाते.

प्रथम व्यवहार जागृती उत्पन्न होते. त्यानंतर व्यवहारात निद्रिस्त आणि अध्यात्मात जागृत अशी जागृती उत्पन्न होते. व्यवहार जागृतीत आला असे कधी म्हटले जाते? तर कधी संघर्ष होत नाही, मतभेद होत नाहीत. व्यवहार जागृतीत कषाय खूप असतात, तर निश्चय जागृतीत कषाय निर्मूल झालेले असतात! अंत:करणाच्या प्रत्येक क्रियेत जागृत असणे, तीच खरी जागृती.

जागृतीच्या सुरुवातीला स्वत:मुळे कधीही कोणी दु:खी होत नाही, नंतर दुसऱ्यांमुळे स्वत:ही कधी दु:खी होत नाही, आणि अंतिम जागृतीत तर सहज समाधी अवस्था असते.

कुंडलिनी जागृती किंवा 'मेडिटेशन' ह्या जागृती वाढविणाऱ्या नाहीत तर अहंकार वाढविणाऱ्या आहेत. 'मेडिटेशन' ही एक प्रकारची मादकताच आहे. दु:खाच्या काळात जागृती विकसित होणे संभव आहे, याउलट मेडिटेशनची मादकता जागृतीवर पाणी फिरवते.

स्वत:च्या स्वरूपाच्या जागृतीत आल्यानंतर, थेट केवलज्ञानापर्यंतच्या जागृतीत आलेल्या जागृत पुरुषांच्या भक्तीमुळे, त्या दशेपर्यंतची जागृती प्रकट होऊ शकते! पूर्णपणे जागृत, आत्यंतिक कल्याणाचे परम निमित्त, असे वीतराग तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी, जे सध्या महाविदेह क्षेत्रात विद्यमान आहेत, त्यांच्याशी ज्ञानी कृपेने अनुसंधान साधून, निरंतर त्यांची भक्ती केल्यामुळे, त्यांच्या चरणकमळात स्थान मिळविणे शक्य आहे, आणि त्यामुळे मोक्ष शक्य आहे.

भौतिकमध्ये जग जागे असते, तर ज्ञानी तिथे झोपलेले असतात आणि अध्यात्मात जग झोपते, तिथे ज्ञानी जागे असतात! सांसारिक जागृती अहंकारासहित असते, तर निर्‌अहंकारी जागृती तिथे मुक्ती असते!

## [ 2 ] ध्यान

ध्यान काय आहे? ध्यान ही करायची गोष्ट नाही. ध्यान तर सहजच उत्पन्न होत असते. ध्यान हा परिणाम आहे. जग ज्याला ध्यान म्हणते ते ध्यान, ध्यान नाही तर एकाग्रता आहे.

वीतरागींनी ध्यानाचे चार प्रकार सांगितले आहेत. कोणी शिवी दिली तर आत उलटा परिणाम होतो, रौद्र परिणाम उत्पन्न होतो, त्याला रौद्रध्यान म्हटले आहे, आणि या परिणामाचा प्रभाव स्वत:वर तसेच समोरच्यावर देखील पडतो! परंतु जर हा प्रभाव स्वत:पुरताच सीमित राहिला, इतरांना त्यामुळे अजिबात त्रास झाला नाही, तर ते आर्तध्यान. माझे काय होईल? भविष्याची चिंता, अशा गोष्टी आर्तध्यानात मोडतात. प्रभाव टाकणाऱ्या प्रसंगात, हा तर माझ्याच कर्मांचा उदय आहे, समोरचा निमित्त आहे, निर्दोष आहे, असा परिणाम झाला तर ते धर्मध्यान आहे. स्वत:चे स्वरूप 'शुद्धात्मा' आहे, असे निरंतर लक्षात राहते, समोरच्यात देखील शुद्धात्म्याचे दर्शन होत राहते, ते शुक्लध्यान.

जेव्हा ध्येय निश्चित होते, स्वत: ध्याता होतो, आणि दोन्हींचे अनुसंधान होते, तेव्हा ध्यान सहज उत्पन्न होते. ध्येय निश्चित होण्यात अहंकाराचे अस्तित्व आहे, ध्यानात नाही. क्रियेत अहंकार असतो, ध्यानात नाही. क्रिया हे ध्यान नाही पण क्रियेमुळे जो परिणाम उत्पन्न होतो, तो ध्यान आहे, आणि त्यात अहंकार नसतो. ध्यान केले जात नाही, होऊन जाते. आर्तध्यान आणि रौद्रध्यान होऊन जातात. ती कोणी करत नाहीत. धर्मध्यान आणि शुक्लध्यान सुद्धा सहज होत असतात. जर आर्तध्यान झाल्यावर 'मी आर्तध्यान करतो' अशी मान्यता झाली तर तो अहंकार आहे. आर्त, रौद्र आणि धर्मध्यानात ध्याता अहंकार आहे. शुक्लध्यानात अहंकार ध्याता नाही, ती तर स्वाभाविक परिणती आहे. शुक्लध्यान ही आत्मपरिणती आहे.

आत्मध्यानाशिवाय दुसऱ्या कुठल्याही ध्यानाचे मोक्षासाठी महत्त्व नाही. आत्मध्यान निरंतर समाधीत ठेवते.

राग-द्वेष संपविण्यासाठी ध्यान करायचे नसते. वीतराग विज्ञान समजून घेतले तर राग-द्वेष संपतात.

## [ 3 ] प्रारब्ध-पुरुषार्थ

प्रारब्ध आणि पुरुषार्थ यामधील भेदरेषा समजल्याशिवाय 'स्वत: 'चे कर्तापण किंवा अकर्तापण किती आहे ते स्वत:ला कसे समजेल? संपूर्ण जग या न सुटणाऱ्या कोड्यात अडकले आहे. खऱ्या पुरुषार्थ धर्मात असलेल्या 'ज्ञानी पुरुषां'शिवाय हा भेद कोण सांगू शकेल? साऱ्या जगात, या काळात संपूज्यश्री दादाश्रींच्या वाणीद्वारे प्रारब्ध आणि पुरुषार्थ यामधील सूक्ष्मातिसूक्ष्म भेद, प्रथमच स्पष्ट झाले आहेत. आणि ते मुमुक्षुंना नवा मार्ग दाखवितात.

पाच इंद्रियांद्वारे जे जे होते, ते सर्व पुरुषार्थ नाही, तर प्रारब्ध आहे. दिवसभर धावाधाव करणे, नोकरी-धंदा करणे, श्वासोच्छवास करणे, पुस्तके वाचणे, शास्त्रांचा अभ्यास करणे, सामायिक करणे, जप-तप करणे हे सर्व प्रारब्धच आहे. भोजन केल्यावर पचन होते, त्यात आपला कसला पुरुषार्थ? आपल्या नकळत निसर्ग आपल्या आतील मशिनरी इतक्या सुंदर प्रकारे चालवतो, तर काय बाहेरचे सर्व चालवणार नाही? खरे तर तोच सर्व चालवितो. पण त्याबद्दलच्या अज्ञानामुळे 'मी करतो' असा अहंकार केल्याशिवाय राहत नाही.

नर्मदेच्या पाण्यात वाहणारे मोठे मोठे दगड एकमेकांवर आदळत-आपटत शेवटी शेवटी भाडभूजला येईपर्यंत शालिग्राम देव बनतात. त्यात कोणाचा काय पुरुषार्थ? आणि इतर दगड, दगडच राहून समुद्रात बुडतात, त्यात त्यांचा काय दोष? यात कोणाचे किती कर्तापण आहे? हे तर ज्याला जसा संयोग जुळून आला तसे घडले. समसरण मार्गात आदळत-आपटत जीवाला शेवटी हिंदुस्तानात जन्म मिळतो, आणि त्यातसुद्धा जर कधी समर्थ 'ज्ञानी पुरुषाची' भेट झाली आणि त्यांच्याकडून त्याला समकित प्राप्त झाले, तर तो शालिग्राम होतो! समकित झाल्यानंतरच तो 'पुरुष' होऊन

'रियल' पुरुषार्थात येतो, तोपर्यंत मात्र भ्रांत पुरुषार्थातच असतो. पुद्‌गल परिणतीमध्ये कुठेही राग-द्वेष होत नाहीत, तो आहे 'रियल' पुरुषार्थ.

अहंकाराच्या अस्तित्वामुळे कर्मबीजे पडतच राहतात, ज्याचा परिणाम म्हणून कडू किंवा गोड फळे मिळतातच. आता त्या उलट परिणामांना सुलट करणे हा भ्रांत पुरुषार्थ! संयोग जुळणे ते प्रारब्ध आणि त्यात समता राखणे, तो पुरुषार्थ. घसरून पाडणाऱ्या (पथभ्रष्ट करणाऱ्या) संयोगात स्थिर राहणे, हा पुरुषार्थ. आर्तध्यान-रौद्रध्यान यांचे धर्मध्यानात परिवर्तन करणे, हा पुरुषार्थ आहे.

'अक्रम ज्ञानीं'नी प्रारब्ध-पुरुषार्थाच्या गुंतागुंतीतून बाहेर काढून, 'कर्ता कोण आहे?' याची यथार्थ समज 'व्यवस्थित शक्ती'च्या नव्याच अभिगमाद्वारे उघड केली आहे. आणि त्यामुळे स्वरूपलक्षी केवलज्ञानापर्यंत पोहोचू शकतात. 'स्वत:'ला कर्तापणाचे भान वर्तत आहे तोपर्यंत 'व्यवस्थित'ची समज सोन्याच्या कट्यारीसारखी आहे! जिथे अहंकार तिथे 'स्वत:चे' कर्तापण, आणि जिथे निर्‌अहंकार तिथे 'व्यवस्थित'चे कर्तापण.

शुद्ध उपयोग हा रियल पुरुषार्थ आहे. कषायांवरच्या संयमाला पुरुषार्थ म्हणतात, आणि समता आणि ज्ञानातून उत्पन्न होतो तो स्वभाव. यम, नियम, संयम याला पुरुषार्थ म्हणतात. संयम आणि तप यात काय फरक आहे? संयमात तापायचे नसते पण तपात तापायचे असते, मनाला तापवायचे असते. ज्ञानींच्या आज्ञेत राहणे हा पुरुषार्थ आहे, तोच धर्म आहे.

प्रारब्धही मोठे नाही आणि पुरुषार्थही मोठा नाही, या दोन्हींना जो यथार्थपणे समजतो तो मोठा, असे ज्ञानी पुरुषांचे म्हणणे आहे.

अरबट-चरबट खाल्ले हे प्रारब्धकर्म आणि त्यामुळे पोटात मुरडा येतो ते प्रारब्ध कर्माचे फळ. अरबट-चरबट खाल्ले जाते ते गेल्या जन्मीच्या संचित कर्मामुळे! बोला आता, प्रारब्धकर्माचे हे फळ बदलायचे तरी कसे? हा बदल संचितकर्म होत असतानाच करणे शक्य आहे.

द्रव्य हे प्रारब्ध आहे आणि भाव हा पुरुषार्थ आहे. भ्रांत दशेत जीवमात्रांचा भाव-पुरुषार्थ चालूच असतो, आणि त्यानुसार पुढील जन्माची कर्मे बांधली जातात, परंतु स्वत:ला याचे भानच नसते!

## [ 4 ] श्रद्धा

अंधश्रद्धेला धुडकावून लावणाऱ्यांना माहीत नसते की ते स्वतःच किती मोठ्या अंधश्रद्धेत आहेत!!! कुठल्या श्रद्धेच्या आधारे ते पाणी पितात? त्यात विष नाही याची काय खात्री? खाण्यात पाल किंवा काही जीवजंतू पडलेला नाही याची काय खात्री? याचा तपास करतो का कोणी? मग हे सर्व तर अंधश्रद्धेवरच चालते ना? अंधश्रद्धेवाचून ज्यांचे एक पाऊलही पुढे पडत नाही, ते दुसऱ्यांच्या अंधश्रद्धेची निंदा कशी काय करू शकतात?

## [ 5 ] अभिप्राय

अभिप्रायाच्या आधारानेच दृष्टी निर्माण होते, आणि मग तसेच दिसत राहते. एखादी व्यक्ती आपल्या समोर येणे आपल्याला आवडत नसेल तर तो दृष्टीचा दोष नाही. पण तशी दृष्टी बनविणाऱ्या अभिप्रायामुळे अशी चूक होत असते.

'प्रेज्युडीसवाली' (पूर्वग्रहदूषित) दृष्टी संसार निर्माण करते. चोरी होत असताना स्वतःच्या डोळ्यांनी पाहून सुद्धा, ज्यांची दृष्टी चोराबद्दल किंचितही 'प्रेज्युडीस' नसते, ते ज्ञानी!! काल जो चोर होता, तो उद्या सावकार बनणार नाही कशावरून?

स्वादिष्ट आंब्याचा इंद्रियांनी स्वीकार केला तर त्याला काही हरकत नाही, पण नंतर त्याची आठवण येणे मात्र धोक्याचे आहे, कारण त्यामागे 'हा आंबा छान आहे' असा अभिप्राय झालेला असतो, आणि तो राग-द्वेषात परिणमित होत असतो.

एखाद्या वस्तूवर केंद्रित झालेला जबरदस्त अभिप्राय *अटकणमध्ये* (जे बंधनरूप होते, पुढे जाऊ देत नाही) परिणमित होतो तेव्हा त्याचा प्रभाव विखुरलेल्या अनेक अभिप्रायांपेक्षाही अधिक भयंकर असतो.

'विषय राग-द्वेषवाले नाहीत. अभिप्रायांची मान्यता हेच राग-द्वेष आहेत.' - दादाश्री.

'ज्ञानीं'चे हे कथन, विषयांना नष्ट करण्यासाठी केल्या जाणाऱ्या

अथक परिश्रमांना, ते गजस्नानवत् आहेत, असे म्हणून निरर्थक करते, आणि त्याचा रूटकॉज समान, 'विषयात सुख आहे', ह्या अभिप्रायाला नष्ट करण्यासाठी जागृत करते.

अभिप्राय तोडायचे आहेत असे ठरविल्यापासूनच ते तुटत जातात! अवगाढ अभिप्राय प्रतिक्रमणाद्वारे रोज दोन-दोन तास खणून काढले तर नष्ट होतात! ज्याला आत्मा प्राप्त झाला आहे, जो 'पुरुष' झाला आहे, तो कुठल्याही प्रकारचा पुरुषार्थ आणि पराक्रम करू शकतो.

जसा अभिप्राय तसे पुद्गल परिणमित होऊन मिळेल.

अभिप्रायांबद्दलचा अभिप्राय सूक्ष्मपणे राहून गेला असेल तर तो उपटून टाकणे गरजेचे आहे.

अभिप्राय बनतात कशामुळे? तर लोकसंज्ञेमुळेच. कारण लोकसंज्ञेमुळे स्वत:ची मान्यता तयार होते. मग बुद्धी त्यानुसार ठरवून व्यवहार करते. ज्ञानींच्या संज्ञेनुसार वागले की लोकसंज्ञेचा लोप होतो.

समोरच्या व्यक्तीबद्दल आलेला जरासाही चुकीचा विचार, त्याला स्पर्श करतो आणि मग उगवतो. अशावेळी 'शूट ऑन साईट' प्रतिक्रमण, त्या विचारांची स्पंदने त्याच्यापर्यंत पोहोचू देत नाही. किंवा पोहोचलेल्या स्पंदनाना पुसून टाकते. अभिप्राय तुटल्यावर त्या व्यक्तीबरोबर वाणी-वर्तन सहजपणे होते. त्याची जाणीव समोरच्या व्यक्तीला झाल्याशिवाय राहत नाही. याउलट दोषयुक्त अभिप्रायासहितच्या दृष्टीमुळे समोरच्या व्यक्तीवर परिणाम होतो. त्यामुळे त्याची उपस्थिती देखील नकोशी वाटते.

अभिप्राय बदलण्यासाठी प्रतिस्पर्धी अभिप्राय बनवावा लागतो. चोर आहे या अभिप्रायाला तोडण्यासाठी चोराला सावकार आहे, सावकार आहे असे म्हणावे लागते, आणि शेवटी खरोखर तर तो शुद्धात्मा आहे, अशी दृष्टी ठेवावी लागते!

अभिप्राय हे *तंतीली* (बोचणारी) वाणीचे कारण आहे, तर संशय हे अभिप्रायाचे कारण आहे.

'अभिप्राय बुद्धीच्या आशयाच्या आधीन आहे.' - दादाश्री.

बुद्धीने ज्यात सुख मानले त्या आधारे अभिप्राय बनतो. फ्रेंचकटमध्ये सुख मानले तर फ्रेंचकट चांगला असा अभिप्राय बनतो.

'स्वरूप ज्ञान' झाल्यानंतर अनंत समाधीला कोण अडवून धरते? तर अभिप्राय! दोन चार मोठे मोठे अभिप्राय नाहीसे झाले की मुक्तदशेचा अनुभव घेता येतो!!

क्रियेमुळे बीज पडत नाही, पण हेतूमुळे, अभिप्रायामुळे बीज पडते. स्वागतार्ह अभिप्राय कोणता असेल तर तो एक ब्रह्मचर्याचा आणि दुसरा हा देह धोका आहे याचा! अभिप्राय अहंकाराच्या परमाणूंनी बनलेला आहे. अभिप्राय व्यक्तित्व दर्शवितो, दृष्टीच बदलून टाकतो. मृत अभिप्रायाला हरकत नाही पण आग्रहयुक्त अभिप्राय ज्ञानावर आवरण आणतो.

अचेतनाचे अभिप्राय आपण सोडले की लगेच सुटतात पण मिश्रचेतनाबरोबर बांधले गेलेले अभिप्राय आपण सोडले तरी ते आपल्याला सोडत नाहीत! ज्यांची तोंडे वाकडी होतात अशा मिश्रचेतनासाठी अभिप्राय बांधल्याने नंतर त्याचा खूप त्रास होतो.

अभिप्रायामुळे अंतरायांना आमंत्रण दिले जाते. अभिप्रायाच्या अंतरायांची जोखीम फार मोठी असते, जिथून सुटायचे आहे तिथेच जास्त बांधला जातो.

प्रतिष्ठित आत्म्याचा अभिप्राय उत्पन्न झाला की मग त्यानुसार हा पुतळा (देह) चालेल. यात 'शुद्धात्मा' केवळ 'उदासीन भावाने' उपस्थित राहतो!

## [ 6 ] कौशल्याचा आंधळेपणा

ज्याला संसारातील काहीच कळत नाही, तो ज्ञानी. इतरांना प्रबुद्ध (बुद्धिवान) वाटणारे 'ज्ञानी' प्रत्यक्षात तर अबुधच असतात. ज्ञानी म्हणतात, वयाच्या सत्तरीत आम्हाला दाढी देखील करता येत नाही. स्वत:ला एक्सपर्ट समजणारे स्वत:ला आणि इतरांना फसवत असतात. कोणी एक्सपर्ट होऊच शकत नाही, ती तर निसर्गाची देणगी आहे. ज्ञानी तर आत्मविज्ञानाचे एक्सपर्ट असतात.

मनाच्या गरजा, चित्ताच्या गरजा, बुद्धीच्या, अहंकाराच्या सर्वांच्या गरजा स्वत: घेऊनच आलेला असल्यामुळे निसर्ग त्याला सर्व काही पुरवतो. त्यात स्वत:चा कसला आला आहे पुरुषार्थ? निसर्गच जर सगळ्या गोष्टींची पूर्तता करत असेल, तर स्वत: चित्त सहज राखले पाहिजे, तिथे उपयोग बिघडवता कामा नये. जीवनाचे हे सार तर काढावेच लागेल ना?

## [ 7 ] अंतराय

'मी चंदुभाई आहे' म्हटले की पडला अंतराय (विघ्न, अडथळा)! स्वत: परमात्माच आहे त्याला चंदुभाई मानले?! स्वत: ब्रह्मांडाचा स्वामी, अनंत शक्तीचा मालक, हवे ते प्राप्त करू शकतो, असे असूनसुद्धा का काही प्राप्त होत नाही? तर अंतराय पाडले आहेत म्हणून. अंतरायामुळे शक्ती आवृत्त होते!

इच्छा अंतरायांना आमंत्रण देते. हवेची इच्छा नसते तर त्याचा अंतराय येतो का? 'ज्ञानीं'ना निर्-इच्छक पद, निर्-अंतराय पद असते. त्यांना कसलीही भीक (तीव्र इच्छा, याचना) नसते.

अंतराय कशा प्रकारे पडतात? जेव्हा एखादा कुणाला काही देत असेल तेव्हा त्यात हस्तक्षेप केल्याने, अडवल्याने अंतराय पडतात.

अज्ञानदशेत चुकीच्या विचारांचे रक्षण केले जाते, याउलट ज्ञानदशेत त्यांचे लगेच प्रतिक्रमण होते. शुभ कार्याला अनुमोदन देणे, स्वत:ला तसेच इतरांना लाभदायक असते. शुभ कार्यात दुसऱ्यांना अनुमोदन दिले तर आपल्यालाही तसेच अनुमोदन देणारे भेटतील! समोरच्या व्यक्तीला बेअक्कल म्हटले तर स्वत:च्याच अकलेवर अंतराय पडतात.

मोक्षमार्गात येणाऱ्या अंतरायांसमोर स्वत:चा दृढ निश्चय राहिला तर स्वत:च्या शक्ती विकसित होत जातात. अनिश्चयानेच अंतराय पडतात. निश्चय अंतराय दूर करतो. आत्म्याचा निश्चय झाला की सर्व अंतराय संपतात.

सांसारिक बुद्धीचे अंतराय गाठीसारखे असतात आणि धार्मिक बुद्धीचे अंतराय घट्ट गाठीसारखे असतात, अनंत जन्म भटकायला लावतात. 'मी

काहीतरी जाणतो' असा भाव अध्यात्मात सर्वात मोठा अंतराय निर्माण करतो. जिथे आर्तध्यान-रौद्रध्यान होत असतील तिथे खरे तर काहीच कळलेले नसते, असे सिद्ध होते.

सर्वात मोठा अंतराय म्हणजे ज्ञानांतराय. 'अध्यात्मामध्ये इतरांना काहीच समजत नाही, मलाच सर्वकाही समजते', असे वाटणे, किंवा कोणी 'स्वरूपज्ञान' प्राप्त करण्यासाठी जात असेल त्याला अडवणे, किंवा खरे 'ज्ञानी' भेटल्यावरही 'असे तर खूप 'ज्ञानी' पाहिलेत', असे म्हणणे, या सर्वांमुळे ज्ञानांतराय निर्माण होतात. याउलट मनात जर असे भाव निर्माण झालेत की 'ज्ञानी' आले आहेत, पण मी जाऊन त्यांना भेटू शकत नाही, तर त्यामुळे अंतराय दूर होतात.

## [ 8 ] तिरस्कार - झिडकार

'मला येत नाही' असे म्हटले की कार्यकुशलतेवर अंतराय पडतात आणि 'मला का येणार नाही?' असे दृढपणे म्हटले की अंतराय तुटतात.

एका तासात कधी मोक्ष होतो का? असा भाव मनात आला की लगेच मोक्षाचा अंतराय पडला! बुद्धीने मापता येईल असे हे जग नाही.

ज्ञानी पुरुष ज्ञानांतराय-दर्शनांतराय तोडून टाकतात! परंतु जर विनय धर्म खंडित होत असेल तर मग तिथे ज्ञानीसुद्धा असमर्थ होतात. ज्ञानींबद्दल तर एकही उलट विचार येता कामा नये. ज्ञानींपाशी जाण्यासाठी जे अंतराय येतात त्यांना दूर करण्यासाठी ज्ञानींच्या प्रार्थना विधीमध्ये त्यासाठी सतत मागणी केल्याने ते अंतराय दूर होतात. अंतराय तर भाव असल्यावर तुटतात! अंतराय भाव असल्यावर तुटतात आणि भाव वेळ आल्यावर निर्माण होतात.

आत्मज्ञानींसाठी अंतराय संयोगस्वरूपी असतात आणि ते वियोगी स्वभावाचे असतात, आणि स्वत: 'शुद्धात्मा' तर असंयोगी-अवियोगी आहे.

ज्याचा तिरस्कार त्याचे भय. तिरस्कारातूनच भयाचा जन्म होतो. कोर्टाचा, आणि पोलिसांचा तिरस्कार त्यांच्याबद्दलच्या भीतीला जन्म देतो.

तिरस्कार माइल्ड (हलके) फळ देतो, तर झिडकारणे भयंकर अंतराय निर्माण करते. कोणालाही झिडकारणार नाही, अशी जागृती

असायला हवी. आपण ज्याला झिडकारतो तो आपल्यासाठीचे दरवाजे कायमचे बंद करतो. वाणीद्वारा झिडकारल्याने खोलवर आणि भरून न येणारे घाव पडतात! एकासुद्धा जीवाला झिडकारल्याने मोक्ष थांबलाच म्हणून समजा! तात्पर्य झिडकारण्यात फार जोखीम आहे.

## [ 9 ] व्यक्तित्व सौरभ

'ज्ञानी पुरुषां'चे व्यक्तिमत्व वेगळेच असते, त्यांना आत्म्याशिवाय काहीच प्रिय नसते. मन-वचन-काया यापासून पूर्णपणे वेगळ्या अशा आत्मस्वरूपातच ते स्थित असतात. व्यवसाय करत असूनसुद्धा जे वीतरागतेने वर्तले (वागले), अशा अक्रम ज्ञानींच्या सिद्धी तर पाहा! ते ना कसले व्रत घेत, ना नियम पाळत, फक्त चोविहार करत असत (सूर्यास्तापूर्वी भोजन करणे), आणि उकळलेले पाणी पीत असत. तसेच 'श्रीमद राजचंद्रांच्या वचनामृताचे' आणि सर्व धर्मांच्या शास्त्रांचे वाचन-मनन करीत असत. तसे तर हे आश्चर्यकारक अक्रम विज्ञान नैसर्गिक रित्या सहजच प्रकट झाले! 1958 च्या सायंकाळी सुरत स्टेशनच्या बाकावर ज्ञान प्रकट होण्याआधी, अलोट गर्दी असूनही अंतरंगात नीरव शांतता झाली, पण तरी ती अहंकार मिश्रितच ना! आणि तिथे परम ज्योतिस्वरूप ज्ञान-प्रकाश प्रकट झाला, ज्ञानात त्यांनी संपूर्ण ब्रह्मांड पाहिले. देह, मन, वाणी यापासून स्वत: पूर्णपणे वेगळे असल्याचा अनुभव आला. ज्ञाता-द्रष्टा आणि परमानंद प्राप्त झाल्यावर या पृथ्वीच्या इतिहासातील भव्यातिभव्य दिवस उगवला! अहंकार पूर्णपणे संपला! ममता संपली!! त्यांच्या श्रीमुखातून वाहणारी वीतराग वाणीच त्यांच्या आध्यात्मिक पूर्णतेचे प्रमाण होती, आणि या कलियुगातील अकरावे आश्चर्य, अक्रमविज्ञान-असंयति पूजा जगापासून लपून राहू शकले नाही. एका मागून एक, असे करत करत वीस वर्षात वीस हजार पुण्यात्म्यांनी अक्रम मार्गाद्वारे आत्म विज्ञान प्राप्त केले आणि तेच सर्वात मोठे आश्चर्य आहे.

ज्ञानींचा नित्यक्रम काय? 'ज्ञानी' निरंतर आत्मचर्येतच असतात. मोक्ष स्थितीतच असतात. स्वत:च्याच वाणीला 'टेपरेकॉर्ड' म्हणून मालकीभावाचे सर्व करार फाडून टाकतात! जे असे समर्थ निमित्त असतात ते तर उपादानाची कमतरता देखील चालवून घेतात.

प्रेमाशिवाय भक्ती उत्पन्न होत नाही. दिवसभर भगवंताचा विसर पडतच नाही, ती प्रेमलक्षणा भक्ती.

ज्ञानींनी स्वत: निर्दोष होऊन, निर्दोष दृष्टी करून, सर्व जगाला निर्दोष पाहिले. शुद्धात्मा दोष करत असेल तर तो दोषी समजला जाईल. पण शुद्धात्मा तर संपूर्ण अकर्ता आहे, मग त्याचे दोष पाहण्याचा प्रश्नच कुठे उरतो? 'डिस्चार्ज'मध्ये कोणाचा दोष कसा असू शकेल? एक जरी व्यक्ती दोषी दिसली, तरी तिथे शुद्धी नाही, तर इंद्रिय ज्ञान आहे, आत्मज्ञान नाही! मारण्याचा विचार करणारा निसर्गाचा गुन्हेगार आणि प्रत्यक्षात मारणारा जगाचा गुन्हेगार ठरतो. न्याय तर दोघांनाही मिळतोच. मारण्याचा विचार करणारा पुढच्या जन्मी गुन्हेगार होतो, प्रत्यक्षात मारणाऱ्याला या जन्मातच शिक्षा मिळते, आणि (गुन्ह्याचा) निकाल होऊन जातो.

'मी खाल्ले' असे बोलण्यात हरकत नाही, पण आत जाणले पाहिजे की कोण खात आहे?

'मिळाले ते आत्मज्ञान नाही, आत प्रकट झाले ते आत्मज्ञान.' – असे दादाश्री म्हणतात. ज्ञानी पुरुषांची आज्ञा पाळल्यामुळेच त्यांची कृपा प्राप्त होते.

जिथे शब्दांना मर्यादा पडतात, आकलन शक्ती कमी पडते, जिथे कसलीही उपमा देता येत नाही, जे स्वत:च उपमेय आहेत, अशा ज्ञानी पुरुषांचे वर्णन कसे काय करता येईल? जे मनात नाहीत, वाणीत नाहीत, देहात नाहीत, निरंतर आत्म्यातच राहतात, जिथे अहंकाराला किंचितही स्थान नाही, क्रोध-मान-माया-लोभ यांचे निर्वाण झालेले आहे, अशा ज्ञानी पुरुषांचा नम्रता हा तर सामान्य गुण आहे. ज्ञानी तर निर्अहंकारी असतात. त्यांना शिव्या देणाऱ्यालाही ते आशीर्वादच देतात! ज्ञानी नि:स्पृह नसतात, आणि सस्पृह पण नसतात, ते तर सस्पृह-नि:स्पृह असतात. समोरच्यांच्या भौतिक सुखांबाबत नि:स्पृह आणि आत्मज्ञानाबाबतीत सस्पृह!

ज्ञानींची वाणी वीतरागतेसहित, राग-द्वेषरहित असते, अशी वाणी ऐकल्याशिवाय कुणाला मोक्षप्राप्ती होणे शक्यच नाही! ज्ञानी पुरुषांच्या वाणीत ना कुणाचे खंडन असते की ना स्वत:च्या मताचे मंडन! नाही

कुणाला विरोध, तर नाही कुणाची चूक काढणे. ही वाणी स्याद्‌वाद वाणी आहे, यात कसलाही वाद नाही, विवाद नाही आणि संवादही नाही. त्यांची वाणी म्हणजे जणू निमित्ताधीन सहजभावे प्रवाहित, करुणेचा नितळ अस्खलित वाहणाऱ्या पाताळी झऱ्याचा प्रवाह!

## [ 10 ] अक्रम मार्ग

'चौदालोका'चे नाथ जिथे प्रकट झाले आहेत, अशा 'ज्ञानी पुरुषां'ची अर्थात देहधारी स्वयं परमात्मा यांची कृपा प्राप्त झाली की मग तिथे काहीच करावे लागत नाही, फक्त त्यांच्या आज्ञेत राहून, त्यांच्या मागोमाग चालत राहावे. असे 'ज्ञानी पुरुष' ह्या काळात प्रकट झाले आहेत, त्यांच्या कृपेने 'अक्रम विज्ञाना'द्वारे, 'अक्रम मार्गाने' म्हणजेच लिफ्टमध्ये बसून आत्मज्ञानाची उत्तुंग शिखरे तासाभरातच सर होतात!!! या अपवादात्मक मार्गाची सिद्धी अति-अति अद्‌भुत आहे!!!

अशा ह्या कलियुगात अक्रम मार्गाचा भव्य उदय झाला आहे! ही अध्यात्म विज्ञानाची अपूर्व भूमिका आहे! ज्यांच्या समस्त वाणीमध्ये अविरोधाभास अखंडपणे विद्यमान आहे, असे ज्ञानी, अनंत जन्मांची पापे तासाभरात भस्मीभूत करून आत्मसाक्षात्काराची प्राप्ती करून देतात, आणि तसे करताना उपादानाची जागृती किंवा अजागृती हे पाहिले जात नाही. अक्रम विज्ञानींच्या जबरदस्त पॉवरफुल निमित्ताच्या सुयोगामुळे जागृती टोकाला जाईल अशी दशा साधकांना प्राप्त होते. तिथे कषाय पूर्णतः नष्ट होतात, अहंकार-ममता यांचा विलय होतो, आणि कर्तापण मुळीच राहत नाही, केवळ आत्मसुखाच्या संवेदनांचा अनुभव होतो. अशी दशा प्राप्त करून देणाऱ्या या 'ज्ञानी' नव्हे 'विज्ञानीं'ची अक्रमची अगाध सिद्धी तरी पाहा!

## [ 11 ] आत्मा आणि अहंकार

'मी चंदुलाल आहे, या स्त्रीचा पती आहे, या मुलाचा बाप आहे, मी बिझनेसमन आहे, मी जाड आहे, मी गोरा आहे.' अशा अनेक चुकीच्या मान्यतांच्या चादरी ओढून घेतल्या आहेत, स्वतःच्या योग्य मान्यतांवर, शुद्ध दर्शन आणि ज्ञानावर! 'ज्ञानी पुरुष' या 'रॉंग बिलीफ'ला 'फ्रॅक्चर' करून सर्व आवरणांना उडवून टाकतात, त्यामुळे सम्यक् दर्शनाचे भव्य द्वार खुले होते.

'स्वत:' काहीच करत नाही, तरीसुद्धा अज्ञानतेवश आरोप करतो, की 'मी केले', तोच अहंकार. आणि अहंकारामुळे कर्मबंधन पडते, शरीर बनते, मन बनते, वाणी बनते, पुद्गलाचे बंधनसुद्धा त्यामुळेच पडत असते.

आत्मा परमात्म्याची भेद स्वरूपात आराधना करणे हा लौकिक धर्म आहे, आणि आत्मा परमात्म्याची अभेद स्वरूपात आराधना करणे हा अलौकिक धर्म आहे, आणि अलौकिक धर्मानेच मोक्ष आहे! अलौकिक धर्मात ना पुण्य, ना पाप, तिथे तर कुठल्याही गोष्टीचे कर्तापण नाही.

संसारिक सुखातसुद्धा ज्यांना दु:खाचे ओझे वाटते, ते मुक्तीचे अधिकारी! त्यांना ज्ञानी पुरुष मुक्ती देतात. कारण ज्ञानी तर तरण-तारणहार असतात.

## [ 12 ] 'व्यवस्थित शक्तीची' व्यवस्था

विश्वाचे नियंत्रण स्वभावत:च सहज रूपात होत असते. त्याला 'अक्रमज्ञानी' 'व्यवस्थित शक्ती' म्हणतात. विश्वाच्या सहा सनातन तत्त्वांवर या 'व्यवस्थित शक्ती'चे काही नियंत्रण नाही. सर्व तत्त्वे स्वतंत्र आहेत, कोणी कोणाचे ऐकत नाही, कोणी कोणाला जुमानत नाही, त्यातील एक चेतन तत्त्व, स्वत: परमात्मा आहे, तरीही!!!

सेवेसोबत समर्पणता असेल तर सोन्याहून पिवळे! पण सेवेचे फळ पुण्य आहे, मोक्ष नाही! हो, पण त्यात जर स्वरूपज्ञान असेल, कर्तापण नसेल, तर मग तिथे कर्मबंधन होत नाही.

या जगात चाललेला रक्तपात, मारामाऱ्या, हत्या आणि विश्व युद्धांचे दुष्यपरिणाम, या सर्वांना ज्ञानी पुरुष 'व्यवस्थित' म्हणूनच पाहत असतात! समुद्रातील मोठे मासे आणि छोटे मासे यांच्यात होणाऱ्या विनाशाकडे कोणी लक्ष देतो का? ते काय 'व्यवस्थित' नाही?

## [ 13 ] व्यवहार धर्म-स्वाभाविक धर्म

सुख देऊन सुखाची प्राप्ती करणे, हा व्यावहारिक धर्म झाला. दु:ख दिले तर दु:खच प्राप्त होते. वाहतुकीच्या नियमांना पाळून सर्वजण स्वत:च्या जीवाला जपत नाहीत का? तिथे नियम मोडला तर टक्कर होऊन अपघात

होईल, मरणही येऊ शकेल! तसेच, सुख टिकवून धरण्यासाठी सुख इतरांना वाटून टाकणे, हे रिलेटिव्ह धर्माचे रहस्य आहे! आणि रियल धर्मात तर 'वस्तू-स्वभाव' प्राप्त करायचा आहे! 'आत्मधर्म' प्राप्त करायचा आहे!

सर्व परिस्थितीत समाधानी राहणे म्हणजे 'रियल धर्म'. आणि कधी समाधान तर कधी असमाधान असेल तर तो 'रिलेटिव्ह धर्म'.

सनातन सुख शोधणाऱ्या जीवाला जेव्हा ते मिळत नाही, तेव्हा तो काल्पनिक सुखात पडतो, आणि परिणाम स्वरूप ते दु:खदायक सिद्ध झाल्यामुळे, वेगवेगळ्या कल्पनांमध्ये रंगून जातो, सुखासाठी धडपडत राहतो आणि अधिकच गुंतत जातो. सनातन सुख तर स्वत:च्या आतच आहे, आत्म्यात आहे! खरे सुख मिळवायचे असेल तर स्वत: खरे व्हावे लागेल. आणि संसारी सुख मिळवायचे असेल तर संसारी व्हावे लागेल!

समसरण मार्गात प्रवेश करतो तेव्हापासूनच अंतरदाहाची दोरी अविरतपणे जळतच राहते, ज्याचा हा अंतरदाह गेला त्याचा संसार मावळला.

आंतरसुख आणि बाह्यसुख यात संतुलन असेल तोपर्यंत व्यवहारात शांती राहते. अंतरसुख खर्च करूनच बाह्य सुख भोगले जाते, त्यामुळे मानसिक स्थिरता नष्ट होते. म्हणूनच झोपेच्या गोळ्या खाव्या लागतात.

जिथे दु:खाचा लवलेशही नाही, तिथे आत्मा असतो.

विपरीत दर्शनाने दु:ख आणि सम्यक् दर्शनाने सुख, सुख आणि सुखच मिळते.

मोक्ष मिळवण्यासाठी ज्ञानी पुरुषांना शरण जाणे आणि संसारात सुख मिळवण्यासाठी आई-वडील आणि गुरुंची सेवा करणे, हीच साधने आहेत.

लोकांनी मानलेल्या सुखाला सुख मानणे ही झाली लोकसंज्ञा, आणि आत्म्यात सुख आहे, असे मानणे ही ज्ञानींची संज्ञा.

संत दु:ख भोगत असतात तर ज्ञानी आत्मसुख उपभोगतात. संत दु:खालाच सुख मानतात.

पुद्‌गल सुख उपभोगणे, हे उधारी करण्यासारखे आहे, त्याची परतफेड करावीच लागते. छोटा मुलगा 'बाबा, बाबा' करत मांडीवर बसतो तेव्हा सुख उधार घेतले जात असते, पण तोच मुलगा मोठा झाल्यावर 'बाबा तुम्हाला अक्कल नाही' असे म्हणतो तेव्हा ते उधारी सुख चुकते करावे लागते. मग आधीच का सावध होऊ नये? पुद्‌गल स्वतः वीतराग आहे, त्याला जेव्हा 'स्वतः' ग्रहण करतो तेव्हापासूनच उधारी व्यवहार सुरु होतो!

## [ 14 ] धर्माची खरी समज

लौकिक धर्म संसार सुख देतो, अलौकिक धर्म सनातन सुख देतो. मिथ्यात्वसहितच्या सर्व क्रियांमधून संसार फलित होतो. अलौकिक धर्म त्यागातही नाही आणि भोगातही नाही. 'त्यागे सो आगे' डोक्यावर जेवढे ओझे सहन होईल तेवढाच संग्रह करावा. खरा त्याग तर आर्तध्यान, रौद्रध्यान सोडवितो.

अडचणीत रक्षण करतो तो धर्म! आर्तध्यान, रौद्रध्यान होताच धर्म प्रकट होऊन आपले रक्षण करतो! अनंत जन्मात धर्मपालन केले पण वेळ आल्यावर जर आपले रक्षण झाले नाही तर त्याला धर्मपालन म्हणताच कसे येईल? जर चिंता वाटत असेल तर धर्म समजलाच नाही असेच म्हणावे लागेल!

धर्म होऊन परिणमित होतो त्याचे नाव धर्म. कोणी शिव्या दिल्या तर धर्म मदतीला येतो. ज्याचा परिणाम दिसतो तो धर्म, आणि परिणाम दिसत नाही तो अधर्म. उपाधीत ज्याला समता राहते त्याच्यावर मोक्षाचा शिक्का बसलाच समजा.

धर्म पालनाची नाही तर धर्माशी सिन्सियर (प्रामाणिक) राहण्याची गरज आहे. देवाचे दर्शन करताना सोबत चपलांचे किंवा दुकानाचेही दर्शन करत असेल तो धर्मात सिन्सियर आहे असे कसे म्हणता येईल? सर्व प्रकारच्या दुःखातून मुक्त करतो तो खरा धर्म.

ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि तप, हा एकच मोक्षाचा मार्ग आहे, दुसरा नाही.

अनंत जन्मात मूर्त स्वरूपाचे दर्शन घेतले. पण अंतरंगात विराजमान असलेल्या अमूर्त स्वरूपाचे एकदा जरी दर्शन झाले तरी अनंत जन्मांचे नुकसान भरून येईल.

हे सर्व नुकसान कधी भरून येईल? आणि तेसुद्धा या नादार कलियुगात? आता तरी ज्ञानींना शरण जाऊन मुक्तीच मागावी, तरच लवकर सुटका होईल!

## [ 15 ] आचरणातील धर्म

देव आचरणाला महत्त्व देत नाही, हेतूला महत्त्व देतो. आचरण, हे 'डिस्चार्ज' आहे, आणि चार्ज तर हेतूनुसार होत असतो.

'मानवजन्म वाया जाऊ नये', यासाठी सतत केलेले चिंतन कधीतरी फळाला येईल.

क्लेशरहित होणे, हाच महान धर्म आहे. क्लेश आहेत तिथे धर्म नाही आणि धर्म आहे तिथे क्लेश नाहीत.

दया दाखवणे, शांती, समता राखणे, ही धर्मसूत्रे या काळात निकामी होऊन जातात. कोटी उपाय करूनही राखता येत नाहीत, तर काय करावे? म्हणूनच 'ज्ञानी पुरुष' सामान्यांनासुद्धा आचरता येईल असा नवीन मार्ग, नव्याच रूपात दाखवितात.

क्रोध-मान-माया-लोभ झाले तरी हरकत नाही, पण मग त्यासाठी प्रतिक्रमण करावे. चोरी केली त्यास हरकत नाही, पण नंतर त्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे. ज्ञानींची एवढी आज्ञा पाळेल, त्याला सर्व धर्मांचे सार मिळेल. ज्ञानींना प्रसन्न ठेवणे, यासारखा उत्तम धर्म नाही. ज्ञानींची आज्ञा पाळली जाते तिथे ज्ञानी प्रसन्न होतात. इतर कशाने नाही. ज्ञानींची एकच आज्ञा थेट मोक्षाला घेऊन जाणारी आहे!

ज्ञान स्वतःच क्रिया करवून घेते. 'चोरी करण्यात मजा आहे' असे ज्ञान फिट होताच चोरी केली जाते. ज्ञान बदलले की मग क्रिया बदलतेच. ज्ञान बदलल्याशिवाय क्रिया लाख जन्मातसुद्धा बदलत नाही.

अज्ञानाचे ज्ञान जाणण्यास पौद्गलिक शक्ती सहज मिळून

जातात. चोरी, हिंसा, अब्रह्मचर्य, यात शक्ती सहज खर्च होऊन जातात. याउलट ज्ञान जाणण्यासाठी प्रार्थना आणि पुरुषार्थ लागतो. प्रार्थना म्हणजे विशेष अर्थाची याचना. ती स्वत:च्या शुद्धात्म्याजवळ किंवा ज्ञानी पुरुषांजवळ केली पाहिजे. अज्ञान दशेत गुरु, मूर्ती किंवा इष्ट देवाला प्रार्थना केली जाते. ज्याचे हृदय शुद्ध असते, त्याची प्रार्थना अवश्य फळाला येते.

## [ 16 ] रिलेटिव्ह धर्म : धर्म विज्ञान

निष्पक्षपातीपणा आहे तिथे वीतराग धर्म आहे. वीतराग धर्म हा सैद्धांतिक धर्म आहे. जे-जे इंद्रियजन्य आहे ते 'रिलेटिव्ह'मध्ये येते आणि 'रियल' आहे, म्हणूनच 'रिलेटिव्ह' उभे झाले आहे! 'रिलेटिव्ह' अवस्था स्वरूप आहे. 'रियल' तत्त्व स्वरूप आहे.

धर्माधर्म आत्मा मूढात्मा - रिलेटिव्हिटी.

ज्ञानघन आत्मा अंतरात्मा - रियालिटी.

विज्ञानघन आत्मा परमात्मा - ॲबसोल्यूट.

आर्तध्यान-रौद्रध्यान जावे, हेच धर्माचे सार आहे. आणि मर्माचे सार म्हणजे मुक्ती! जगाचे सार विषयसुख, आणि धर्माचे सार आर्तध्यान-रौद्रध्यान यापासून मुक्ती! आणि समयसार म्हणजे स्वाभाविक परिणती, स्व-परिणती उत्पन्न होणे.

धर्म 'रिलेटिव्ह' असतो आणि विज्ञान 'रियल' असते. 'विज्ञान' विरोधाभासरहित, सैद्धांतिक आणि स्वयं क्रियाकारी असते.

## [ 17 ] भगवंतांचे स्वरूप ज्ञानदृष्टीने

आपण ईश्वराचे अंश नाही, ईश्वराचे तुकडे नाही, आपण सर्वांश आहोत. मात्र आवरण दूर होऊन प्रकट होण्याचाच अवकाश!

ईश्वर कणाकणात असला तर त्याला शोधायचे कुठे? शौचाला कुठे जावे? मग जड-चेतनमध्ये फरकच राहिला नाही ना? जीवमात्राच्या आत ईश्वर बसलेला आहे.

ज्या वस्तूत मालकीभाव आरोपित झाला आहे, ती वस्तू त्याच्यापासून दूर करताच मालकाला दु:ख होते, त्याला संकल्पी चेतन म्हटले आहे. खरे तर जिथे ज्ञान-दर्शन आहे तिथे चेतन आहे.

## [ 18 ] ज्ञातापदाची ओळख!

तीन गोष्टींची मोक्ष मार्गात आवश्कता आहे. 1) आत्मा प्राप्त करण्याची तीव्र इच्छा, 2) ज्ञानी पुरुष प्राप्त करण्याची तीव्र इच्छा, 3) ज्ञानी पुरुष भेटले नाही तर ज्ञानी पुरुषाची भेट व्हावी अशी भावना करणे.

- दादा भगवान

या ब्रह्मांडातील सर्व जीवांना भगवत् स्वरूपाने दर्शन करतो असे म्हटले की त्यात सर्व रिलेटिव्ह धर्मांचा समावेश होतो. 'स्व'ला जाणून घेतल्यानंतर 'स्व'चा स्वाध्याय सुरू होतो. 'स्व'ला जाणल्याशिवाय जे जे काही केले जाते ते सर्व पराध्याय आहे.

अनादिकालापासून ज्याला 'ज्ञाता' मानले तोच 'ज्ञेय' होऊन जातो तेव्हा निजस्वरूपाचे भान झाले असे म्हटले जाते.

अज्ञानापासून निवृत्ती म्हणजेच मोक्षधर्म! अज्ञानापासून निवृत्त झाल्यावर विज्ञान उत्पन्न होते, त्याचे नाव मोक्ष!

## [ 19 ] यथार्थ भक्तीमार्ग

जोपर्यंत आत बसलेल्या भगवंताचे प्रत्यक्ष दर्शन होत नाही तोपर्यंत मूर्तीसमोर केलेली परोक्ष प्रार्थनासुद्धा प्रत्यक्ष असलेल्यांकडे पोहोचते. त्यासाठी सर्व ठिकाणी अशा प्रकारे प्रार्थना करावी,

''हे वीतराग भगवंत! आपण माझ्या आतच बसलेले आहात, पण मी ते ओळखू शकत नाही, म्हणून आपले दर्शन करीत आहे. मला हे 'ज्ञानी पुरुषां'नी शिकविले आहे. म्हणून मी अशा प्रकारे आपले दर्शन करीत आहे. तर आपण मला माझ्या स्वत:ची ओळख होईल अशी कृपा करावी'' - दादा भगवान.

पाच इंद्रियाद्वारे ईश्वरप्राप्तीसाठी जे काही होते, ती भक्तीच आहे.

प्रत्यक्ष भक्तीमुळे भगवंतांची भेट होते. परोक्ष भक्तीमुळे हळूहळू उर्ध्वीकरण होत राहते. प्रत्यक्ष भक्ती म्हणजे जिथे भगवंत प्रकट झालेले आहेत, त्यांची भक्ती. त्याने मोक्ष मिळतो.

भक्तीच्या सूक्ष्मतेचे प्रकार असतात. नामजपाने स्थूल भक्ती, स्थापनेने सूक्ष्म, द्रव्याने सूक्ष्मतर आणि भावाने सूक्ष्मतम भक्ती होते.

भक्तीमार्गाने मोक्ष आहे की ज्ञानमार्गाने? ज्ञानमार्गाचा असा एक रूळ टाकला आणि त्याला समांतर भक्तीमार्गाचा असा दुसरा रूळ टाकला तरच ही गाडी मोक्षाच्या स्टेशनापर्यंत पोहोचेल! जेवढे ज्ञान मिळेल तेवढी भक्ती स्वत: होऊनच प्रकट होते. स्वरूप ज्ञानाशिवाय केलेल्या भक्तीने सांसारिक फळ मिळते आणि दोन्ही सोबत असतील तर मोक्ष मिळतो! जिथे बुद्धीचा प्रवेश आहे तिथे अपराभक्ती, आणि फक्त ज्ञानासोबत असलेली भक्ती ही पराभक्ती आहे, जी मोक्षात फलित होते. पराभक्तीचा आविर्भाव, ही या अक्रम मार्गाची अनमोल देणगी आहे.

## [ 20 ] गुरु आणि ज्ञानी

एकदा का गुरुचे मंडन केले (मानले) की मग कसेही, सन्निपाताचे संयोग जरी दिसले तरीही गुरुचे खंडन मात्र करू नये. निंदाच काय पण उल्टा विचारही गुरुंबद्दल करू नये. भयंकर विराधना म्हटली जाते. ती थेट नरकापर्यंत नेऊ शकते!

संसारात शुभ-अशुभ शिकवितात ते गुरु आणि शुभ-अशुभ सोडवून शुद्धामध्ये बसवितात ते ज्ञानी.

गुरुंची आवश्यकता किती? गुरुशिवाय तर बाराखडी देखील शिकता येणार नाही, मग गुरुशिवाय भगवंताची भक्ती कशी करता येईल? स्टेशनवर जायचे असेल तरीसुद्धा गुरुची आवश्यकता आहे. पावलापावलागणिक गुरुचीच गरज आहे. आणि मोक्षासाठी तर फक्त ज्ञानींचीच गरज आहे.

जिथे अजिबात 'कर्तापण' राहत नाही, ती 'ज्ञानीं'ची कृपा. मुक्ती देतात ते 'ज्ञानी'.

रेल्वेच्या 'पॉइंटमन' प्रमाणे योग्य रूळावर आणतात ते खरे लौकिक गुरु, आणि जे रूळच बदलून टाकतात, ते आजचे लौकिक गुरु! गुरु म्हणजे भारी. स्वत: बुडतील आणि बसणाऱ्याला पण बुडवून टाकतील. गुरुकिल्ली सहित गुरु असतील तर ते बुडू देत नाहीत.

'सर्व जगाचा मी शिष्य आहे' ही गुरुकिल्ली! 'हा माझा शिष्य आहे' असे ज्याला क्षणभरही वाटत नाही त्याला शिष्य बनविण्याचा अधिकार आहे.

एकदा हृदयात गुरुपदाचे स्थान दिल्यावर गुरुंचे कितीही विपरीत वर्तन, वाणी किंवा सन्निपाताचे, वेडेपणाचे उदय आले तरीही त्यांचे खंडन करीत नाही तो खरा शिष्य. गुरुंबद्दलची अतूट सिन्सियारिटीच मोक्ष मिळवून देते. गुरु म्हणून मंडन केल्यानंतर (स्वीकारल्यानंतर) खंडन करण्यात भयंकर जोखीम आहे. गुरु म्हणजे पाचवी घाती. त्यांचे दोष पाहता कामा नये. नाहीतर गुरु करूच नये. आराधना झाली नाही तरी चालेल, पण विराधना तर होताच कामा नये. या काळातील जीव पूर्वविराधक आहेत. गुरुंमधील कमतरता पाहिल्याशिवाय, त्यांची निंदा केल्याशिवाय स्वस्थ बसतच नाहीत!

गुरु करत नाहीत, गुरु होऊन जातात. ज्यांना पाहताक्षणीच मन शांत होते, आणि हृदयात त्यांची गुरुपदावर स्थापना होते. बाकी तर, गुरुची परीक्षा केल्यानंतर त्यांची स्थापना करण्याचे रत्नपारखीपण आहे का कोणाकडे?

संसारात शुभमार्गावर घेऊन जातात ते गुरु आणि रोख मोक्ष हाती देतात ते 'ज्ञानी'!

## [ 21 ] तपश्चर्येचा हेतू

जप, तप, व्रत यांची आवश्यकता किती? औषधाच्या दुकानातील सर्व औषधे आपल्या कामाची असतात का? ज्याला जे औषध मानवत असेल तेच घेतले जाते. आपल्याला मानवत असलेले औषध आपल्यासाठी खरे आहे पण त्यासाठी दुसरी औषधे चुकीची आहेत असे म्हणू शकत नाही. त्या औषधांसाठी दुसरे रुग्ण असतात. जप-तप वगैरे शुभकर्मे बांधतात.

ओढाताण करून, जाणूनबुजून तप करण्याचा हा काळ नाही. ह्या काळात तर समोरून आलेले तप समतापूर्वक करावे. रेशन, केरोसीन, साखर, दूध यांच्या कमतरतेमुळे बेजार झालेल्या, रात्रंदिवस त्रस्त असलेल्या या हत् पुण्यशालींना आणखी दुसरे तप करण्याची काय गरज?!

'ज्ञानीं'ना त्यागात्याग नसतो, ते तर जे समोर येईल त्याचा निकाल करून टाकतात! भगवंतांनी वस्तूच्या त्यागाला त्याग म्हटले नाही, वस्तूबद्दल असलेल्या मूर्च्छेच्या त्यागाला त्याग म्हटले आहे! भगवंत तर मूळच पाहतात ना!!!

पूज्य दादाश्रींच्या आज्ञेनुसारची एक एकादशी ज्याच्या जीवनात होईल त्याचे निश्चित कल्याण होईल. पाच इंद्रिये, पाच कर्मेंद्रिये आणि अकरावे मन यांना निराहारी ठेवणे हीच खरी एकादशी. जर उपयोगपूर्वक उपवास केला तर तन, मन आणि वाणीची शुद्धी होते. आयंबिल-एका धान्याचाच आहार घेणे. पण त्याच्या मर्यादांचे पालन करण्याचा विवेक असायला हवा. अजीर्ण झालेल्या माणसाला अजीर्ण जाईपर्यंत उपवास करणे हिताचे आहे. खरे तर जप, तप, उपवास इत्यादी साधनांमुळे आत्मा प्राप्त होईल असे शक्य नाही.

उणोदरी (भुकेपेक्षा कमी आहार घेणे) यासारखे दुसरे तप नाही. पूज्य दादाश्रींनी जीवनात नावालाही उपवास केलेला नाही. हो, पण जन्मभर उणोदरी तप मात्र करत असत.

लाख उपवास करून सुद्धा कषाय गेले नाहीत तर त्या उपवासांचा काय उपयोग? उपवास आणि कषाय एकत्र असतील तर भयंकर नुकसान होते. दोन वाजेपर्यंत भोजन मिळाले नाही तर मनाला सांगावे की, आज उपवास आहे आणि त्यावेळी समता राहिली तर त्यासारखा एकही उपवास नाही.

## [ 22 ] लौकिक धर्म

धर्मामध्ये जरी सूक्ष्म इच्छा असतील तरी तो धर्म, धर्म नाही, व्यापार आहे!!

'रिलेटिव्ह'मध्ये जे कमावले ते 'रियल'मध्ये लुटले जाते. धर्मात लूट चालत नाही. त्याची जोखीम तर कल्पनेच्या पलिकडे आहे.

साधनेचे सिद्धांत समजल्याशिवाय साधक साधना कशी करू शकेल? मोक्ष आणि पक्ष दोन्ही विरोधाभासी आहेत. वीतराग वाणीशिवाय दुसरा काही उपाय नाही. प्रत्यक्ष ज्ञानींशिवाय मोक्ष असंभव आहे.

## [ 23 ] मोक्ष प्राप्त करणे हेच ध्येय

सिद्ध दशा म्हणजेच परमात्मस्वरूपाची स्थिती. तिथे करावयाचे काहीच नाही. ज्ञाता-दृष्टा आणि परमानंद हीच त्यांची स्वभाविक स्थिती, तिथे निरंतर सिद्धगतीच्या अनंतसुखाचे वेदन करायचे (अनुभवायचे).

मोक्ष म्हणजेच मुक्त भाव. प्रथम सांसारिक दु:खांपासून मुक्ती मग सर्व कर्मांपासून मुक्ती. जे मुक्त पुरुष आहेत त्यांच्याकडूनच मुक्ती मिळते.

जिथे कुठल्याही प्रकारची भीक (याचना, तीव्र इच्छा) नाही, लक्ष्मी, किर्ती, विषय, शिष्य, मंदिर किंवा मान यापैकी कशाचीही भीक नाही, तिथे जगातल्या सर्व सत्ता झुकतात!

अचूक समज असेल तर मोक्ष मिळतो. देहात आत्मबुद्धी म्हणजे संसार आणि आत्म्यात आत्मबुद्धी तो मोक्ष.

मोक्ष, हे काही जाण्याची, मिळविण्याची गोष्ट नाही, किंवा कुठली स्थिती नाही. तो तर स्वत:चा स्वभावच आहे. स्वत: मोक्षस्वरूपच आहे, पण त्याचे भान विसरला आहे. 'ज्ञानी पुरुष' स्वत:च्या स्वरूपाचे स्वभावाचे भान करवितात. तिथून मोक्षाचा अनुभव येणे सुरू होते!

सर्वात सरळ काय असेल, तर मोक्षमार्ग! बैल शेतातून सरळ घरी येतो पण शेतात जाताना त्याला जबरदस्तीने खेचून घेऊन जावे लागते. मोक्ष तर स्वत:चेच घर आहे. आणि संसार नांगरणी करण्याचे शेत आहे. तिथेच भयंकर कष्ट, विघ्न आणि विकल्प आहेत. स्वत:च्या घरात निर्विकल्प दशा आहे, परमानंद आहे, अक्रियता आहे!

'आत्मा' निरंतर मुक्तच आहे, कधीही बांधला गेला नाही. भ्रांतीमुळे बंधनाचा भास होतो. ज्ञानीच्या कृपेने भ्रांती नष्ट होताच मुक्ततेचे भान येते!

## [ 24 ] मोक्षमार्गाची प्रतीती

**मोक्ष प्राप्त करण्यासाठी :**

| | |
|---|---|
| धर्म कुठला ? | : आत्मधर्म ! |
| वेश कुठला ? | : कुठलाही ! |
| कुठल्या स्थानकात ? | : वीतराग स्थानकात ! |
| कुठल्या दशेत ? | : वीतराग दशेत ! |
| कुठल्या संप्रदायात ? | : निष्पक्ष असेल तिथे ! |
| सद्गुरुंची ओळख काय ? | : रात्रंदिवस आत्म्याचा उपयोग, अपूर्व, अजोड, पण तरीही अनुभवगम्य वाणी ! |
| प्रतीती काय ? | : तिथे आत्मा स्थिर होतो ! |
| लक्षण काय ? | : कषाय रहितस्थिती ! |
| या काळात कुठे आहे ? | : संपूज्यश्री दादाश्री |
| प्राप्ती कशामुळे ? | : परम विनयामुळे |
| सम्यकत्वाची प्राप्ती कुठून ? | : कषायरहित सद्गुरुंद्वारे |
| धर्माचरण कशामुळे होते ? | : कषायरहित सद्गुरुंद्वारे |
| धर्माचे साधन काय ? | : उपादानाची जागृती |
| धर्म कशाला म्हणतात ? | : कषाय कमी होणे, त्याला ! |
| मोक्षासाठी सोपा उपाय | : कषायरहित 'ज्ञानीं'ची सेवा |
| कुठल्या साधनामुळे मोक्ष ? | : आत्मज्ञानामुळे. |
| मोक्षमार्गात व्यवहार बाधक आहे का ? | : नाही. अज्ञान बाधक आहे. |
| मोक्षमार्गात शासन देवी-देवतांच्या आराधनेची आवश्यकता आहे का ? | : हो, मार्गात काही अडचणी येऊ नयेत म्हणून. |

जैनांची चतुर्थी खरी की पंचमी? : जी अनुकूल असेल ती खरी, ज्यामुळे धर्माचरण होईल ती खरी आणि अधर्म होईल ती खोटी.

जैन कुणाला म्हणतात? : ज्याने 'जिन'ची किंवा जिनेश्वराची वाणी ऐकली असेल त्याला. ऐकून श्रद्धापूर्वक त्याचे पूर्ण पालन करतो तो साधू आणि अंशतः पालन करतो तो श्रावक!

## [ 25 ] I & My

Separate I & my with Gyani's Separator. I is immortal. My is mortal. - दादा भगवान.

(आय ॲन्ड माय - मी आणि माझे, याला ज्ञानींच्या उपकरणाने वेगळे करा. 'मी' हे शाश्वत आहे आणि 'माझे' हे नाशवंत आहे.)

जिथे जिथे 'My' - 'माझे'चा वेढा पडला आहे तो बाजूला साराल तर शेवटी Absolute 'I' - 'मी' सापडेल.

'I' - 'मी' हा परमात्मा आणि 'माझे' ही माया. - दादा भगवान.

ज्ञानी 'आय' आणि 'माय' यामध्ये भेदरेषा आखून देतात.

## [ 26 ] स्मृती -राग-द्वेषाधीन

स्मृती राग-द्वेषाच्या आधीन आहे. ज्याबद्दल राग किंवा द्वेष असेल त्याची आठवण येतच राहते.

ज्यांना आत्म्याशिवाय काहीच आठवत नाही, ते वीतराग. निरंतर आत्मस्थ असल्याकारणाने 'ज्ञानींना' जगाचा विसर पडलेला असतो, परंतु दर्शनात त्यांना सर्वकाही दिसत असते. स्मृती ही पौद्‌गलिक शक्ती आहे. दर्शन ही आत्म्याची शक्ती आहे.

आठवण येणे म्हणजे परिग्रह. पण ज्ञानींची आठवण येणे, याला प्रशस्त राग म्हटले आहे. या प्रशस्त रागामुळे जी ममता संसारात होती ती ज्ञानींवर बसते. म्हणून हा प्रशस्त रागच मोक्षाला कारणीभूत आहे.

फुले वाहतो, त्याच्यावर राग नाही आणि शिव्या देतो त्याच्यावर द्वेष नाही. तीच समता. समताभावात चूकभूल होऊ शकते तर ज्ञाता-द्रष्टा भावात सतत जागृती राहते.

संसारात संतोष असतो पण तृप्ती होत नाही. संतोषामुळेच नवीन कर्म बीजे पडतात!

## [ 27 ] निखालस

आत्मज्ञानातच खरी निखालसता आहे. शास्त्र वाचण्याची गरज नाही. निखालस व्हायचे आहे. निखालस म्हणजे प्युअर - शुद्ध!

असामान्य मनुष्य म्हणजे जो जीवमात्रांना मदतरूप होतो! स्वत: प्रकृतीहून वेगळा होतो, खरे स्वातंत्र्य प्राप्त करतो, तो!

## [ 28 ] मुक्तहास्य

मुक्तहास्य संपूर्ण मुक्तपुरुषाच्या मुखारविंदाची निरंतर शोभा आहे. आत असलेले तऱ्हेतऱ्हेचे आग्रह, दोष, एटिकेट (शिष्टाचार) यांची भुते हास्याला तणावग्रस्त करतात. जितकी सरलता, निर्दोषता तितकेच मुक्त हास्य! जिथे वीतरागता तिथे संपूर्ण मुक्त हास्य!

## [ 29 ] चिंता : समता

चिंता तर पशुगतीलाच नेते!

परमात्म्याला खेटून बसलेले 'ज्ञानी' आणि जो त्या 'ज्ञानीं'च्या जवळ बसतो तो परमात्म्याच्या अगदी निकट पोहोचतो!!! मग तेथे नीरव शांतीच्या अनुभवाशिवाय आणखी काय असेल?

## [ 30 ] संयम परिणाम

बाह्य संयमाला भगवंतांनी संयम म्हटलेले नाही. पण पर-परिणती उत्पन्न होत नसेल तर त्याला संपूर्ण संयम म्हणतात. क्रोध-मान-माया-लोभ यांच्या संयमाला संयम परिणाम म्हणतात. संयमातूनच आत्मशक्ती प्रकट होते.

## [ 31 ] इच्छापूर्तीचा नियम

मनाचा स्वभाव सतत नवे-नवे शोधण्याचा आहे. आत तऱ्हेतऱ्हेच्या

इच्छा होत राहतात. तेव्हा निसर्ग त्याला सांगतो की तुझ्या सर्व मागण्या पूर्ण होतील, पण आमच्या सुविधेनुसार! इच्छा झाली आणि वस्तू मिळाली असे झाले तर ते अधोगतीला नेते आणि इच्छा असेल तरी पण वस्तूचा पत्ता नाही, असे झाले तर ते उर्ध्वगतीला नेते.

## [ 32 ] टी.व्ही. ची सवय

मनुष्य देह मोठ्या मुश्किलीने मिळाला आहे. परंतु ज्याला जशी समज असेल तसा तो तिचा उपयोग करतो. श्रीकृष्णाने गीतेत हेच सांगितले की मनुष्य निरर्थक गोष्टीत वेळ वाया घालवीत आहे. योग्य समजुतीच्या अभावामुळे मनुष्यत्व हिरावले जाते आणि सगळा वेळ व्यर्थ जातो.

## [ 33 ] लोभाची अटकण

स्वत:कडे सर्वकाही असूनसुद्धा शोधत फिरतो, तो लोभी. 'व्यवस्थितमध्ये जे असो ते भले असो', असे म्हटल्यामुळे लोभाची गाठ तुटत जाते.

## [ 34 ] लगाम सोडा

एक क्षणही पाच इंद्रियरुपी घोड्यांचा लगाम सुटत नाही, आणि उतार आला की खेचण्याऐवजी सैल सोडतो आणि चढ आल्यावर सैल सोडायला हवा तेथे खेचून धरतो! म्हणून 'ज्ञानी पुरुष' लगाम 'व्यवस्थित'वर सोपवून 'पाहत' राहण्याचा प्रयोग शिकवतात. आठवड्यातून रविवारी हा प्रयोग केल्यामुळे 'व्यवस्थित' यथार्थपणे समजायला लागते, आचरण कसे होत आहे, वाणीची रेकॉर्ड कशी वाजत आहे, याला आणि मनाला 'स्वत:' पाहत राहावे. जितक्या प्रमाणात मन, वाणी आणि काया याला वेगळे असलेले पाहाल, तितक्या प्रमाणात केवलज्ञान उत्पन्न होईल. मन-वचन-काया यांच्या क्रियांना काढून टाकायच्या किंवा बदलायच्या नाहीत, तर त्यांना फक्त पाहायच्याच आहेत! डिस्चार्जला कसे बरे बदलता येईल? जेव्हा स्वत: स्वत:च्याच पुद्‌गल परिणामांकडे पाहत राहतो तेव्हा केवलज्ञान सत्तेत असते! 'काय घडत आहे ते पाहत राहणे.' हे ज्ञानींच्या अंतीम दशेतील संयम आहे.

# [ 35 ] कर्मांची थियरी

जिथे समाधान तिथे धर्म, जिथे असमाधान तिथे अधर्म.

कर्म म्हणजे काय? तुम्ही ज्ञानी असाल तर कर्मे तुमची नाहीत, अज्ञानी असाल तर कर्मे तुमची आहेत, कर्ताभावामुळेच कर्मबंधन पडते. 'मी केले' या आरोपित भावामुळे कर्मबंधन पडते. 'मी चंदुलाल आहे' असा भाव हेच कर्म आहे. आत्मा हा कर्माचा कर्ताही नाही. भ्रांतीमुळे तसा भास होतो. भ्रांती सरली की कर्माचा कर्ताही नाही आणि कर्मही नाही. कर्म कोण करतो? पुद्‌गल की आत्मा? दोघांपैकी कोणीही नाही, अहंकारच कर्म करतो. आत्मा व्यवहाराने कर्ता आहे आणि निश्चयाने अकर्ता आहे. आत्मा स्वभावकर्माचा कर्ता आहे. रॉंग बिलीफ - चुकीच्या मान्यतेमुळे 'मी चंदुलाल आहे' असे मानतो आणि कर्मबंधन होते. आत्म्याच्या उपस्थितीमुळे अहंकार निर्माण होतो आणि त्यात कर्ताभाव निर्माण होतो, आणि त्या भावानुसार पुद्‌गल सक्रीय होते! अहंकार गेला की सर्वच संपते!! 'ज्ञानी पुरुष' स्वतःच्या स्वरूपाचे भान करून देतात, त्यानंतर कर्मबंधन होतच नाही.

अनंत जन्मांची कर्मे म्हणजे सर्व जन्मांच्या कर्मांची बेरीज नाही, पण सार रूप कर्मे! शुभ कर्म भोगताना गोडी वाटते आणि अशुभ कर्मे कडू वाटतात!

स्थूल कर्म, म्हणजे पाच इंद्रियांद्वारे अनुभवास येणाऱ्या कर्मांची फळे इथल्या इथेच भोगली जातात आणि सूक्ष्मकर्म जे दिसत नाही, करणाऱ्यालाही समजत नाही, त्याकर्मांची फळे पुढच्या जन्मात भोगली जातात. दान देणे हे झाले स्थूलकर्म. त्याचे फळ नाव, कीर्ति, वाह-वाह अशा रूपात लोक लगेच देतीलही, पण दान देताना आत जो भाव असेल, जसे की , या मेयरच्या दबावामुळे द्यावे लागले, नाही तर दिले नसते, किंवा मग माझ्याकडे जास्त असते तर मी जास्त दिले असते, असे भावच पुढील जन्मात फळाला येतात. स्थूल क्रियांच्या मागे असलेला अभिप्रायच सूक्ष्म कर्म चार्ज करत असतो. स्थूल कर्म डिस्जार्च स्वरूपात असते त्यामुळे त्याची क्रिया स्वाभाविक असते, त्याचा कोणी कर्ता नसतो, आणि

सूक्ष्म कर्माचा कर्ता अहंकार आहे. 'मी केले' असा भावच कर्मबंधन टाकतो, असे अक्रम विज्ञान म्हणते. 'कर्मामुळे' नाही तर 'व्यवस्थित शक्ती'मुळे तुमचे सर्व चालते. कर्म तर आत पडून राहिले आहेच, परंतु त्याला रुपकात आणणारे 'सायंटिफिक सरकमस्टेन्शिल एविडेन्सेस्' आहेत, कर्म तर 'व्यवस्थित शक्ती'चा एक अंश आहे!

आत्म्याची चैतन्यशक्ती अशी आहे की चुकीच्या मान्यतेमुळे असे वाटते की 'हा मी आहे', आणि लगेच सक्रिय स्वभावी परमाणू तिथेच चार्ज होऊन आत्म्याला चिकटतात, त्यालाच कर्म म्हणतात.

मागे न हटता मन-वचन-काया यांच्या पूर्ण ऐक्यने जी कृत्ये केली जातात त्यांच्यामुळे भयंकर चिकट कर्मे बांधली जातात आणि त्यांच्यापासून सुटका होणे फार कठीण असते. अनेक वेळा आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याखान केल्यानेच सुटका होऊ शकते.

'मी चंदुलाल आहे' असे मानून जे जे केले जाते, मग ते निष्काम असले तरी ते कर्मच, शुभकर्माचे बंधन तर पडतेच. निष्काम कर्मात स्वत: अकर्ता बनत नाही, जोपर्यंत 'मी कोण आहे' हे निश्चित होत नाही, तोपर्यंत अकर्ता कसा होऊ शकेल? क्रोध-मान-माया-लोभ यांची उपस्थिती आणि निष्काम कर्म ह्या दोन्ही गोष्टी एकत्र कशा असू शकतात? 'मी निष्काम कर्म करतो' अशी मान्यता कशी निघून जाईल? निष्काम म्हणजे परिणामाची धारणा न करता, करत राहणे, इतके कोण करू शकेल?

अनुमोदन दोन प्रकारचे आहे, एकात अनुमोदनाच्या आधारावरच क्रिया होते, त्याची जबाबदारी जास्त आहे, तर दुसऱ्यात फक्त हो, हो म्हटले जाते. तसे म्हटले नाही तरी पण होणाऱ्या क्रियेत काहीच फरक पडत नाही. त्याची जबाबदारी फार नसते. धर्मात विपरित अनुमोदन भयंकर दोष बांधते!

## [ 36 ] भाव, भाव्य आणि भावक

आत भावक आहेत तेच भाव निर्माण करवितात, आत्मा नाही. आतील भावक क्रोधक-लोभक-निंदक आणि चेतक सुद्धा आहे. भावक

भाव करवितात त्यावेळी आत्मा भाव्य होऊन जातो, निज स्वरूपाचे भान विसरल्यामुळेच तर असे घडते. भाव्य भावकाशी एकाकार झाला तर योनीत बीज पडते. भाव्य भावकाशी एकाकार न होता वेगळा राहून 'पाहत' राहिला तर बंधन पडत नाही इतकेच आत्मविज्ञान समजण्याची गरज आहे.

भावक वेदनीयही नाहीत, विकल्पही नाहीत, किंवा अंत:करणाचा भागही नाहीत, भावक भाव करवितात तेव्हा आत्मा मूर्च्छित होतो. क्षणोक्षणी बदलत राहतो तो आत्मा असूच शकत नाही, ते भावक आहेत.

प्रमेयानुसार प्रमाता होतो. समृद्धी आणि संसारभाव वाढतो तस तसा त्याचा प्रमेय वाढत जातो, आणि प्रमाताही वाढत जातो. खरे तर आत्मा जेव्हा संपूर्ण ब्रह्मांडात प्रकाशमान होतो तेव्हा त्याला प्रमाता म्हणतात. प्रमेय संपूर्ण ब्रह्मांड आहे, जिथे 'लोक विभाग' आहे तिथे, 'अलोक विभागात' नाही.

## [ 37 ] क्रियाशक्ती : भावशक्ती

भावशक्तीच स्वत:च्या हाती आहे, क्रियाशक्ती नाही. त्यातही मोक्ष मिळवण्याच्या भावाशिवाय अन्य कुठलाही भाव करण्यायोग्य नाही. जे भाव होतात ते निसर्गात जमा होतात. निसर्ग मग त्यांना इतर सर्व संयोग गोळा करून देतो आणि कार्याला रूपकात आणण्यासाठी मदत करतो.

भाव इतकी सूक्ष्म वस्तू आहे की त्याला ज्ञानींशिवाय अन्य कोणीच पाहू शकत नाही! भावामुळे योजना बनतात आणि त्या दुसऱ्या जन्मात फलित होतात. इच्छा, हा परिणाम आहे. भाव, हे कारण आहे. 'या जगातील कोणतीही विनाशी वस्तू मला नको आहे' असा निश्चय झाला की भाव 'सील' होतात (बंदच होतात). स्वरूपज्ञान झाल्यानंतर इच्छा इफेक्टच्या रूपातच असतात.

विचार आणि भाव यात खूप अंतर आहे. ज्ञानाशिवाय भाव समजणारच नाही. विचार हा इफेक्ट आहे. आणि भाव कॉज आहे. भाव द्रव्यात परिणमित होण्यासाठी खूप-खूप वेळ लागतो, भाव कंप्युटरमध्ये जातो, मग त्याला परिपक्व होण्यासाठी दुसरे बरेच संयोग एकत्र यावे लागतात.

प्रतिपक्षी भाव निर्माण झाल्याशिवाय राहतच नाही, 'तो मला असे का बोलला' हा झाला प्रतिपक्षी भाव. पण पराक्रम भावात आलेल्याला तर समजते. की हा माझ्याच कर्माचा उदय आहे!

फक्त मनच नाही, तर पूर्ण अंत:करण बिघडते तेव्हा प्रतिपक्षी भाव निर्माण होतो. मन बिघडले तर प्रतिक्रमण केल्याने ते सुधारते.

ज्ञानींच्या डोळ्यात कुठल्याच प्रकारचा भाव दिसत नाही. प्रतिपक्षी भावच काय, पण कुठल्याही प्रकारचा भाव जिथे नाही, अशा ज्ञानींचे दर्शन घेताच समाधी लागते!

'भाव'चा फॉर्म भरला असेल (भाव निर्माण झाला असेल) तरच दुसरे सर्व एविडेन्सेस एकत्र होतात आणि मग त्याचे फळ येते. ज्याला विवाह करावयाचा नाही, तो विवाह न करण्याचा दृढ भाव ठेवेल तर त्याला तसे एविडेन्सेस मिळतात! पण बीज पेरलेच नसेल, तर मग कितीही पाऊस पडला तरी ते कसे उगवेल? जसे सडलेले बीज उगवत नाही, तसेच डगमगणारा भाव रूपकात न येताच नष्ट होऊन जातो.

स्वरूपज्ञानाच्या प्राप्तीनंतर भावकर्म उडून जाते. फक्त भूतभाव राहतात. भावी भाव होणे बंद होते आणि वर्तमानात तर तो स्वभाव भावातच असतो.

अज्ञानदशेत भावात्मा आहे आणि ज्ञानदशेत ज्ञानात्मा. भावात्म्याजवळ केवळ भावसत्ताच असल्याकारणाने त्यातून निर्माण होणारे भाव निसर्गात जातात, आणि मग निसर्ग त्यांना पुद्‌गलमिश्रित बनवून प्रत्यक्षात आणतो. यात आत्म्याची काहीच सक्रियता नाही. 'व्यवस्थित शक्ती'च सर्व काही 'ॲडजस्ट' करून देते.

ब्रह्मचर्याचे भाव होत-होत भावस्वरूप झाला तर पुढच्या जन्मी सुंदर ब्रह्मचर्य उदयास येते! 'जगत कल्याण' कसे करता येईल? असे भाव होता होता त्याच्या भावस्वरूप तो तसाच भावात्मा होतो. प्रथम तो भावात्मा तीर्थंकर होतो, मग द्रव्यात्मा तीर्थंकर होतो. विकल्प भाव निर्माण करतात! आत परमाणूंची जशी मागणी असेल त्यानुसार 'व्यवस्थित शक्ती' सर्व गोळा करून ती मागणी पूरी करते. भोवऱ्याला दोरी गुंडाळतात, तो भाव आहे आणि सोडल्यावर दोरी उलगडत जाते ते द्रव्य आहे.

शुद्धात्म्याला भाव नसतोच, पण प्रतिष्ठित आत्मा भाव निर्माण करतो. भाव दृढ झाला की तो रूपकात येतो.

क्रमिक मार्गात द्रव्याला तोडत राहायचे असते. अक्रम मार्गात द्रव्य आणि भाव दोघांनाही बाजूला सारले जाते, मग तिथे केवळ शुद्धात्मा पदाची स्थिती राहते.

भावमन भ्रांतीमुळे उत्पन्न होते आणि द्रव्यमन हे फिजिकल (स्थूल) आहे.

मागील जन्मातले भावकर्म या जन्मातील द्रव्यकर्म आहे, आणि ते आवरण स्वरूपात असते, ते आठ कर्मांचे चक्षू (आवरण) आणतात. आणि त्या चक्षूंच्या माध्यमातून पाहिल्यावर तसेच नवे भाव उत्पन्न होतात. ते भाव पुद्गल परमाणू ग्रहण करतात, आणि मग तसे द्रव्य प्रत्यक्षात येते. परमाणू ग्रहण होतात तेव्हा ते प्रयोगशा होतात. ते मग मिश्रसा स्वरूपात आत पडून राहतात. आणि शेवटी कडू-गोड फळ देऊन परत निघून जातात, आणि परत थेट मूळ शुद्ध विश्रसा अवस्थेत येतात. पण ते फळास येताना स्वत: पुन्हा तन्मयाकार झाला तर परत नवीन प्रयोगशा होऊन हे चक्र चालूच राहते. आत्मभावात आल्यानंतर तन्मयाकार होत नाही. त्यामुळे (नवीन) चार्ज होण्याचा प्रयोग थांबतो.

स्वत:ची चूक झाल्यावर मनात 'चूक झाली, चूक झाली' असे वाटत राहते तो प्रतिभाव आहे. ज्ञानींना प्रतिभाव होत नाहीत.

## [ 38 ] 'स्व'मध्येच स्वस्थता

अवस्थेत एकाकार झाला की झाला अस्वस्थ. 'स्व'मध्येच मुक्काम केला की स्वस्थ!

## [ 39 ] ज्ञानाचे स्वरूप : काळाचे स्वरूप

प्रत्येक व्यक्ती प्रारब्धाने बांधलेली तर असतेच. म्हणूनच तर जन्म होतो. ज्ञानप्राप्तीनंतर पुढच्या जन्माचे नवीन प्रारब्ध बांधले जात नाही, असे हे अक्रम विज्ञान आहे.

ज्ञानी पुरुष सतत वर्तमानातच राहत असतात! त्यामुळे त्यांनी 'काळाला वश केले आहे' असे म्हणतात!

# [ 40 ] वाणीचे स्वरूप

जे बोलले जाते ते टेपरेकॉर्डर बोलत असतो, स्वत: बोलत नाही आणि अहंकार करतो की 'मी बोललो!' आत्म्यात बोलण्याचा गुणच नाही. तसेच तो पुद्‌गलाचाही गुण नाही. शब्द तर पुद्‌गल पर्याय आहे. परमाणू घासत-घासत बाज्यातून निघतात तेव्हा आवाज येतो. तसेच हेही आहे.

ज्ञानींची वाणी देखील टेपरेकॉर्डर आहे, चेतन नाही. पण चेतनाला स्पर्शून निघत असते. ज्ञानींची वाणी स्याद्‌वाद, म्हणजेच कोणाचेही किंचितमात्र प्रमाण दुखावत नाही, अशी असते. ही वाणी संपूर्ण जागृतीपूर्वक निघते आणि ती समोरच्याच्या हितासाठीच असते. संसारभाव त्यात मुळीच नसतो.

ज्ञानींची वाणी उल्हासपूर्वक ऐकत राहिले तर स्वत:ची वाणीही तशीच होऊन जाते.

सर्व कर्मांचा क्षय झाला, कषायांचे निर्मूलन झाले, पूर्ण वीतराग विज्ञान हजर झाले, आत्म्याचा स्पष्ट अनुभव आला, अहंकाराची भूमिका संपली, आणि पूर्ण जग निर्दोष दिसले, की स्याद्‌वाद वाणीचा भव्य उदय होतो! तोपर्यंत त्यास बुद्धीची, व्यवहाराची गोष्ट मानली जाते. आणि तोपर्यंत मोक्षमार्गात उपदेश देणे हे भयंकर धोक्याचे मानले जाते. जिथे वाद नाही, विवाद नाही, संवाद नाही, फक्त स्याद्‌वाद आहे, त्यांच्याद्वारेच उपदेश दिला जाऊ शकतो. सत् समजून घेताना संवाद-विवाद होत नाहीत.

स्वत:चे म्हणणे खरे आहे म्हणून समोरच्याने ते मानायलाच हवे, असा भाव देखील भयंकर रोग आहे! खरी गोष्ट समोरचा कबूल करतोच आणि जर कबूल करत नसेल तर आपण सोडून दिले पाहिजे.

बिनचूक वाणी तर तेव्हाच निघते की जेव्हा वाणीवरील मालकीभाव शून्य असेल. 'मी किती चांगले बोललो' असा भाव आला की तिथे वाणीवरील मालकीभाव असतोच.

वाणीने स्वत:चा बचाव करणे, ही धर्मचर्चेची एक रीत झाली, कषायरहित भूमिकेत राहून समोरच्याला कनविंन्स करून (खात्री पटवून) त्याला बदलणे - ही दुसरी रीत आहे, आणि समोरच्याला बदलता बदलता स्वत:च त्याच्या बाजूचे होणे, ही तिसरी रीत.

जिथे वीतराग चारित्र्य आचरणात आहे, अशा ज्ञानींची गोड-मधुर स्याद्वाद वाणी कोणावर आघात-प्रत्याघात करीत नाही. संपूर्ण आग्रहरहित वाणीच समोरच्याच्या हृदयाला स्पर्श करते आणि तेव्हाच लोकांचे कल्याण होते! अशी वाणी बेजोड असते. ज्ञानींना आश्चर्यकारक सिद्धी असते. आपणही भावपूर्वक 'अशी वाणी असावी' अशी प्रार्थना केली तर ती प्राप्त होते.

वचनबळ तर त्याला म्हणतात की ज्या वचनानुसारच सर्व उल्लासपूर्वक आचरण करतात! वाणीचा दुरूपयोग करणे, खोटे बोलणे, समोरच्याला घाबरवणे, खोटयाचा आधार घेऊन स्वत:चा बचाव करणे, दुराग्रह करणे, या सर्वांमुळे वचनबळ नाहीसे होते. समोरच्याच्या हृदयावर घाव घालणाऱ्या वाणीमुळे तिचा फलस्वरूप पुढील जन्मात वाणी बंद होऊन जाते. 'मला कोणालाही जरासुद्धा दु:ख द्यायचे नाही, आणि मला वचनबळ प्राप्त होवो', अशी मागणी ज्ञानींजवळ करत राहिल्याने तशी वाणी प्राप्त होते. जिथे बोलण्यासारखे आहे तिथे मौन राहणे ते मौन तपोबळ. मौनाला महत्त्व नाही, मौनाबरोबर तपोबळ हवे. ज्ञानींचे मौन तपोबळअसते, जे पूर्ण जगाचे कल्याण करणारे असते. मुखावर भावाभावाची रेखा दिसत नसेल तर समजावे की वाणीचे मालकीपण गेले. तिथे संपूर्ण मुक्तदशा असते.

अहंकाराशिवाय वाणी निघतच नाही, वाणी हा खुला अहंकार आहे. 'ज्ञानी पुरुष' स्याद्वाद वाणी बोलतात तेव्हा मात्र त्यांचा अहंकार नसतो, पण त्याशिवाय दुसरे काहीही बोलले तर तो त्यांचा अहंकारच असतो, पण त्याला 'डिस्चार्ज' अहंकार म्हटले जाते.

वाणीचा परिग्रह म्हणजे 'मी कसे बोललो' हा, आणि 'मी बोलत आहे' म्हटले की कर्मबीज पडते. याप्रकारे वाणी संसारात भटकवतेसुद्धा आणि वीतराग वाणी संसारसागर पारही करविते!

हा टेपरेकॉर्डर कशामुळे टेप होतो? अहंकाराच्या प्रेरणेने प्रथम आत वाणीचे 'कोडवर्ड' तयार होतो. मग कोडवर्डमधून शॉर्टहँड तयार होते, आणि त्यानंतर जेव्हा वाजते तेव्हा ऐकू येते, कारण ती (वाणी) 'फुल डिटेल'मध्ये निघत असते म्हणून.

चेहेऱ्यावर भावाभावाची रेषा दिसत नसेल तेव्हा समजावे की वाणीच आपल्या भावानुसार 'टेप' होत आहे. भाव तर फक्त मला याचा अपमान

करावयाचा आहे, इतकाच असतो, मग संयोग मिळाल्यावर तासंतास शिव्या देणारी वाणी आपोआपच निघत राहते. भाव निर्माण होतो, त्याचवेळी तो कोडवर्डमध्ये छापला जातो आणि मग शोर्टहॅंडमध्ये येऊन बाहेर पडतो, तेव्हा 'फुल फॉर्म'मध्ये बाहेर पडतो! आत्मा आणि परमाणू एकत्र येतात तिथे-तिथे आत्म्याच्या उपस्थितीत भावाभावाची स्पंदने उत्पन्न होतात आणि त्यात अहंकार मिसळला की सगळी स्पंदने टाइप होऊन जातात. मागील जन्माचे भाव उदयास येतात आणि त्यानुसारच लगेच टेप होऊन वाणी निघते. जी वाणी निघते, तो निव्वळ गतभावांचा 'डिस्चार्ज'च आहे.

कोणाबद्दल किंचित देखील उल्टे-सुल्टे बोलले गेले तर ते टेप तर होतेच, पण माणसाचे मन, देहसुद्धा असे आहेत की त्यातही टेप होऊन जाते. झोपलेल्या व्यक्तीजवळ उलटे बोलले, तर ते देखील ग्रहण केले जाते. अशी ही निसर्गाची मशिनरी आहे! अंधारात किंवा एकांतात असे काही बोलले गेले असेल तर तसेच कडू आपल्याला ऐकावे लागेल. आपल्याकडून जरासुद्धा उलटी स्पंदने उत्पन्न झाली की त्वरितच प्रतिक्रमण करून त्यांना मिटवून टाकावे.

आपण बोलतो ते तर रेकॉर्ड आहे पण समोरचा बोलतो तेही रेकॉर्डच आहे. एवढे जरी समजले तर मग कधीच कोणाच्या बोलण्याचे वाईट वाटणार नाही.

'स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग, वाणीचे संयोग पर आहेत आणि पराधीन आहेत.' - दादा भगवान.

वाणीची मर्यादा किती? समज केवलदर्शनाची असूनसुद्धा वाणी एकावेळी एकापेक्षा अधिक 'व्ह्यू पॉइंट' क्लिअर (स्पष्ट) करू शकत नाही. याउलट दर्शन एकाचवेळी सर्व डिग्रीवर पोहोचू शकते.

विश्वातील सर्व रहस्यज्ञान, गूढ ज्ञान जाणण्यासाठी आत्मज्ञानी पुरुषांपाशी जाण्याशिवाय गत्यंतरच नाही. म्हणूनच शास्त्रकारांनी 'ज्ञानी पुरुषां'ना स्वयं देहधारी परमात्माच म्हटले आहे. त्यांच्यापाशी गेले तर स्वत:च्या आत्म्याला जाणता येईल.

**-डॉ. नीरूबहन अमीन.**

# अनुक्रमणिका

## [ 1 ] जागृती



## [ 2 ] ध्यान



## [ 3 ] प्रारब्ध-पुरुषार्थ



## [ 4 ] श्रद्धा



## [ 5 ] अभिप्राय

## [ 6 ] कौशल्याचा आंधळेपण



## [ 7 ] अंतराय



## [ 8 ] तिरस्कार-झिडकार



## [ 9 ] व्यक्तित्व सौरभ



## [ 10 ] अक्रम मार्ग



## [ 11 ] आत्मा आणि अहंकार



## [ 12 ] व्यवस्था 'व्यवस्थित'ची



## [ 13 ] व्यवहार धर्म : स्वाभाविक धर्म

## [ 14 ] खरी समज, धर्माची!



## [ 15 ] आचरणात धर्म



## [ 16 ] रिलेटिव्ह धर्म : विज्ञान



## [ 17 ] भगवंताचे स्वरूप, ज्ञान दृष्टीने



## [ 18 ] ज्ञाता पदाची ओळख



## [ 19 ] यथार्थ भक्तीमार्ग



## [ 20 ] गुरु आणि ज्ञानी

## [ 21 ] तपश्चर्येचा हेतू



## [ 22 ] लौकिक धर्म



## [ 23 ] मोक्षप्राप्ती, ध्येय



## [ 24 ] मोक्ष मार्गाची प्रतीती



## [ 25 ] I & My



## [ 26 ] स्मृती-राग-द्वेषाधीन



## [ 27 ] निखालस

## [ 28 ] मुक्त हास्य



## [ 29 ] चिंता : समता



## [ 30 ] संयम परिणाम



## [ 31 ] इच्छापूर्तीचा नियम



## [ 32 ] टी.व्ही. ची सवय



## [ 33 ] लोभाची अटकण



## [ 34 ] लगाम सोडून द्या



## [ 35 ] कर्माची थियरी

## [ 36 ] भाव, भाव्य आणि भावक



## [ 37 ] क्रियाशक्ती : भावशक्ती



## [ 38 ] 'स्व'मध्येच स्वस्थता



## [ 39 ] ज्ञानाचे स्वरूप : काळाचे स्वरूप



## [ 40 ] वाणीचे स्वरूप





# आप्तवाणी
## श्रेणी - 4

## [ 1 ]
## जागृती

### जागृती असावी, अचल स्वभावाची

जिथे आत्मा नाही तिथे 'मी आहे' अशी प्रतिष्ठा केली, त्यामुळे प्रतिष्ठित आत्मा झाला. त्यात चेतन नाहीच. ते 'मेकॅनिकल' चेतन आहे. तो दरअसल (मूळ, अस्सल) आत्मा नाही, केवळ 'मशिनरी'च आहे. जर त्यात पेट्रोल वगैरे टाकले नाही तर ती बंद पडून जाईल. अरे, जरी इथून (नाकातून) हवा आत जाऊ दिली नाही तरी ती सगळी 'मशिनरी' बंद पडून जाईल. मेकॅनिकल चेतन चंचल स्वभावाचे आहे आणि आत जो मूळ आत्मा आहे तो अचल स्वभावाचा आहे, तो कधीच चंचल होत नाही. असा तो अचल आत्मा आहे, आणि तोच परमात्मा आहे, त्रैलोक्याचा स्वामी आहे, पण आत्म्याचे भान आले तर!!! स्वत:ला स्वत:च्या स्वरूपाचे भान आले तर त्रैलोक्याच्या स्वामीसारखे सुख अनुभवास येते. पण इथे तर बेशुद्धपणाच आहे. हे सर्व अजागृत दशेत आहे.

### भावनिद्रेतून जागे व्हा

पूर्ण जग भावनिद्रेत आहे. भावनिद्रा म्हणजे स्वभावात झोपलेला आहे आणि त्या देह निद्रेत तर तो स्वभावात झोपलेला आहे आणि परभावातसुद्धा झोपलेला आहे. देहनिद्रेत देहाचे देखील भान राहत नाही. देहनिद्रेतून देहाचे भान आले की दुसऱ्या बाजूला भावनिद्रा असते. भान नसल्यामुळे स्वत: स्वत:चेच अहित करत राहतो. क्रोध-मान-माया-लोभ, हे भावनिद्रेमुळे होत असतात. कोणाला किंचित्मात्र दु:ख होते ते देखील

भावनिद्रेमुळे होते. पूर्ण जग भावनिद्रेत आहे, त्यातून जागे व्हा. मी तर तुम्हाला एवढेच सांगण्यासाठी आलो आहे की जागे व्हा!

तुला जागे व्हायचे आहे की झोपायचे आहे? असे किती वेळ झोपून राहशील?

**प्रश्नकर्ता :** मी तर जागाच आहे ना?

**दादाश्री :** कोण म्हणतो की तू जागा आहेस? जागा असशील तर कोणाशी क्लेश होणार नाहीत, भांडण होणार नाही, कोणाशी मतभेद होणार नाहीत, चिंता वाटणार नाही.

## पौद्‌गलिक जागृती : स्वरूप जागृती

दोन प्रकारची जागृती : एक पौद्‌गलिक जागृती आणि दुसरी आत्मिक जागृती. पौद्‌गलिक जागृतीवाला पुद्‌गल (जे पूरण आणि गलन होत असते) मध्येच रममाण होतो आणि आत्मिक जागृतीवाला फक्त आत्म्यातच रममाण होतो. पौद्‌गलिक जागृती वाढतच राहते आणि पुद्‌गलमध्ये रममाण होता होता तो शेवटी थकून जातो, त्याला वीट येतो आणि त्यानंतर जेव्हा स्वत:च्या खऱ्या सुखाची इच्छा करतो तेव्हा स्वरूप जागृतीचे सगळे संयोग त्याला प्राप्त होतात आणि हे संयोग जुळून आल्यानंतर मग तो स्वरूप जागृतीत येतो. स्वरूप जागृतीत डोळे थोडे उघडले की मग हळूहळू डोळे पूर्णपणे उघडतात.

## केवलज्ञान अर्थात...

संपूर्ण जागृतीलाच केवलज्ञान म्हटले आहे. दुसरे काही नसतेच. केवलज्ञान ही काही नवीन वस्तू नाही. कुठल्याही ठिकाणी कसलीही गफलत (चूकभूल) होत नाही, अजिबात डुलकी येत नाही, तिचे नाव संपूर्ण जागृती. संसाराची जागृती तर खूप लोकांना असते, पण ती सर्वांशाने नसते.

## संसार जागृती-दु:खाचे उपार्जन

संसाराची जागृती जशीजशी सर्वांशत: होत जाते, तसातसा त्याला

संसार आवडेनासा होतो, संसार दुःखदायी वाटतो. त्यानंतर तो परत स्वतःच्या जागृतीत येण्याचा प्रयत्न करतो. जसजशी या संसाराची जागृती वाढत जाते, तसतशी भौतिक सुखे दुःखासारखी वाटतात. भौतिक सुखे-राजसुखे जंजाळासारखी वाटतात. चक्रवर्ती राजांच्या स्वतःच्या तेराशे राण्या होत्या. चक्रवर्तीचे राज्य होते, तेसुद्धा त्यांना सतत दुःखदायक वाटत असे. कारण ज्याची संसाराची जागृती अतिशय वाढली आहे, अशा सुखाच्या शिखरावर बसलेल्या व्यक्तीला संसाराची जागृतीच दुःखरूप वाटते. म्हणून त्याला वाटते की, मला असे काही नवीन जाणून घेण्याची गरज आहे की ज्यामधून मला पर्मनन्ट सुख मिळेल. प्रत्येक जीव सुखाच्या शोधात असतो. जोपर्यंत खरे सुख मिळत नाही, तोपर्यंत भौतिक सुखात जितकी जागृती असेल त्यानुसार त्याला सुख मिळत राहते. पण या भौतिक सुखात द्वंद्व असते, म्हणून सुखामागून दुःख आल्याशिवाय राहतच नाही आणि आत्मिक सुख हे द्वंद्वातीत आहे. जे सुख मिळाल्यावर मग कधीही जात नाही, ते द्वंद्वातीत सुख-खरे सुख आहे. स्वरूपाची जागृती वाढत जाते, तसतसे खरे सुख प्रकट होत राहते. स्वरूपाचे ज्ञान दिल्यामुळे तुम्हाला जागृती उत्पन्न होते, मग त्यानंतर संसारातील जागृती तर वाढत राहते. परंतु स्वरूप जागृती हीच मुख्य आहे. हे फॉरेनचे सायंटिस्ट जागृती-जागृती बोलतात, पण ती जागृती पुद्‌गलामध्ये असते, अध्यात्माचे भान तर मुळीच नसते. 'यात' तर ते झोपलेले असतात. संपूर्ण जग झोपेतच असते.

## खेळण्यांशी रममाणता

पुद्‌गलाची जागृती म्हणजे विनाशी गोष्टींमध्येच रममाण होणे. म्हणजे हे सर्व खेळण्यांशीच खेळत असतात. संपूर्ण जग खेळण्यांशीच खेळत असते.

उघड्या डोळ्यांनी झोपण्यासारखा हा खेळ आहे. एकदा जागृत झाले की मग खेळण्यांशी खेळत नाहीत. आणि अविनाशी सनातन गोष्टींशी खेळतो तोच खरा जागृत. नाही तर ही खेळणी तुटत राहतील आणि रडत बसावे लागेल, परत तुटतील आणि परत रडावे लागेल,

परत तुटतील आणि परत रडावे लागेल... या विनाशी वस्तूंमध्ये. खेळण्यांशी किती दिवस खेळणार? लहान मुलाला खेळणे दिले आणि ते तुटले, तर तो काय करतो? रडतो ना? तसेच हे लोकसुद्धा खेळण्यांशी खेळतात आणि खेळणे तुटले की रडत बसतात. 'माझा मुलगा मेला!' करत. अरे, हे तर खेळणे तुटले आहे! लहान मुलाला हे कळत नाही की हे खेळणे तुटले तर दुसरे आणता येते!! संसार दुःखदायी नाही, पण अजागृती दुःखदायी आहे.

**प्रश्नकर्ता :** मोक्ष देखील खेळणे आहे का?

**दादाश्री :** नाही, नाही, खेळणे नव्हे! खेळणे कशाला म्हणतात? तर जे विनाशी आहे त्याला. हा मोक्ष तर जातच नाही. जीवमात्राला सुख हवे आहे आणि ते देखील सनातन सुख हवे आहे. आणि असे सुख कधी नाहीसे होत नाही! कोणी कान कापला, खिसा कापला, काहीही केले तरीदेखील हे सुख जातच नाही. कारण त्याला खेळण्यांची आवड राहिली नाही, काही संबंध नाही.

## जागृतीच मोक्षात परिणमित होते

**प्रश्नकर्ता :** मोक्ष आणि जागृती एकच आहे का?

**दादाश्री :** जागृतीमुळेच मोक्ष मिळतो. अजागृती म्हणजे काय? तुमचा कुणाशी मतभेद होणे ही तुमची अजागृती आहे. ज्याला हिताहिताचे भान आहे तो जागृत आणि ज्याला हिताहिताचे भान नाही तो अजागृत, यालाच भावनिद्रा म्हटले आहे. उघड्या डोळ्यांने झोपणे ही भावनिद्रा आणि डोळे बंद करून झोपणे ती द्रव्यनिद्रा. कुणाशी मतभेद होतो त्याचे कारण काय? तर भावनिद्रा.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ जागृती आणि मोक्ष हे दोन्ही एकच आहेत का?

**दादाश्री :** जागृती म्हणजेच केवलज्ञान, तीच मुक्ती आहे. यात दुसरा काही फरक नाही. पण मोक्षाचा परिणाम जागृती नाही, जागृतीचा परिणाम मोक्ष आहे. 'जागृती इज द मदर ऑफ मोक्ष'!

काही लोक मला म्हणतात, 'दादा मला मोक्ष नको आहे.' असे वाकडे बोलल्यावर आम्ही त्यांना म्हणतो की 'मोक्ष नको पण जागृती तर हवी आहे ना?' तर ते म्हणतात 'हो. जागृती तर हवीच, दादा'! त्याला जर विचारले की 'तुला पूर्ण जागृती हवी आहे ना?' तर म्हणेल 'हो पूर्णच हवी आहे.' तर अशा प्रकारे आम्ही सरळ तिकीट देतो, फुकटात दिले तर घेत नाहीत पण पैसे खर्च करून घेतात! असे आपले लोक आहेत, हिताहिताचे भानच नाही.

संपूर्ण जागृती म्हणजेच मोक्ष. संपूर्ण जागृती तेच केवलज्ञान आहे. नव्याण्णव टक्के जागृती असेल आणि त्यात एक टक्का वाढवला म्हणजे शंभर टक्के झाले की केवलज्ञान होते.

आत्मानुभव म्हणजे काय? तर ज्ञान मिळण्याअगोदर जे अनुभव होत असत, त्यापेक्षा वेगळ्या प्रकारचे अनुभव होतात आणि ते अनुभव हळूहळू वाढत जातात, आणि जागृती वाढते. संपूर्ण जागृती म्हणजेच संपूर्ण अनुभव.

## इंद्रियज्ञान : जागृती

ज्ञान दोन प्रकारचे असते. एक इंद्रियज्ञान आणि दुसरे अतींद्रिय ज्ञान. इंद्रियज्ञान सीमित आहे आणि अतींद्रिय ज्ञान असीमित आहे. लोकांना इंद्रियज्ञानातही, संसारातही पूर्ण जागृती नसते. इंद्रियज्ञानात जर संपूर्णपणे जागृत झाला असेल तर त्याला जबरदस्त संतपुरुष म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** इंद्रियज्ञानात संपूर्ण जागृत म्हणजे काय?

**दादाश्री :** पाच ज्ञानेद्रिंये, पाच कर्मेद्रिंये, मन-बुद्धी-चित्त-अहंकार, हे सर्व इंद्रिज्ञानामध्ये येते. जेव्हा कोणी इंद्रियज्ञानाच्या संपूर्ण जागृतीत येतो तेव्हा त्याचा अहंकार असा असतो की त्याचा कोणाशी मतभेद होतच नाही, आपण मतभेद केला तरी पण तो मतभेद होणार नाही अशाप्रकारे निघून जातो. कुठे भांडण होणार असे असेल तर तो मतभेदाचे निवारण करून टाकतो. इंद्रियज्ञानाच्या जागृतीमुळे कोणाशीही किंचित्मात्र संघर्ष होत नाही. 'एवरीव्हेर ॲडजस्टेबल' होऊन जातो, सांसारिक दखल (वाद-भांडण) होत नाही.

इंद्रियज्ञानातही दोन प्रकारच्या जागृती आहेत. एक बाह्य आणि दुसरी आंतरिक. जरी अतींद्रिय ज्ञान मिळाले नसेल, तरी पण इंद्रियज्ञान थोडेच निघून गेले आहे? त्याचे विद्यार्थीसुद्धा हिंदुस्तानात पुष्कळ असतात, पण त्याचे अध्यापक मात्र नाहीत, कॉलेजेस् पण नाहीत.

क्रोध-मान-माया-लोभ यांचे कारण काय आहे?

एखाद्या व्यक्तीचे मतभेद होतात तर त्याचे कारण काय? तर भावनिद्रा. एखाद्याला क्रोध होतो तर त्याचे कारण काय? तर भावनिद्रा. कुणाला लोभ होतो त्याचे कारण काय? तर भावनिद्रा. भावनिद्रेमुळे उपदेश ग्रहण होत नाही. आपल्याला एकदा क्रोध आला तर तेव्हा आपल्याला एक उपदेश मिळतो ना की परत क्रोध करू नये? तरी देखील पुन्हा क्रोध येतो, तीच भावनिद्रा.

क्रोध येणे, लोभ होणे, ही अजागृती आहे. जसजशी अजागृती कमी होत जाते आणि जागृती वाढत जाते. तसतसे क्रोध-मान-माया-लोभ कमी होत जातात. अजागृत म्हणजे क्रोध आल्यावर देखील पश्चात्ताप होत नाही. क्रोध आल्यावर ज्याला पश्चात्ताप होतो त्याला थोडी जागृती आहे, पण तो 'अजागृत' जास्त आहे. क्रोध आल्यानंतर ते लक्षात आले आणि मग ते (पश्चात्तापाने) शुद्ध करून टाकले तर थोडी जागृती आहे असे म्हणता येईल. परंतु क्रोध आल्यावर लक्षातच येत नाही, ती अजागृत दशा! जी जागृती क्रोध नावाचा कमकुवतपणा उत्पन्न करते, तिला जागृती कसे म्हणता येईल? कुठल्याही परिस्थितीत क्रोध येणार नाही, असे असले पाहिजे. जी जागृती क्रोधाचे शमन करते ती जागृती चांगली. खरी जागृती तर येणाऱ्या क्रोधाला आवर घालते ती. लोकांना जागृती नसते.

सध्या माणसांमध्ये जी एखादा टक्का जागृती आहे, ती नाभी पुरतीच आहे. इतर सगळीकडे अजागृत दशा आहे, या नाभीप्रदेशात जे रूचकप्रदेश खुले आहेत ना, तेवढीच जागृती आहे. बाकी, जागृती राहिलीच नाही, जागृती संपूनच गेली आहे. जागृती वाढत-वाढत 360 डिग्रीची झाली की ते केवलज्ञान म्हणायचे. जागृती 359 डिग्री असेपर्यंत तिला जागृतीच म्हणतात.

क्रोध-मान-माया-लोभ ही सर्व अजागृती आहे. कोणी मला विचारले की 'ही अजागृती कशा प्रकारे? ते समजवा.' तर आम्ही त्यांना विचारतो, 'तुला क्रोध-मान-माया-लोभ काढायचे आहेत की नाही?' तर म्हणतो, 'हो काढायचे आहेत.' 'काढायचे आहेत' असे म्हणाला म्हणजे तो जागृत आहे. पण क्रोध-मान-माया-लोभ यांना जेवण देणे (पोषण करणे) ही अजागृती आहे. ज्यांना काढायचे आहे त्यांनाच जेवू घालतात म्हणून ते टिकून राहतात. जर तीन वर्षे त्यांना जेवण दिले नाही तर ते उभे देखील राहणार नाहीत. मनुष्य अजागृत आहे, आणि ही जनावरे सुद्धा अजागृत आहेत, मग दोघांना सारखेच म्हणायला हवे ना? म्हणजे त्यांना मनुष्यगतीचा लाभ मिळाला नाही.

## निजदोष दर्शन

स्वत:चे दोष दिसले तर समजावे की जागृत झाला आहे, नाहीतर सर्व झोपेतच असतात. दोष संपले की नाही याची जास्त चिंता करण्याची गरज नाही, पण जागृती असण्याचीच मुख्य गरज आहे. जागृती असल्यावर नवीन दोष निर्माण होत नाहीत आणि जे जुने दोष असतील तर ते निघत जातात. तुम्ही त्या दोषांकडे पाहा की कोणकोणत्या प्रकारचे दोष होत आहेत.

स्वत:चे दोष दिसले की समजावे आता मोक्षाला जाण्याची तयारी झाली. जागृतीशिवाय कोणालाही स्वत:चे दोष दिसत नाहीत. दुसऱ्यांचे दोष दाखवायचे असतील तर मात्र दोनशे-पाचशे दोष दाखवेल! आपले दोष जर कुणाला नुकसानकारक असतील तर आपण 'चंदुभाई'ला सांगावे की, 'प्रतिक्रमण कर.' कुणाला किंचित्‌मात्र दु:ख देऊन कोणी मोक्षाला जात नाही. रोज आमरस-पुरी खात असेल तर काही हरकत नाही, पण दु:ख देऊन मोक्षाला जाता येईल असे शक्य नाही. इथे तुम्ही 'काय खाता, काय पिता' याला तिथे काही किंमत नाही. पण तिथे तर कषाय असता कामा नये. आणि अजागृती असता कामा नये. जग झोपेत आहे असे का म्हटले? कारण 'स्व-परचे' भान नाही. स्वत:चा, स्व आणि परच्या हिताहिताचे भान राहिले नाही. मोक्षासाठी कषाय असता कामा नयेत.

## 'टॉपमोस्ट' जागृती

आमची जागृती 'टॉप' वर असते, तुम्हाला कळणारही नाही. पण तुमच्याशी बोलताना जिथे आमची चूक होते तिथे आम्हाला लगेच समजते आणि लगेचच आम्ही ती धुऊन टाकतो. त्यासाठी यंत्र ठेवले आहे, त्यामुळे लगेचच धुऊन निघते. आमचे सूक्ष्मतर आणि सूक्ष्मत्तम दोष शिल्लक आहेत, पण ते जगातील कोणत्याही जीवाला किंचितही नुकसानकारक नाहीत. आम्हाला सर्व जग निर्दोष दिसते. आम्ही स्वत: निर्दोष झालो आहोत आणि सर्व जग निर्दोषच पाहतो. अंतिम प्रकारची जागृती कोणती? तर जगात कोणीच दोषी दिसत नाही ती.

ज्ञाता-ज्ञेय रूपात जगातील सर्व ज्ञान हजर राहते ती संपूर्ण जागृती, ती आम्हाला असते. आणि ज्यांना आमचे ज्ञान मिळाले आहे त्यांना किती जागृती असली पाहिजे की काहीही घडले तरी आमची 'पाच वाक्ये' 'ॲट अ टाइम' (तत्क्षणी) हजर व्हायला हवीत आणि आत अजिबात चलबिचल होता कामा नये. कुठलाही देहधारी असो, झाड असो, पक्षी असो, त्यात शुद्धात्मा पाहत पाहत चालावे. अशी जागृती असेल तिला 'टॉपमोस्ट' (सर्वोच्च) जागृती म्हटले आहे. त्याहून पुढची 'टॉपमोस्ट' जागृती कुठली? तर मी 'चंदुभाई'शी बोलताना निश्चयाने 'हा चंदुभाई कोण आहे', हे लक्षात ठेवून बोलेन, 'तो शुद्धात्मा आहे' हे लक्षात ठेवून त्याच्याशी बोलले जाते. 'जागृती' ही तर फार 'उच्च' गोष्ट आहे.

## भाव जागृती - स्वभाव जागृती

**प्रश्नकर्ता :** भावजागृती म्हणजे काय?

**दादाश्री :** भावजागृती क्रमिक मार्गात असते. अक्रम मार्गात स्वभाव जागृती असते. भावजागृती प्रकृतीला घडविते आणि स्वभाव जागृती प्रकृतीपासून निर्लेप ठेवते. माझी पाच वाक्ये तुम्हाला स्वभाव जागृतीत ठेवतात. मी तुमची भावजागृती संपवली आहे. सारे जग भावनिद्रेत अडकले आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे भावजागृतीमुळे बीज पडते?

**दादाश्री :** हो. 'मी चंदुभाई आहे' असे म्हणून दान देण्याचा भाव केला तर बीज पडते. स्वभाव जागृतीत आल्यानंतर तुम्ही बोलता खरे की 'मला दान द्यायचे आहे.' पण त्याचे बीज पडत नाही. कारण निरंहकारी आहात म्हणून.

स्वत:चा स्वभाव काय आहे हे जाणत नसल्यामुळे भावनिद्रा म्हटले आहे. स्वत:चा स्वभाव जाणणे हे निरालंब दर्शन आहे. निरालंब ज्ञान आहे.

## जागृतीची सुरुवात...

प्रथम पुद्‌गलमध्ये जागृती यायला हवी. आत्मभान झाल्यावर पुद्‌गलामध्ये झोपलात की मग आत्मजागृती उत्पन्न होते. दूध सांडले तर लहान मुले कटकट करतात का? नाही. का? तर 'अज्ञानामुळेच.' मग मुले जशी मोठी होतात तसतशी पुद्‌गलाची जागृती येते, तेव्हा मग कटकट करायला लागतात. त्यानंतर आत्मजागृतीची वेळ येते. या बालकांना व्यवहार जागृती नसते. कोणालाच व्यवहार जागृती नसते. व्यवहार जागृती असेल तर घरी किंवा बाहेर मतभेद होणार नाहीत. कुणाशीही संघर्ष होणार नाही. संसारात जागृती कशाला म्हणतात? तर स्वत:च्या घरात क्लेश होण्याची पाळी येऊ न देणे, याला. व्यवहारातील जागृतीत लोभ-कपट-मोह जबरदस्त असतात आणि निश्चयाच्या जागृतीत तर क्रोध-मान-माया-लोभ संपूनच गेलेले असतात. झोप काय आहे? आणि जागेपण काय आहे? ते तर समजायला हवे ना? लोक तर असेच समजतात की ते पीएच.डी. झाले आहेत. जागृत मनुष्य तर खूप अजब असतो, मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार अंत:करणाच्या या चारही भागांच्या प्रत्येक कार्यात जी हजर राहते, तिला जागृती म्हणतात!

जागृती कशाला म्हणतात? स्वत: स्वत:पासून कधीही कुठल्याही परिस्थितीत क्लेशित होत नाही, तिथून जागृतीची सुरुवात होते. मग दुसऱ्या 'स्टेपिंग'मध्ये दुसऱ्यांमुळे देखील स्वत: क्लेशित होत नाही, तेथून थेट सहज समाधीपर्यंत जागृतीच असते. जर जागे झालात तर जागे होण्याचे फळ मिळायला हवे. क्लेश होत असतील तर जागे आहात असे कसे म्हणता येईल? कोणाला थोडेही दु:ख दिले तर त्याला जागृत

कसे म्हणता येईल? क्लेशरहित भूमिका तयार करणे याला फार मोठा पुरुषार्थ केला असे म्हणतात.

## योग-क्रियाकांड जागृती देत नाहीत

**प्रश्नकर्ता :** लोक पूजा, जप, तप वगैरे करतात, तर काय त्याच्यामुळे स्वत:च्या जागृतीसाठी काही मदत होते का?

**दादाश्री :** त्या गोष्टी ज्या हेतूने केल्या जातात त्या हेतूनुसार फळ मिळते. एखाद्याला लग्न करायचे असेल आणि पत्नी मिळत नसेल, तर तप, पूजा केल्याने त्याला पत्नी मिळेल. ज्या हेतूसाठी करतो ते मिळून जाते.

**प्रश्नकर्ता :** त्याने आध्यात्मिक प्रगती होत नाही का?

**दादाश्री :** अध्यात्म्याच्या हेतूने केले तर आध्यात्मिक फळ मिळेल. परंतु आध्यात्मिकसाठी कुणी सहसा करत नाही. सर्वांना जळजळ (दु:ख) होत असते, त्या जळजळीवरच औषध हवे असते. लोकांना या संसारातील दु:खांची जळजळ होत असते. लोक जागृतीसाठी काही करतच नाहीत. कोणाला मानाची भूक, कोणाला कीर्तिची भूक, तर कोणाला शिष्यांची भूक, या सर्वांची भूक लागलेली आहे. अध्यात्मात मान नाही, कीर्ति नाही, कुठलीही अपेक्षा तिथे नाही. आणि हे लोक अशुभातच पडलेले आहेत, काही लोक मान मिळवण्यात, तर काही कीर्तित, सांसारिक वस्तूंमध्ये, भोगविलासामध्येच गुंतलेले आहेत. अध्यात्म मार्गात असे किती लोक असतील? क्वचितच कोणी असेल. जास्त करून सर्व मानाचेच भुकेले आहेत.

एका क्षणापुरती जरी ही झोप उडाली तरी सगळीकडे प्रकाश पसरेल. रोजच्या क्रमात राहत असेल आणि त्यातच तन्मयाकार असेल त्याला हा झोपेत आहे असे म्हणतात. चरम ज्ञानाच्या तुलनेत मी असे सांगतो की, हे जे जप-तप करतात, ते त्यातच तन्मयाकार असतात. त्यातून एक मिनीट जरी जागृत झाले तरी खूप झाले. ज्याला स्वत:चे दोष दिसतात आणि जो निष्पक्षपाती जजमेंट देऊ शकतो, त्याला जागृत

म्हणतात. जो जागृत आहे त्याच्या हाती सत्ता येते. संपूर्ण जागृत व्यक्तीच आपल्याला जागृत करू शकते.

**प्रश्नकर्ता :** कुंडलिनी जागृत करतात ते काय आहे?

**दादाश्री :** ती मेकॅनिकल जागृती आहे, तिचे आणि दरअसल (खऱ्या, अस्सल) जागृतीचे काहीही देणेघेणे नाही. कुंडलिनी जागृत झाली म्हणजे आत्मा जागृत झाला असे थोडेच म्हणता येईल? ती एक प्रकारची मादकता आहे. त्यामुळे एकाग्रता राहते आणि शांती वाटते. खऱ्या ज्ञान जागृतीची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** जे लोक 'मेडिटेशन' करतात, ते सर्व म्हणतात की मेडिटेशन खूप उपयोगी आहे, तर ते काय आहे?

**दादाश्री :** 'मेडिटेशन' केवळ मादकता आहे. त्याने शांती मिळते. ज्याला दु:खाची जळजळ होत असते त्याला मेडिटेशन केल्यामुळे शांती वाटते. तुम्ही ज्ञान घेतले तेव्हापासून तुम्हाला शुद्धात्म्याचे लक्ष राहते की नाही?

**प्रश्नकर्ता :** दादा, ते तर निरंतर राहते.

**दादाश्री :** तेच ध्यान आहे. मग आणखी दुसरे ध्यान कशासाठी? हे जे नाक दाबून करतात त्याला ध्यान म्हणत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आम्ही घरी आपले (दादांचे) ध्यान करतो त्याला प्रत्यक्ष म्हणायचे की परोक्ष?

**दादाश्री :** ते प्रत्यक्ष आहे. जोपर्यंत आम्ही हजर आहोत तोपर्यंत हा आमचा फोटो देखील प्रत्यक्ष आहे. 'मी शुद्धात्मा आहे' हे ध्यान जर कदाचित काहींना राहत नसेल, पण 'दादा'च ध्यानात राहत असतील तर ते दोन्ही एकच आहे. कारण 'ज्ञानी पुरुष' हेच तुमचा आत्मा आहेत.

**प्रश्नकर्ता :** मेडिटेशन शून्यतेत घेऊन जाते का?

**दादाश्री :** नाही. त्यामुळे स्पंदने वाढतात. इगोइजम वाढतो.

**प्रश्नकर्ता :** ही जी चक्रे आहेत, त्या चक्रांसारखे काही नाहीच का?

**दादाश्री :** आहे. ती सर्व चक्रे इलेक्ट्रिकल इन्सटॉलेशन्स् आहेत. आणि त्या चक्रावर ध्यान केल्यामुळे एकाग्रता होते. मन चांगले होते, स्थिरता येते पण अहंकार वाढतो. फक्त खरे ज्ञानच असे आहे की ज्यात 'काउंटरवेट'ची गरज नसते. बाकी, इतर सर्व गोष्टीत 'काउंटरवेट'ची गरज असते. जी वस्तू घ्याल त्याच्या बदल्यात दुसरी वस्तू द्यावी लागते. म्हणून एकाग्रता वगैरे केली तर अहंकार वाढतो आणि त्यामुळे नुकसान होते! फक्त एक यथार्थ ज्ञानाचा मार्गच सेफसाइडवाला (सुरक्षित) आहे, की ज्यात दुसरी कुठली समस्या निर्माण होत नाही.

या मेडिटेशनमुळे स्वतःला काय फायदा झाला याचा आपण विचार केला पाहिजे. आपले क्लेश कमी झालेत का? जर आपले क्लेश कमी झाले असतील तर 'रिलेटिव्ह' धर्म प्राप्त झाला असे म्हणावे लागेल. आणि क्लेश नष्ट झाले तर 'रियल' धर्म प्राप्त झाला असे म्हणावे लागेल. क्लेश करविणारे कोण आहे? तर अज्ञान. जितके 'रिलेटिव्ह' धर्म आहेत ते सर्व अज्ञानात ठेवणारे आहेत.

दोन प्रकारचे ध्यान आपोआपच होत असतात. आर्तध्यान आणि रौद्रध्यान. याउलट धर्मध्यान आणि शुक्लध्यान यांना पुरुषार्थ म्हटले जाते. आत्मध्यान म्हणजेच शुक्लध्यान. 'मी शुद्धात्मा आहे' असे ध्यान राहणे, हेच शुक्लध्यान.

## जागृती, जागृत असलेल्याच्या आराधनेमुळेच

**प्रश्नकर्ता :** आपण वदवून घेता ते मंत्र, आरती हे सर्व काय आहे? या सर्वांची काय आवश्यकता आहे?

**दादाश्री :** असे आहे, की हे जे वदवून घेतो, ते पूर्ण जागृत लोकांचे नाव घेऊन वदवितो. जे जागृत आहेत त्यांची भक्ती शिकवितो. जे जागृत आहेत त्यांचे स्मरण केले तर तुमची जागृती वाढते. त्यातील जेवढे जागृत होऊन गेले आहेत आणि (सध्या) जितके जागृत आहेत, त्यांना नमस्कार सांगितला आहे आणि त्यातही सध्या जे जागृत आहेत, त्यांचा विशेष उल्लेख आहे आणि जे होऊन गेले आहेत त्यांचा सामान्य

उल्लेख आहे. हे नमस्कार तर सर्व जागृतांना प्रसन्न करतात, विनय व्यक्त करतात, प्रेमभाव व्यक्त करतात. हे सायंटिफिक आहे. इथे सर्वजण जसे करतात, तसे आपणही केले तर आपल्यावर 'ज्ञानी पुरुष' प्रसन्न होतात. स्वत:चा शहाणपणा केला की बिघडलेच म्हणून समजा. आपल्या सर्वांची दुनिया तर एकच आहे, पण तशा दुसऱ्या दुनियेबरोबर 'ज्ञानी पुरुषां'ची तार जोडलेली आहे. आता जे संपूर्ण जागृत आहेत, त्यांच्यासोबत आम्ही तार जोडून देतो, जे आमच्यापेक्षा थोड्या अंशाने विशेष जागृत आहेत, त्यांच्याबरोबर तुमची तार जोडून देतो. ती तार जोडल्यामुळे त्यांची ओळख होते.

## भावनिद्रा टाळा

म्हणूनच 'ज्ञानी पुरुष', सर्व जग भावनिद्रेत आहे असे म्हणतात. लोक व्यापार-धंदा करतात, त्यात पैसे कमवायच्या मागे लागलेले असतात, त्यामुळे त्यांची त्या एका बाजूची झोप उडालेली असते आणि इतर सगळीकडे भावनिद्रेत असतात! म्हणून धर्माचा एक थेंबही त्यांनी प्राप्त केलेला नसतो. धर्म तर, रात्रीदेखील क्षणभरही भावनिद्रा होऊ देत नाही. सर्व प्रकारचे भाव उत्पन्न होतात असा हा 'लोक' आहे, तेव्हा त्यात भावनिद्रा लागता कामा नये. देहनिद्रा आली तर चालेल.

**प्रश्नकर्ता :** भावनिद्राच येते, दादा.

**दादाश्री :** असे कसे चालेल? ट्रेन अंगावर येत असेल तेव्हा तर भावनिद्रा येत नाही. त्या ट्रेनमुळे तर एका जन्माचे मरण होईल. पण भावनिद्रेमुळे तर अनंत जन्मांचे मरण होईल. चित्र-विचित्र भाव निर्माण होतात असे हे जग आहे. त्यात (योग्य काय ते) तुमचे तुम्हाला समजायला हवे. तुम्ही जर भावनिद्रेत असाल तर जग तुम्हाला चिकटेल. जिथे भावनिद्रा येत असेल तिथे प्रतिक्रमण करावे.

## खरी समाधी जागृतीसहित

मोठी मोठी धार्मिक वाक्ये लिहिणे, ही देखील भावनिद्रा आहे. कोणाला देह समाधी लागते, ते तर मनाच्या थरांमध्ये अडकलेले असतात.

खरे तर समाधीत सर्व प्रकारची जागृती असते. मन-वचन-कायेने एका एका केसाची (अतिशय सूक्ष्म) जागृती असते.

**प्रश्नकर्ता :** मनाच्या समाधीत आनंद कुठून येतो?

**दादाश्री :** ती तर मानसिक समाधी आहे. नाही तर खरी समाधी तर संपूर्ण जागृतीसहित असते. संपूर्ण जागृत व्यक्तीचे आचरण तर जगात उच्चतम असते. जशीजशी जागृती वाढत जाते तशीतशी जगाची विस्मृती होते, आणि तरीसुद्धा जगात तो अतिशय चांगली कामे करू शकतो. जितकी जागृती असेल तितके सुख तुम्हाला प्राप्त होईल. जितकी जागृती तितकी मुक्ती अनुभवास येईल. जितकी जागृती तितका मोक्ष अनुभवास येईल. जागृती म्हणजेच मोक्ष. जागृत होण्याचे हेच ठिकाण आहे. येथे आम्ही तुम्हाला जागेच करत आहोत. जसे प्रेमभंग झालेला मनुष्य मनाच्या कुठल्यातरी कोपऱ्यात उतरतो, तसेच हे समाधीवाले मनाच्या कुठल्यातरी कोपऱ्यात खोलवर उतरतात आणि त्यातच आनंद घेतात. खरी समाधी कशाला म्हणतात? तर बाहेर संपूर्ण जागृत आणि आतही संपूर्ण जागृत असतो, त्याला. एव्हरीव्हेर (सगळीकडे) जागृत असतो. त्याची खरी समाधी उठता, बसता, खाता, पिता देखील जात नाही. आधि-व्याधी-उपाधीत देखील सतत टिकून राहते, ती खरी समाधी. त्याला सहज समाधी म्हणतात, निर्विकल्प समाधी म्हणतात.

## 'मी' कोण आहे? हे जाणल्यामुळे जागृती उघडते

**प्रश्नकर्ता :** साधारणपणे जागृती कशाला म्हणतात?

**दादाश्री :** पूर्ण दिवस तर निघून जातो. त्यात खाणे-पिणे, चहा-पाणी यांचे हिशोब चालतात. जागृती नसल्यामुळे लोक दिवसभर कशा ना कशात तरी, कुठल्यातरी विषयात गुंतलेले असतात. जो जगाच्या कुठल्यातरी विषयात गुंतलेला असतो त्याला तुम्ही जागृती म्हणता. पण ती तर 'सबजेक्ट जागृती' आहे. जगातील लोकांना तर विषय आणि लक्ष्मी यातच जागृती असते. याउलट यथार्थ जागृती तर प्रत्येक बाबतीत असते, सर्वग्राही असते.

साऱ्या जगातील सगळ्या प्रकारच्या क्रिया, या एकाग्रता करण्यासाठी

आहेत, आणि ज्या क्रियेमुळे व्यग्रता होत असेल तर तो चुकीचा उपाय केला असे म्हणावे लागेल. जप-तप वगैर सर्व एकाग्रतेसाठी आहे. ज्याला एकाग्रता साधत नसेल त्याने जपयोग केला पाहिजे, किंवा इतर काहीतरी केले पाहिजे ज्याने एकाग्रता साधेल. जसजशी एकाग्रता वाढत जाते, तसतशी भावनिद्रा हलकी होत जाते. कोणाची भावनिद्रा हलकी असते, तर कोणाची गाढ असते. अंगावर पाणी टाकले किंवा हलवले तरी जाग येणार नाही, अशा गाढ भावनिद्रेत हे लोक पडलेले आहेत. आम्ही जेव्हा स्वरूपाचे ज्ञान देतो, तेव्हा डोळे थोडेसे उघडतात. मग त्याला दिसते की मी तर या सर्वाहून वेगळा आहे. मग जसजसे आमच्याबरोबर बसतो, तसतसे डोळे थोडे थोडे उघडत जातात. नंतर संपूर्ण जागृती होते. म्हणून आत्मा जाणावा लागेल. आत्मा जाणल्याशिवाय तर कोणालाही 'तिथे' (मोक्षात) प्रवेश मिळत नाही.

## जिथे अकर्तापद तिथे संपूर्ण जागृती

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला जाणले असे कधी म्हणावे? कर्तापद सुटते तेव्हा?

**दादाश्री :** 'मी हे करत आहे' असे भान जेव्हा तुटते तेव्हा आत्मा जाणला असे म्हणता येईल. दिवसभर (स्वत:च्या) चुका दाखवीत राहतो, तो आत्मानुभव. 'मी हा संसार चालवतो' असे वाटत नाही का आपल्याला?

**प्रश्नकर्ता :** संसार तर आपोआपच चालतो.

**दादाश्री :** ते तर जेव्हा काही चांगले झाले असेल, कोणी स्तुती केली, की 'अरे, यांनी हे किती छान काम केले' तेव्हा म्हणणार की 'मी केले होते' आणि काही चुकीचे झाले तेव्हा म्हणणार 'माझ्या कर्मांनी मला घेरले आहे.' सर्व जग असेच बोलते. कर्तापद कधीच सुटत नाही. बाकी सर्व सुटते पण कर्तापद मात्र सुटत नाही. कर्तापदाचे भान जात नाही, तोपर्यंत अहंकारी म्हटले जाते आणि अहंकार म्हणजेच भ्रांती. संपूर्ण भ्रांती असलेल्यांना 'तिथे' प्रवेश दिला जात नाही. कर्तापदाचे भान तुटायला नको का? लोक शुद्धात्मा बोलतात पण त्याने काहीही निष्पन्न

होत नाही. जेव्हा कर्तापदाचे भान तुटते आणि खरा कर्ता कोण आहे ते समजते तेव्हा पुढचे काम होते. नाही तर कसे होईल? जोपर्यंत कर्तापद आहे तोपर्यंत आध्यात्मिक जागृती नाही असेच मानले जाते. कर्तापद सुटल्याशिवाय मोक्षाच्या दरवाज्यात कोणी शिरूच देत नाही!

'मी चंदुलाल आहे' ही भ्रांती तुटली पाहिजे व कर्तापद सुटले पाहिजे. मग नाटकी-ड्रॅमॅटिक कर्तापद राहते. ड्रॅमॅटिक कर्तापद म्हणजे काय? तर 'मी केले' असे फक्त म्हणतो. जसे भर्तृहरी राजा नाटकात बोलतो की 'मी राजा आहे.' पण त्याचबरोबर 'मी लक्ष्मीचंद आहे आणि घरी जाऊन मला खिचडी खायची आहे', हे तो विसरत नाही. त्याचप्रमाणे 'मी शुद्धात्मा आहे' हे तुम्ही विसरत नाही. आणि 'हे मी केले' असे तुम्ही म्हणता ते ड्रॅमॅटिक असते. कर्तापदाचे भान तुटायला हवे. नाही तर लोक 'शुद्धात्मा, शुद्धात्मा' असे बोलतच राहतात ना? शास्त्रांमध्ये तर हे स्पष्टच लिहिले आहे, त्याप्रमाणे तो गात राहतो. पण त्यामुळे त्याच्या पदरी काहीच पडत नाही.

## उपयोग म्हणजे काय? जागृती म्हणजे काय?

**प्रश्नकर्ता :** उपयोग आणि जागृती हे दोन्ही समजावावे.

**दादाश्री :** जागृतीला एका विशिष्ट जागी केंद्रित करणे याला उपयोग म्हणतात. जागृती सांसारिक नफा-नुकसान या सारख्या इतर गोष्टींमध्ये जात नाही. जागृतीला एकाच ठिकाणी केंद्रित करणे, याला उपयोग म्हणतात! जिथे जागृती वर्तते, (असते) तोच उपयोग. पण याला शुभाशुभ उपयोग म्हणतात. आणि शुद्ध उपयोग कशाला म्हणतात? तर जो उपयोग शुद्धात्म्यासाठीच सेट केला जातो त्याला. 'ज्ञानी पुरुषांच्या' आज्ञेत उपयोग राहिला, 'रियल-रिलेटिव्ह' पाहत पाहत चालत राहिला तर समजावे अंतिम दशा आली. लोक तर रस्त्यात ही 'स्टील ट्रेडींग कंपनी, ही अमुक-तमुक कंपनी', असे इकडे तिकडे पाहत राहतात. अशा प्रकारे इतर उपयोगात राहणे याला अशुभ उपयोग म्हणतात. उपयोग जर धर्मासाठी असेल तर ते चांगले आहे. आणि शुद्ध उपयोगाची तर गोष्टच वेगळी ना!

## अक्रम विज्ञानामुळे जागृती

या जगाच्या जागृतीला पौद्‌गलिक जागृती म्हणतात. ज्याला या संसाराची जागृती आहे, तो खूप हुशार मनुष्य असतो. दिवसभर जागृत आणि जागृतच असतो. त्या जागृतीत थोडा देखील प्रमाद होत नसला तरी पण तिला पौद्‌गलिक जागृतीच म्हणायचे, तिचे फळ म्हणजे संसार. आणि आपली 'ही' जी जागृती आहे, तिचे फळ म्हणजे केवलज्ञान. येथील क्रियांना पाहून लुभावून जाऊ नका. येथील सर्व क्रिया इथेच संपणार आहेत. येथील सर्व क्रिया 'कॅश' (रोख) फळ देणाऱ्या आहेत. म्हणूनच आम्ही कोणाकडून त्याग करविला नाही ना! आणि 'या' विज्ञानाने हे सर्व शोधून काढले आहे की हे जग काय आहे? आणि काय नाही? कशाच्या आधारे हे सर्व चालते? अनंत जन्मांचा हा आमचा शोध आम्ही उघड करत आहोत. नाही तर तासाभरात मोक्ष होतो असे कधी ऐकले आहे का? करोडो जन्मांतसुद्धा याचा पत्ता लागत नाही, पण आम्ही तासाभरातच तुम्हाला तुमच्या स्वरूपाचे भान करवून देतो. संपूर्ण जगाला मान्य करावे लागेल असे हे विज्ञान आहे. 'जग काय आहे? काय नाही? इथे फळ देणारे काय आहे? आणि तिथे फळ देणारे काय आहे? किती भागात चेतन आहे आणि किती भागात निश्चेतन आहे? जग कोण चालवितो?' हा सर्व आमचा शोध आहे.

## कुठलाही आग्रह म्हणजेच भावनिद्रा

जोवर माणसाला कसलाही आग्रह आहे, तोवर तो भावनिद्रेतच आहे. मोक्षाला जाण्यासाठी आग्रह ही चुकीची गोष्ट आहे. असे जेव्हा लक्षात येते, तेव्हापासून जागृती सुरू होते. आता तर नुसते आग्रही नाही तर मताग्रही, दुराग्रही देखील झाले आहेत. जातीचा आग्रह असेल तर त्याला कदाग्रही म्हटले आहे. तो फार धोकादायक नाही. पण मताचा आग्रह म्हणजे, 'मी जैन, मी वैष्णव, मी स्थानकवासी, मी देरावासी, मी दिगंबर' हे सर्व धोकादायक आहे.

## हिताहिताचा विवेक ही देखील जागृतीच

वीतरागांचा मार्ग काय सांगतो की 'तो चुकला आहे' असे तुम्ही

म्हणता तेव्हा ती तुमचीच चूक असते. त्याच्या दृष्टीत फरक आहे, म्हणून त्याला तसे दिसते. त्यात त्याचा काय दोष? एखादा आंधळा भिंतीवर आपटला तर काय त्याला ओरडायचे की तुला दिसत नाही का? अहो, दिसत नाही म्हणूनच आपटला ना? तसेच हे सर्व जग उघडया डोळ्यांनी झोपलेले आहे. या सर्व क्रिया होत आहेत त्या सर्व झोपेतच होत आहेत. स्वप्नातच हे सर्व होत आहे. आणि मनात मात्र असे मानतात की आम्ही तर कितीतरी क्रिया करत असतो. पण या स्वप्नातील क्रिया काही कामाच्या नाहीत. जागृत अवस्थेतील क्रियांची गरज आहे. हे सर्व लोक तर उघड्या डोळ्यांनी झोपले आहेत.

जागृत कोण असतो? तर ज्याला स्वत:च्या हिताहिताचे भान आहे तो. सर्व जग मानते की 'मला हिताहिताचे भान आहे.' पण त्याला हिताहिताचे भान म्हणत नाहीत. स्वत:चेच अहित करीत असतो, लक्ष्मी गोळा करण्यासाठी रात्रंदिवस हिताहित शोधत असतो, ती लोकसंज्ञा आहे. त्यामुळे रात्रंदिवस खाऊन-पिऊन पैशांच्याच मागे लागतात. पाहा ना, 'ऑन'चा व्यापार (मूळ किंमती पेक्षा जास्त किंमतीत विकणे) चालू केला आहे! या हिंदुस्तानात काय 'ऑन'चा व्यापार करावा? लपून-छपून कामे करणे ही अधोगती आहे. हिंदुस्तानात जन्मला तर जन्मल्यापासूनच तो काही अंशी सांसारिक जागृती घेऊनच आलेला असतो. एकतर सांसारिक जागृती आणि त्यात कलियुग, त्यामुळे चैनच पडत नाही. सतयुग असेल तर चैन पडते. या लहान मुलांना त्यांच्या खेळण्यांपुरतीच जागृती असते. तसेच या लोकांना दिवसभर 'इन्कमटॅक्स' आणि 'सेल्सटॅक्स' याचीच जागृती, पैशांचीच जागृती असते. हिंदुस्तानातील लोकांनी असे असावे? हिंदुस्तानातील माणूस जर पूर्ण जागृत झाला तर साऱ्या जगाला बोटावर नाचवील! पण हे लोक तर बिनहक्काची लक्ष्मी आणि बिनहक्काचे विषय, यांच्या मागेच लागले आहेत. पण त्यांना माहीत नाही की जाताना तिरडी निघते तेव्हा त्याच्या नावावर असलेला सर्व बँक बॅलन्स निसर्गाच्या जप्तीत जातो. निसर्गाची जप्ती म्हणजे रिफंडही मिळत नाही. सरकारनी घेतले असेल तर रिफंड तरी मिळतो, पण ही तर निसर्गाची जप्ती आहे. म्हणूनच आपण कोणते काम करून

घ्यायला हवे? तर आत्म्याचे. भले आत्म्याच्या बाबतीत काही समजत नसेल पण परलोकासाठी तरी करा! परलोकाचे बिघडणार नाही, एवढे तरी पाहा! हा लोक तर बिघडलाच आहे. यात तर काहीच फायदा नाही. जर हिताहिताचे भान असेल तर तो मला सोबत काय घेऊन जायचे आहे, याचा विचार करील आणि ते पुरेसे आहे.

## जिथे ज्ञानी जागृत, तिथे जग...

**प्रश्नकर्ता :** श्रीकृष्णानी सांगितले आहे 'ज्या बाबतीत जग जागे असते, त्या बाबतीत आम्ही झोपलेले असतो आणि ज्या बाबतीत जग झोपलेले असते, त्या बाबतीत आम्ही जागे असतो.' हे मला समजले नाही. आपण समजवावे.

**दादाश्री :** जग भौतिकच्या बाबतीत जागे असते, त्या बाबतीत श्रीकृष्ण झोपलेले असतात, आणि जग ज्या बाबतीत झोपलेले असते, त्या बाबतीत श्रीकृष्ण जागे असतात. शेवटी आध्यात्मिक जागृतीत यावे लागेल. सांसारिक जागृती ही अहंकारी जागृती आहे आणि निर्‌हंकारी जागृतीमुळे मोक्ष आहे.

## चंचलता हेच दुःखाचे कारण

मनुष्यामध्ये दोन प्रकारची जागृती असते. एक स्थिरतेची जागृती आणि दुसरी चंचलतेची जागृती. मनुष्य चंचलतेच्या जागृतीत खूप पुढे गेलेला आहे, स्थिरतेच्या जागृतीत एक टक्का देखील जागृत झाला नाही. आणि चंचलतेच्या जागृतीत कोणी 10 टक्के, कोणी 15 टक्के, कोणी 20 टक्के तर कोणी 30 टक्के जागृत झालेला असतो. चंचलतेची जागृती मनुष्याला जनावर बनविते आणि स्थिरतेची जागृती मोक्षाला घेऊन जाते. ज्या जागृतीने स्थिरता वाढते तीच खरी जागृती. हे अमेरिकन फार चंचल झाले आहेत म्हणून फार मोठ्या दुःखात अडकले आहेत. त्यांची दुःखे रडूनसुद्धा जाणार नाहीत. आत्महत्या केली तरी जाणार नाहीत, अशी दुःखे निर्माण होत आहेत. स्वतः स्वतःच्याच जाळ्यात अडकले आहेत. काही काळाने तिथे गोंधळ माजलेला असेल. अजून तर 'इगोइजम' (अहंकार) करीत आहेत. चंचलता वाढल्यामुळे ते फसले आहेत.

चंचलता वाढली आहे म्हणून काय करतात? तर हायवे वर 67 व्या मैलावर, दुसऱ्या फर्लांगावर फोन करायचे साधन नाही म्हणून तिथे फोन करण्याचे साधन उपलब्ध करा, असे म्हणतात. 'अहो, दुसऱ्या फर्लांगावरच याची काय गरज आहे?' तर ते म्हणतील, 'पहिल्या आणि तिसऱ्या फर्लांगावर आहे, पण दुसऱ्या फर्लांगावर फोन करण्याचे साधन नाही!' पाहा तरी, चंचलता किती वाढली आहे! हा वेडेपणा आहे. इतके सारे खायला-प्यायला आहे, तरी पण सारे जग वेडेपणा करत आहे. लोक दुःखी, दुःखी आणि दुःखीच आहेत! 'पर्मनन्ट' दुःखी!! जोपर्यंत स्थिरतेची शक्ती उत्पन्न होत नाही, तोपर्यंत सुखी कसे होणार?

**प्रश्नकर्ता :** दोन विचारांमध्ये स्थिरता असते का?

**दादाश्री :** असे आहे की, अशी स्थिरता कुचकामी आहे. ही तर 'पॅकिंग'ची स्थिरता आहे, काही कामाची नाही. अशा स्थिरतेला स्थिरता म्हणतच नाहीत ना? स्थिरता तर अढळ असली पाहिजे. वरून ॲटमबॉम्ब पडणार असेल तरी स्थिरता जाणार नाही, तिला स्थिरता म्हणतात. जगाचे मन चंचल आहे. आमचे (दादांचे) मन स्थिर गतीने फिरत असते, म्हणजे समजा इथे दोन हजार लोक आहेत आणि आपल्याला त्यांच्याशी शेकहँड करायचे असेल तर ते शेकहँड करत जातील आणि पुढे जात राहतील. तसेच आमच्या मनातील विचार शेकहँड करत-करत पुढे जातात. कुठलाही विचार थांबून राहत नाही. एक सेंकदही थांबत नाही! आणि तुमचा एक विचार पंधरा मिनिटे-अर्धा तास देखील थांबून राहतो. थांबतो की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, थांबतो.

**दादाश्री :** आमचेही मन तर आहेच. मन नसेल तर 'ॲबसेंट माइंडेड' (शून्यचित्त) म्हणतील. माझे मन खूप प्रखर असते. वरून ॲटमबॉम्ब पडणार असेल तरीही ते विचलीत होत नाही. चंचलता नावालाही नसते. मन स्थिर वेगाने फिरत असते आणि गुळाच्या तुकड्याभोवती माशा जशा घोंघावत असतात तसे तुमचे मन एखादी गोष्ट पाहिली की तिच्या भोवती फिरत राहते.

**प्रश्नकर्ता :** चंचलता कशी काढता येईल?

**दादाश्री :** आता ज्ञान घेतल्यानंतर तुम्हाला चंचलता काढण्याची गरजच नाही ना? तुम्हाला तर फक्त पाहत राहायचे आहे. मी तर तुम्हाला ज्ञान दिले आहे. आता ही चंचलता काय करते, ते 'तुम्हाला' 'पाहत'च राहायचे आहे. आणि जगातील लोक तर मनाबरोबर स्वत: देखील खेळायला लागतात. मन नाचले तर ते ही नाचतात. अहो, मन नाचत आहे 'तुम्ही त्याचा नाच पाहत राहा ना!' इथे तर 'तुम्ही' देखील त्याच्यासोबत नाचायला लागता आणि नावडता विचार आला की त्याबरोबर भांडता की 'तू कशाला आलास? तू कशाला आलास?' नावडता विचार येतो तेव्हा तर कळतेच ना की मन वाईट आहे, वाईट विचार करत आहे. वाईट विचार येतात तेव्हा 'डिप्रेशन' (नैराश्य) येते. आणि चांगले विचार येतात तेव्हा मन 'एलिवेट'(उत्साहित) होते. मी तर तुम्हाला असे तयार करू इच्छितो की जगात कोणीही तुम्हाला डिप्रेस करूच शकणार नाही. जो तुम्हाला डिप्रेस करायला आला असेल तो स्वत:च डिप्रेस होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** सुषुप्तीत (झोपेत) स्थिरतेसारखी स्थिती असते?

**दादाश्री :** स्थिरतेसारखे काहीच नसते. एखादी 'मशीन' फार गरम झाली की ती बंद करून थंड करतात ना? तसेच मन सुषुप्तीत बंद होते. दिवसभर गरम झालेले जे मन असते ते बंद होते. झोप साऱ्या मशिनरीला थंड करून टाकते.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान घ्यायची इच्छा झाली, तर तिला स्वरूप जागृती म्हणायचे का?

**दादाश्री :** त्याला स्वरूप जागृतीचे संयोग जुळले असे म्हणावे लागेल. प्रथम स्वरूप ज्ञान प्राप्त करण्याची इच्छा होणे, हा एक संयोग जुळला म्हणावे, मग 'ज्ञानी पुरुष' भेटतात. स्वरूप ज्ञान प्राप्त करण्याचे संयोग जुळून आले तरच काम होईल, असे आहे, पण ते सर्व 'सायंटिफीक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्' आहेत.



# [ 2 ]
# ध्यान

## ध्यानाचे स्वरूप

**प्रश्नकर्ता :** जैन धर्मात ध्यान का करत नाहीत?

**दादाश्री :** जैन धर्मात चारही ध्याने आहेत. ध्यान आपोआपच होते, करावे लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** ध्यान कशाला म्हणतात?

**दादाश्री :** सांसारिक क्रिया करत असतानाच ध्यान होते. आणि तुम्हाला तर एका जागी बसून ध्यान करावे लागते ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** त्याला तर एकाग्रता म्हणतात. ध्यान तर प्रत्येकाला होतच असते. ध्यान कशाला म्हणतात? आता कोणी तुम्हाला म्हटले की 'तुम्हाला अक्कल नाही' एवढे बोलताच तुम्हाला रौद्रध्यान होते. आपोआपच होते. कोणी उकसवल्यावर रौद्रध्यान निर्माण होते.

**प्रश्नकर्ता :** हे ध्यान कसे होत असते? त्याची 'स्टेज' कशी असते?

**दादाश्री :** कोणी म्हटले की 'तुम्ही तर हे सर्व चुकीचे केलेत', त्यामुळे तुमच्या आत जो परिणाम होतो, राग येतो, तो रौद्रध्यान आहे.

कधी मनात आले की 'आता माझे काय होईल?' हे आर्तध्यान आहे. साखरेवर कंट्रोल आला, साखर आणलेली नाही, आता काय होईल? हे सर्व आर्तध्यान आहे. आर्तध्यान आणि रौद्रध्यान रोजच होत असतात. आणि धर्मध्यान तर समजलेलेच नाही. आणि चौथे शुक्लध्यान, ते तर प्रत्यक्ष मोक्षाचे कारण आहे.

**प्रश्नकर्ता :** मन:शांतीसाठी ध्यान करतात, ते काय आहे?

**दादाश्री :** कुठले ध्यान करतात?

**प्रश्नकर्ता :** मेडिटेशन करतात ना!

**दादाश्री :** ती सर्व मादकता आहे. त्यात काही फायदा नाही.

**प्रश्नकर्ता :** मग फायदा कशात आहे?

**दादाश्री :** फायदा तर स्वत:चे स्वरूप जाणण्यात, 'मी कोण आहे?' हे जाणण्यात आहे. त्यामुळे मग निरंतर शांती वाटते. मग कोणी खिसा कापला किंवा आणखी काही केले तरी पण काही वाटत नाही.

**प्रश्नकर्ता :** एका जागी स्थिर बसल्याशिवाय ध्यान होऊ शकते?

**दादाश्री :** ध्यान तर चालता-फिरता, सांसारिक क्रिया करता-करता होतच राहते. लोक रात्रंदिवस आर्तध्यान, रौद्रध्यान करत असतात. देवगतीत जाण्याचे ध्यानसुद्धा चालता-फिरता होऊ शकते आणि मोक्षगतीत जाण्याचे ध्यानही चालता-फिरता होऊ शकते.

## ध्यान : ध्येय आणि ध्याता यांचे अनुसंधान

**प्रश्नकर्ता :** ध्यानाचे उद्‌भवस्थान काय आहे?

**दादाश्री :** ध्यानाचा अर्थ काय की कुठलेही ध्येय निश्चित करणे आणि त्याच्याशी तार जोडणे म्हणजे ध्यान. जेवढा वेळ तार जोडलेली असेल तेवढा वेळ ध्यान राहते. तुम्ही मुंबईला जायचे ठरवले, आणि मुंबईचे तिकीट काढले की गाडीत मुंबईचे ध्यान तुम्हाला सहजच राहते.

ध्यानात ध्याता निश्चित असायला हवा, आणि ध्येय निश्चित

असायला हवे. तुम्ही स्वतः ध्याता, आणि निश्चित केलेले ध्येय, या दोघांचे अनुसंधान राहते, त्याला ध्यान म्हणतात. ध्येय आणि ध्याता तन्मयाकार होतात तेव्हा त्याला ध्यान म्हणतात. ध्याता तर तुम्ही आहातच. ध्येयाच्या जागी तुम्ही काय ठेवले आहे?

**प्रश्नकर्ता :** कॉन्सनट्रेशन करायचे आहे ते 'स्व' वरच करायचे आहे ना?

**दादाश्री :** हो. 'स्व' वरच करायचे आहे. पण 'स्व' ला समजल्याशिवाय ते कसे होईल? 'स्व' म्हणजे काय हे समजले पाहिजे ना? 'स्व' पुस्तकात नाही, कुठल्याही शास्त्रात लिहिलेले नाही. शब्दरूपात लिहिलेले असेल, पण जे वास्तवात आहे ते शब्दरूपात नाही. मग तुम्ही त्याला कसे काय निश्चित कराल?

**प्रश्नकर्ता :** सपोज (कल्पना) करून निश्चित करता येणार नाही का?

**दादाश्री :** अहमदाबादला जायचे आहे आणि सपोज करून उत्तरे ऐवजी दक्षिणेला गेले तर ते सपोज कसे चालेल? रेग्युलर स्टेजमध्ये सपोजिशन असले पाहिजे. सपोज त्याच्या बाउंड्रीत असले पाहिजे, आऊट ऑफ बाउंड्री असता कामा नये.

ध्यान तर तेव्हाच होईल जेव्हा ध्येयाच्या स्वरूपाची ओळख होईल आणि स्वतः ध्याता स्वरूप झाला असेल. 'मी चंदुलाल आहे' असे समजून तुम्ही ध्याता बनता ना? चंदुलाल तर तुमचे नाव आहे. तुम्ही ध्याता कसे बनता?

**प्रश्नकर्ता :** 'मी शुद्धात्मा आहे' असे समजून.

**दादाश्री :** पण शुद्धात्मा म्हणजे कोण? त्याचे भान तुम्हाला झाले आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, नाही झाले.

**दादाश्री :** मग आत्म्याचे भान झाल्याशिवाय म्हणाल तर त्या सर्व नुसत्या गप्पा झाल्या. आत्म्याचे भान झाले पाहिजे. भान झाले नसेल तर

निदान प्रतीती तरी असली पाहिजे आणि ती प्रतीती पण तुटणार नाही अशी असली पाहिजे. 'मी शुद्धात्मा आहे' असे भान झाले की मग ध्यान आपोआपच होत राहते, तुम्हाला करावे लागत नाही. जिथे काही तरी करावे लागते, ते संयोगाच्या आधीन असते. संयोग असतील तर होईल, नाही तर होणार नाही. आणि शुद्धात्म्याचे एकदा भान झाले की मग ध्यान आपोआप उत्पन्न होतेच. एखादा हीरा कुठे ठेवला असेल आणि फक्त तुम्हाला ते माहीत असेल, तर तो कुठे ठेवला आहे हे तुमच्या लक्षात असते, मग तुमचे ध्यान तिथे राहतेच. सासरी बसलेले असाल तरी तुमचे ध्यान तिथेच असते. विसरलात तरी प्रतीतीच्या रूपात असते. नाहीतर लक्षात तरी असतेच. ध्यानाचा भाऊ लक्ष आहे!

## अहंकार-ध्यानात नाही, तर क्रियेत

**प्रश्नकर्ता :** मी ध्यान कशा प्रकारे करायला हवे? बरोबर होत नाही, मला शिकायचे आहे.

**दादाश्री :** ध्यान तुम्ही करता की दुसरा कोणी करतो?

**प्रश्नकर्ता :** मी करतो.

**दादाश्री :** कधी कधी होत नाही, असे होते का?

**प्रश्नकर्ता :** हो, होते.

**दादाश्री :** त्याचे कारण आहे. जोपर्यंत 'तुम्ही चंदुलाल आहात' तोपर्यंत कुठलेही काम 'करेक्ट' होत नाही. 'तुम्ही चंदुलाल आहात' हे किती टक्के खरे आहे?

**प्रश्नकर्ता :** शंभर टक्के.

**दादाश्री :** जोपर्यंत 'राँग बिलीफ आहे' तोपर्यंत 'मी एवढे केले, असे केले, हा इगोइजम आहे. जिथे-जिथे काही कराल, त्याचा कर्तेपणाचा इगोइजम (अहंकार) होणार आणि कर्तेपणाचा इगोइजम वाढेल, तसतसा परमात्मा दूर होत जाईल. जर तुम्हाला परमात्मपद जाणून घ्यायचे असेल तर इगोइजम गेल्यावरच काम होईल.

जे कोणाला करता येत नाही, ते ध्यान आहे. जे केले जाते ते अहंकाराने केले जाते. म्हणून त्याला ध्यान म्हणत नाहीत, त्याला एकाग्रता म्हणतात. जिथे अहंकार नसतो तिथे ध्यान होते. अहंकाराने ध्यान होऊ शकत नाही. ध्यान तर अहंकारापासून निर्लेप आहे. अहंकार कमी जास्त होतो, ते तुमच्या लक्षात येते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** अहंकार वाढला की कमी झाला हे लक्षात ठेवणे, त्याला ध्यान म्हणतात. आर्तध्यान आणि रौद्रध्यानातही अहंकार वापरला जात नाही.

**प्रश्नकर्ता :** धर्मध्यानात अहंकार आहे ना?

**दादाश्री :** त्यातही अहंकार नाही. ध्यानात अहंकार नसतो, क्रियेत अहंकार आहे.

**प्रश्नकर्ता :** रौद्रध्यानात आणि आर्तध्यानात निमित्त तर अहंकारच आहे ना?

**दादाश्री :** फक्त निमित्तच नाही तर क्रिया देखील अहंकाराचीच आहे. क्रिया हे ध्यान नाही. पण क्रियेतून उत्पन्न होणारा परिणाम ध्यान आहे. आणि जे ध्यान उत्पन्न होते, त्यात अहंकार नसतो. आर्तध्यान होते त्यात 'मी आर्तध्यान करतो', असे नसते, म्हणून ध्यानात अहंकार नसतो. अहंकार 'इतर जागी' वापरला जातो तेव्हा ध्यान उत्पन्न होते.

**प्रश्नकर्ता :** ध्यानात अहंकार नाही, कर्ता नाही, मग बंधन कशामुळे पडते?

**दादाश्री :** आर्तध्यान झाल्यानंतर 'मी आर्तध्यान केले' असे मानतो, त्यामुळे तिथे कर्ता होतो आणि त्याचे बंधन पडते.

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणालात की ध्येय निश्चित झाले आणि स्वत: ध्याता झाला तर ध्यान उत्पन्न होते, मग त्यात अहंकाराची गरज नाही ना?

**दादाश्री :** त्यात अहंकार असो वा नसो. निर्‌अहंकारी ध्याता असेल तर शुक्लध्यान उत्पन्न होते, आणि नसेल तर धर्मध्यान, आर्तध्यान किंवा रौद्रध्यान होते.

**प्रश्नकर्ता:** म्हणजे ध्यातापद अहंकारी असते किंवा निर्‌अहंकारी असते, पण त्याच्या परिणाम स्वरूप जे ध्यान उत्पन्न होते, त्यात अहंकार नसतो.

**दादाश्री :** हो, आणि परिणाम स्वरूप जर शुक्लध्यान असेल तर मोक्ष होईल.

**प्रश्नकर्ता :** ध्येय निश्चित होते, त्यात अहंकाराचा भाग आहे का?

**दादाश्री :** अहंकारच ध्येय निश्चित करतो आणि मोक्षाचे ध्येय आणि ध्याता निर्‌हंकारी आहेत, म्हणूनच शुक्लध्यान म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** धर्मध्यानाच्या ध्येयात अहंकार सूक्ष्मरूपात असतो का?

**दादाश्री :** हो असतो. अहंकार असल्याशिवाय धर्मध्यान होणारच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** आर्त, रौद्र आणि धर्मध्यान, यांना पुद्‌गल परिणती म्हणतात का?

**दादाश्री :** हो. त्याला पुद्‌गल परिणती म्हणतात आणि शुक्लध्यान ही स्वाभाविक परिणती आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे शुक्लध्यानाला आत्म्याचा परिणाम म्हणता येईल का?

**दादाश्री :** हो.

**प्रश्नकर्ता :** शुक्लध्यानात जी कर्मे होतील ती चांगली असतील आणि धर्मध्यानातील कर्मे थोडी कमी प्रतीची असतील. ही गोष्ट खरी आहे का?

**दादाश्री :** शुक्लध्यान असेल ना, तर क्रमिक मार्गात कर्मे होत नाहीत; हा तर अक्रम मार्ग आहे म्हणून होतात. तेसुद्धा स्वतःच्या कर्तेपणाने होत नाहीत, तर निकाली भावनेतून होतात. कारण कर्म संपल्याशिवायच हे ज्ञान प्राप्त झाले आहे ना!

## ध्यानाचे परिणाम

ध्यानाचे फळ मिळते. रौद्रध्यानाचे काय फळ आहे? तर आत राक्षसी वृत्ती निर्माण होतात.

**प्रश्नकर्ता :** वृत्तीनुसार कर्मे होतील ना?

**दादाश्री :** ते बरोबर आहे, पण प्रथम वृत्ती कुठून होतात? तर ध्यानातून. आर्तध्यान आणि रौद्रध्यान ही ध्याने जनावर किंवा नरकगतीत टाकणारी आहेत. मग तिथे त्याला ही कर्मे भोगावी लागतात.

**प्रश्नकर्ता :** 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करतात ते देखील ध्यानाचे एक परिवर्तन आहे ना?

**दादाश्री :** हो. ते ध्यानाचेच परिवर्तन आहे.

**प्रश्नकर्ता :** शूट केले म्हणजे पुद्‌गलाला नष्ट केले. म्हणजे जे व्यवस्थितमध्ये होते त्यात हस्तक्षेप केला. मग दुसरा जन्म कसा असेल?

**दादाश्री :** तो जन्म देखील जसाचा तसाच येतो. जी लिंक आहे तशीच्या तशीच येते.

**प्रश्नकर्ता :** जो 'शूट' करून पुद्‌गल बदलून टाकतो, त्याचे आयुष्य तेवढेच राहते की कमी होते?

**दादाश्री :** त्याचे आयुष्य इथे तुटणार होते म्हणून तेव्हा तुटण्याचे सर्व 'सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस' गोळा होतात आणि आयुष्य संपून जाते, भोवरा वेगाने फिरतो!

## आत्मध्यानातूनच समाधी

स्वत:च्या स्वरूपाचे ध्यान, त्याला ध्यान म्हणतात. लोक जे ध्यान करतात ते त्यांना कुठे घेऊन जाईल याचा पत्ता नाही. ती तर एकाग्रता आहे. भगवंतांनी काय म्हटले आहे की, 'खिचडीचे ध्यान ठेवा, पतीचे ध्यान ठेवा, किंवा मग स्वरूपाचे ध्यान ठेवा', या शिवाय दुसऱ्या कुठल्यातरी ध्यानाचे काय करायचे आहे? समाधीसाठी दुसरे कुठलेही ध्यान करण्याची काय गरज आहे? आत्म्यात आले की निरंतर समाधी राहते!

हे लोक ध्यान करायला सांगतात, बसून श्वास वर-खाली होतो त्याकडे लक्ष ठेवायला सांगतात. मग शरीराला पीडा होत असेल तेव्हा असे ध्यान करता येईल का? नाही, ध्यान दिसत नाही, शब्द किंवा क्रिया दिसतात.

राग-द्वेष कमी करण्यासाठी काय ध्यान करायचे असते? राग-द्वेष कमी करण्यासाठी तर वीतराग विज्ञान जाणून घ्यायला हवे.



# [ 3 ]

# प्रारब्ध-पुरुषार्थ

## पुरुषार्थ कशाला म्हणतात?

**दादाश्री :** तुम्ही कुठला पुरुषार्थ करता?

**प्रश्नकर्ता :** व्यवसायाचा.

**दादाश्री :** त्याला पुरुषार्थ म्हणत नाहीत. जर तुम्ही स्वतःच पुरुषार्थ करत असाल तर नेहमी फायदाच होईल ना? पण इथे तर नुकसानही होत असते ना? त्याला पुरुषार्थ म्हणत नाहीत. ही तर जी दोरी गुंडाळलेली होती ती आता सुटत आहे, याला पुरुषार्थ कसे म्हणणार? तुम्ही पुरुषार्थ करत आहात मग नुकसान कसे काय होते?

**प्रश्नकर्ता :** तसे तर होणारच ना? कधी नुकसानही होणार.

**दादाश्री :** नाही. पुरुषार्थ करणाऱ्याला तर कधीच नुकसान होत नाही. मी पुरुषार्थ केला असे कोण बोलतो? संपूर्ण जग म्हणजे टॉप्स (भोवरे) आहेत. प्रकृती नाचवेल तसे ते नाचतात. आणि म्हणतात 'मी नाचलो!' यांना छोटासा शॉक (झटका) दिला तर हाडे-बिडे सर्व बाहेर येतील. पुस्तक वाचतात, शास्त्र वाचतात, तो देखील पुरुषार्थ नाही. तो सर्व नैमितिक पुरुषार्थ आहे. खरा पुरुषार्थ काय हे कोणाला समजलेलेच नाही. 'मी, मी' असे करत राहतात. अरे, शौचाला जायचीही सत्ता नाही, आणि तू तर नुसता भोवरा आहेस! श्वास नाकाने घेतला जातो. श्वास

घेण्याचीही शक्ती नाही आणि उच्छवास काढण्याचीही शक्ती ह्या भोवऱ्यात नाही. पण तरी म्हणतो 'मी श्वास घेतो.' मग रात्री तू झोपलास की श्वास कोण घेतो?

तुला माहीत आहे ना की नाक बंद केले तर काय होईल? ही मशिनरी अशी बनलेली आहे की ती आतून श्वास घेते आणि तीच परत श्वास बाहेर फेकते. तेव्हा हे लोक म्हणतात 'मी लांब श्वास घेतो आणि मी छोटा श्वास घेतो.' तुला तर 'तू कोण आहेस?' याचेही भान नाही. ही तर दोरी गुंडाळली जाते आणि भोवरा फिरत राहतो, पण त्याला लोक 'मी फिरलो' म्हणतात. जगात कोणालाच शौचाला जायची देखील सत्ता नाही, आम्हालाही नाही. तुम्ही जो 'पुरुषार्थ पुरुषार्थ' म्हणता तो जिवंत असलेल्याचा आहे की मृताचा? पुरुष झाल्यशिवाय पुरुषार्थ कसा करता येईल? तुम्ही ज्याला आत्मा मानता तो तर निश्चेतन-चेतन आहे. मग पुरुषार्थ कोण करतो?

**प्रश्नकर्ता :** पुरुषार्थ तर मीच करतो ना!?

**दादाश्री :** पण 'मी कोण?' तसे तर 'मी' हाच भोवरा आहे ना! मग भोवरा कसा काय पुरुषार्थ करणार? आणि जर स्वतः पुरुषार्थ करू शकत असेल तर कोणी मरणारच नाही, पण हा भोवरा तर कधीही कोलमडून पडतो. हा भोवरा डॉक्टरला म्हणतो, 'साहेब, मला वाचवा.' अरे, डॉक्टरचा बाप मेला, आई मेली, त्यांना तो वाचवू शकला नाही, तो तुला काय वाचवणार? डॉक्टरच्या वडिलांच्या घशात कफ अडकला असेल आणि आपण डॉक्टरला सांगितले की 'तुम्ही तर इतकी ऑपरेशनस् करून लोकांच्या पोटातील गाठी काढता, मग हा तर जरासा कफच आहे, काढून टाका ना!' तर डॉक्टर म्हणेल, 'असे केले तर ते मरून जातील' म्हणजेच हा बेजबाबदारपणे म्हणतो की 'मी वाचवले.' अरे, तुझी तिरडी निघणार नसेल तर तू असे बोल. तू आधी तुझी तिरडी निघायची थांबव! कुठे मरून पडाल माहीत नाही! म्हणून हे सर्व समजून घ्या.

## पचनक्रियेत पुरुषार्थ किती?

आता हा नाश्ता इथे आला आहे, तो खाण्यासाठी काय पुरुषार्थ

करावा लागतो? जर खाण्याच्या क्रियेमध्ये पुरुषार्थ करावा लागत असेल तर तो आणि जगाचा पुरुषार्थ, दोन्ही सारखेच आहेत. खाण्यासाठी पुरुषार्थ करावा लागतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तसेच आहे. खाण्यासाठी नैमित्तिक पुरुषार्थ करावा लागतो. हात, तोंड यांची हालचाल करावी लागते. 'आपण' ढवळाढवळ केली नाही तर दात चांगल्याप्रकारे अन्न चावतील, जीभही योग्य ते करेल. पण हा तर फुशारकी मारतो की 'खाण्याचा पुरुषार्थ मीच करतो' जीभ खाण्याचा पुरुषार्थ करायला गेली तर बत्तीस दातांमध्ये कितीतरी वेळा ती चावली जाईल! परंतु जीभ ढवळाढवळ करत नाही, आणि 'मी पुरुषार्थ करते' असे म्हणत नाही. भोजन करताना जर मिलमध्ये (!) पुरुषार्थ करायला गेला नाही तर खाण्याची क्रिया सहजरित्या चांगली होईल. हे सर्व फक्त 'पाहायचे' आणि 'जाणायचे' आहे. सर्व काही सहज रित्या चालेल, असे आहे! रात्री तुम्ही हांडवा (एक गुजराती पदार्थ) खाऊन झोपी जाता! मग त्यानंतर ते पचवण्यासाठी काय पुरुषार्थ करता?

**प्रश्नकर्ता :** अन्न पचवण्यासाठी थोडे हिंडावे-फिरावे लागते.

**दादाश्री :** ती क्रिया पचनासाठी निमित्त आहे, आणि झोपेत श्वासोच्छवास चांगले होतात, म्हणूनच मनुष्य 'फ्रेश' होतो. तुम्ही झोपेत असलात तरीही आत पचनासाठी लागणारे पाचक रस, बाइल वगैरे मिळत राहतात. याला चालवण्यासाठी कोणी जातो का? जसे आतील सर्व आपोआप चालते, तसेच बाहेरचेही सर्व आपोआपच चालत असते. मात्र नैमित्तिक क्रिया, प्रयत्न वगैरे करावे लागतात. बाकी सर्व व्यवस्थितपणेच आयोजलेले आहे. जन्म झाल्यापासूनच सुख:दु:ख भोगणे, मान-अपमान, यश-अपयश हे सर्व सोबत घेऊनच आलेला आहे, पण हा अहंकार अडथळा आणतो. जी काही क्रिया होते, त्यात स्वत:ला कर्ता मानतो. मग यात करण्यासारखे काय आहे? तर फक्त आत्म्याला जाणून घ्यायचे आहे. पोटात हांडवा घातला की आत सर्व नैसर्गिक क्रिया होतात. तसेच बाहेरही सर्व नैसर्गिक प्रकारेच चालत आहे. किती

अन्न, किती पाऊले, कसे चालावे, किती चालावे, हे सर्व आपोआपच होत राहते. पण हा तर अहंकार करतो, वेडेपणा करतो आणि मानतो की स्वतःच पुरुषार्थ करीत आहे. पण पुरुष झाल्यशिवाय पुरुषार्थ होत नाही. खरे तर जेव्हा 'ज्ञानी पुरुष' अलखचे (आत्म्याचे) लक्ष बसवतात, पुरुष होतो, त्यानंतर तो पुरुषार्थ करू शकेल.

लोक कंबर कसून पुरुषार्थ करायला जातात की, मुंबईत असे करायचे आहे आणि तसे करायचे आहे! मुंबई तर जिथल्या तिथेच आहे, पण कितीतरी शेठ असेच मरून गेले! जोपर्यंत मुंबईत आबादी आहे, तोपर्यंत कोणी काही करू शकत नाही. कारण आबादीला रोखण्याची सत्ता नाही आणि बरबादी रोकण्याची पण सत्ता नाही! आणि त्यात लोक पुरुषार्थ करायला निघाले आहेत! तू तर या सर्व भांडयांमधील एक चमचाच आहे.

पुरुषार्थ हा भ्रांत भाषेतील शब्द आहे, खऱ्या भाषेतील हा शब्द नाही. जसे तुम्ही म्हणता की 'मी त्यांचा व्याही आहे', पण ते खरे नाही. तसेच ही भाषा वेगळी आहे.

## जीवांचे उर्ध्वगमन कसे होते?

**प्रश्नकर्ता :** जीव कोणत्या पुरुषार्थामुळे उन्नत झाला आहे?

**दादाश्री :** ते मी तुम्हाला समजावतो. आपल्या इथे नर्मदा नदी वाहते दगडाच्या उंच कड्यामधून वाहते आणि मातीच्या कड्यामधूनही वाहते. जिथे दगडी कडा असतो तिथे पाणी अतिशय वेगाने वाहते आणि दगडाची धारही बोथट करते. मग नदीत एखादा एवढा मोठा दगड पडतो. त्यावेळी दगडांचे कोपरे इतके धारदार असतात की कोणाला लागले तर रक्तच येईल. कारण नुकतेच तुटलेले दगड धारदार असतात. या जीवांचा पुरुषार्थ कसा असतो ते मी तुम्हाला समजावतो. नदीचा स्वभाव असा आहे की ती दगडांना प्रवाहात इकडे तिकडे खेचत वाहून नेते. आणि हे असेच चालत राहते. मग हे दगड आतल्या आत एकमेकांशी आदळत-आपटत राहतात. म्हणून ते दहा-पंधरा मैलावर गेल्यावर मऊ

होतात, गुळगुळीत होतात, घासून तयार केलेल्या संगमरवरासारखे वाटतात. पण तरी ते वाकडे-तिकडे असतात. नंतर शेवटी शेवटी भाडभूजला येईपर्यंत इतके गोल होऊन जातात की तिथे यात्रेला आलेल्यांना लोक म्हणतात की, 'भाऊ, येताना घरी दर्शन करण्यासाठी शाळीग्राम घेऊन या' या गोल झालेल्या दगडांचे लोक दर्शन घेतात. त्याप्रमाणे प्रत्येक जीवमात्र घसपटत घसपटत पुढे जातात. निसर्ग घसपटत नेतो, आणि हा आपटत जातो, आदळत-आपटत गोल होऊन जातो.

**प्रश्नकर्ता :** तर मग काहीच करायचे नाही का?

**दादाश्री :** काहीच करायचे नाही. भोवरा काय करू शकतो? शौचाला जायचीही सत्ता नाही, मग तो काय करणार? दगड आदळून-आपटून गोल होतात त्यांना लोक शाळीग्राम म्हणून देवळात ठेवतात! जितके शाळीग्राम झाले ते पूजेत जाऊन बसले आणि बाकीचे समुद्रात गेले! तसेच इथे हिंदुस्तानात जन्म घेतल्यावर दगड गोल झालेला असतो, आणि जर 'ज्ञानी पुरुष' भेटले आणि समकित झाले की ते पूजले जातात, आणि बाकीचे सर्व समुद्रात जातात! समकित झाल्याशिवाय कुठलाही पुरुषार्थ होत नाही. समकित होईपर्यंत सर्व अकाम निर्जरा (नवे कर्म बांधले जाऊन, जुन्या कर्मांचा अस्त होणे) आहे. हे लोक मानतात तो पुरुषार्थ तर भ्रांतीचा आहे. भ्रांतीचा पुरुषार्थ म्हणजे ज्यामुळे पुन्हा जन्म घ्यावा लागेल, असा.

हे जे तुम्हाला सांगितले की कुठून दगड पडतात, ती व्यवहाराची आदी (सुरुवात) आहे. अव्यवहाराची तर आदी नसते, ते तर अनादि असते. पण व्यवहाराची सुरुवात इथूनच होते, दगड नदीत पडतात तेव्हापासूनच. अव्यवहार राशी म्हणजे जिथे अजून जीवाचे नावही पडलेले नाही ती राशी. आणि जेव्हा नाव पडले की हा गुलाब, हा मोगरा, ही मुंगी, हे किडे.. की मग ते सर्व जीव व्यवहार राशीत आले. नैसर्गिकपणे धक्के खात खात पुढे येतात थेट कणीस येईपर्यंत नैसर्गिक संचालन आहे.

**प्रश्नकर्ता :** एखादा दगड समुद्रात पडला आणि एखादा दगड शाळीग्राम झाला? तर या मागे काही कारण आहे का?

**दादाश्री :** कारण काहीच नाही, ज्याला जसा संयोग जुळला तसे घडते. इथे तुम्हाला 'दादांचा' संयोग जुळला तर पाहा ना, तुम्ही परमानंदात राहता ना? हा संयोग जुळला इतकेच, त्यानंतर तुम्हाला दुसरे काही करावे लागले आहे का? चरखा चालवावा लागला का? नाही तर या व्यवहाराचा अंत कधी होईल?

हे दगड जेव्हा नदीत जातात तेव्हा सर्व सारखेच असतात, तसे जरा लहान मोठे असतात, पण त्यांना वेगवेगळ्या तऱ्हेने कोण घासते? तर 'सायंटिफीक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्'. आज दगड इथे बसलेले असतील तर पुढल्या वर्षी दुसरीकडे असतील. त्यांना चालावेही लागत नाही आणि काही करावेही लागत नाही. आणि तरी शाळीग्राम बनतात. या जीवांची देखील या दगडासारखीच अवस्था आहे! आणि हे दगडच आहेत, त्यांच्यातला आत्मा काढून टाकला तर दगडच आहेत.

**प्रश्नकर्ता :** संयोगात पुरुषार्थ आहे का?

**दादाश्री :** जो पुरुष झाला असेल तोच पुरुषार्थ करू शकतो. श्रीकृष्णाने सांगितले की, 'उद्धवा, अबला काय साधन करणार?' जैनांचे सर्वात मोठे आचार्य आनंदघनजी महाराज काय म्हणतात? ते म्हणतात, 'हे अजीतनाथ! आपण पुरुष झाले आहात, कारण आपण 'क्रोध-मान माया-लोभ' यांना जिंकले आहे म्हणून आपल्याला अजीत म्हणतात आणि मी तर अबला आहे, कारण 'क्रोध-मान माया-लोभ' यांनी मला जिंकले आहे!' आता इतके मोठे आचार्य स्वत:ला अबला म्हणतात तर मग इतरांना बोलण्याचे काही उरलेच नाही ना!

या सर्व क्रिया मेकॅनिकल (यंत्रवत) चालूच राहतात. गहू पिकतील, बाजारात येतील, ते दळले जातील आणि गव्हाचे पाव बनतील. हे सर्व मेकॅनिकल होत राहील. मेकॅनिकल एविडेन्समध्ये तर ते चक्र असेच चालू असते.

## मग खरा पुरुषार्थ कोणता?

खरे तर यथार्थ पुरुषार्थ असला पाहिजे. प्रकृतीचा नाही, पुरुषाचा

पुरुषार्थ हवा. जगात प्रकृतीचा पुरुषार्थ होत आहे. सामायिक केले, प्रतिक्रमण केले, ध्यान केले, कीर्तन केले, हा सर्व तर प्रकृतीचा पुरुषार्थ झाला! याउलट यथार्थ पुरुषार्थ तर पुरुष होऊन केला, तरच तो यथार्थपर्यंत पोहोचतो. (आत्म्यापर्यंत पोहोचतो.)

या 'दादां'नी 'ज्ञान आणि अज्ञान' दोन्हींना पूर्णपणे वेगळे पाहिले आहे, आणि तसेच ते तुम्हाला दाखवितात, तेव्हा पुरुष, पुरुषधर्मात येतो, आणि मग प्रज्ञा सावध करते. तोपर्यंत जीव प्राकृतधर्मातच असतो.

**प्रश्नकर्ता :** खरा भाव असेल तर त्याला पुरुषार्थ म्हणतात?

**दादाश्री :** भावाभाव हे कर्म आहे, स्वभावभाव हा पुरुषार्थ आहे. स्वभावभाव म्हणजे कुठल्याही गोष्टीचा 'स्वत:' कर्ता नाही, स्वभावभाव! त्यात दुसरा कुठलाही भाव नाही. त्यात तर ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदच असतो!

स्वरूपज्ञान झाल्यावर सर्वच स्वभावभावातच येतात. स्वत: पुरुष झाले की, चेतन पुरुषार्थ उत्पन्न होतो. स्वाभाविक पुरुषार्थ उत्पन्न होतो. आणि जेव्हा स्वत: परमात्मपुरुषार्थात येतो तेव्हा स्वत:च परमात्मस्वरूप होऊन जातो.

सर्व संयोग एकत्र येतात तेव्हाच रिलेटिव्ह कार्य होते. ते 'व्यवस्थित' आहे. ज्ञानी काय सांगतात की, (आत्तापर्यंत) तुम्ही भ्रांत पुरुषार्थात होतात, आता स्वरूप ज्ञानाच्या प्राप्तीनंतर 'रियल' पुरुषार्थाच्या मागे लागा, त्यात संयोगाची गरजच नाही. 'रियल' पुरुषार्थात कुठल्याही वस्तूची गरज नसते आणि 'रिलेटिव्ह' पुरुषार्थात मन-वचन-काया, या सर्व संयोगाची गरज असते. स्वपुरुषार्थ कुठला? तर पुद्‍गल परिणतीमध्ये कुठेही राग-द्वेष होत नाहीत तो. मग जरी कोणी मारून टाकले तरी राग-द्वेष होत नाहीत.

## प्रारब्ध कर्म काय आहे? संचित कर्म काय आहे?

**प्रश्नकर्ता :** 'नशीब' आणि 'व्यवस्थित' यामध्ये काय फरक आहे?

**दादाश्री :** 'नशीब, लक-अनलक, प्रारब्ध-पुरुषार्थ, तकदीर-

तदबीर' या सर्व भ्रांत भाषेतील गोष्टी आहेत. बालभाषेचे शब्द आहेत. बालमंदिराची भाषा आहे, ही ज्ञानमंदिराची भाषा नाही. ज्ञानमंदिराच्या भाषेत 'व्यवस्थित' आहे. लोक म्हणतात ना, 'प्रारब्धात असेल तर होईल? तर कोणी विरोध करतात की 'पुरुषार्थ केल्याशिवाय कसे होणार?' म्हणजेच ज्ञान असे असले पाहिजे की कोणी त्याचा विरोध करणार नाही. या सर्व नुसत्या थापा आहेत. लोकांना प्रारब्धही समजत नाही आणि पुरुषार्थही समजत नाही.

आजारी पडणे हे प्रारब्ध कर्म नाही. भगवंत प्रारब्ध कर्म कशाला म्हणतात? तर हा जो अरबट चरबट खात होता, ते त्याच्या प्रारब्ध कर्मामुळे खात होता. त्याचे फळ म्हणून त्याचे पोट बिघडले. त्याला स्वत:ला खायचे नव्हते, तरी खावे लागले, ते प्रारब्ध कर्म आणि पोट बिघडणे हे प्रारब्ध कर्माचे फळ आहे.

**प्रश्नकर्ता :** अरबट चरबट खात असताना त्याला थांबवण्यासाठी काय करावे? त्यावेळी प्रारब्ध कर्म किंवा संचित कर्म असते का?

**दादाश्री :** गेल्या जन्मी जी संचित कर्मे असतात ती या जन्मी प्रारब्धाच्या रूपात येतात. त्यामुळे त्याला सतत 'हे खाऊ की ते खाऊ' असे वाटत राहते. आणि त्यात परत तो आंबट-तिखट खात राहतो. म्हणून व्हाइटॅलिटी पॉवर (रोग प्रतिकारक शक्ती) वर ताण पडतो, त्यामुळे पचन होऊ शकत नाही. म्हणून ती न पचलेल्या कचऱ्याला एका जागी साठवून ठेवते. या शरीरात असे काही भाग आहेत की ज्यात व्हाइटॅलिटी पॉवर हा कचरा फेकून देते. हे डॉक्टर त्याला रेज (किरणे) पाठवून जाळून टाकतात. किंवा काही खास प्रकारच्या औषधांनी त्याला नष्ट करतात.

## भ्रांत पुरुषार्थ आणि प्रारब्ध कर्म

जगातील लोक ज्याला पुरुषार्थ समजतात तो पुरुषार्थ नाहीच. आता इतकी मोठी चूक हिंदुस्तानात होते, सगळीकडेच होते, मग लोकांची काय दशा होईल? पुरुषार्थ आणि प्रारब्ध यातील भेद ज्ञानी पुरुषांकडून समजून घ्यायला हवा.

आपले लोक पुरुषार्थ कशाला मानतात? सकाळी 'लवकर उठला' त्याला पुरुषार्थ म्हणतात, 'काल उशीर झाला आणि आज लवकर उठलो' असे म्हणतात. मग चहा घेतला, शौचाला जाऊन आला, अंघोळ केली आणि लगेच व्यापारासाठी गेला. आणि व्यापारात दिवसभर बसून राहिला, त्याला पुरुषार्थ म्हणतात. पण ते तर प्रारब्ध आहे. टेंडर भरले, अमके काम केले त्रिकम साहेबांना भेटला, अमक्याठिकाणी जाऊन आला, हे सर्व प्रारब्धच आहे. धावपळ करतो, दुकान उघडतो तेसुद्धा प्रारब्धच आहे. बोला आता, अशा या पब्लिकला प्रारब्ध कसे काय समजणार? जे प्रारब्ध आहे त्यालाच पुरुषार्थ समजतात, तर मग पुरुषार्थ कधी होत असेल? हे सर्व समजून घ्यायला हवे ना! ज्ञानी पुरुषांकडून प्रारब्ध आणि पुरुषार्थ यामधील फरक समजून घेतला तर काही उलगडा होईल.

हे ज्ञान घेतल्यानंतर प्रारब्ध-पुरुषार्थ 'तुम्हाला' लागू होत नाहीत. तुम्ही आत्मस्वरूप झालात म्हणून एकदम 'व्यवस्थित'च आहे. जगातील लोकांसाठी जग 'व्यवस्थित' नाही. कारण ते स्वत:च भ्रांती स्वरूपात आहेत, म्हणून तक्रार केल्याशिवाय राहतच नाहीत. कधी चहाला उशीर झाला तर तुम्ही समजून जाता की 'व्यवस्थित' आहे आणि समभावाने निकाल करून मोकळे होता, पण तुम्ही तक्रार करत नाही आणि ते भ्रांतीत असलेले काय करतील?

**प्रश्नकर्ता :** आरडाओरडा करतील.

**दादाश्री :** तुम्ही तर 'पुरुष' झाले आहात म्हणून पुरुषार्थ आहे. पण जगातील लोकांना पुरुषार्थाशिवायची भूमिका नसतेच ना? पण त्याला भ्रांत पुरुषार्थ म्हणतात, तोही पुरुषार्थ आहे. पण तो जाणून घेतला पाहिजे ना? भ्रांत पुरुषार्थ करून क्रमिक मार्गात मोक्षाच्या दिशेने पुढे जातात. आता जगातील लोक म्हणतील की 'हे दुकान खूप मोठे केले' व्यापारात चांगला जम बसविला, मी शिकलो, मी पहिल्या नंबरने पास होतो.' यालाच पुरुषार्थ म्हणतात. पण ते सर्व प्रारब्ध आहे. तर ही चूक सुधारावी लागेल की नाही?

**प्रश्नकर्ता :** सुधारावी लागेल.

**दादाश्री :** तुम्ही सुधारले नाही तरी चालेल. कारण 'व्यवस्थित' तुमच्या हाती लागले आहे ना! पण लोकांना हे कधी समजेल?

## कुठला पुरुषार्थ करावा?

सर्वच प्रारब्ध आहे तर मग पुरुषार्थ काय असेल? असे काही समजून घेण्याचा विचार येतो का तुमच्या मनात?

**प्रश्नकर्ता :** नाही येत.

**दादाश्री :** काल रात्री तुम्ही ठरविले की सकाळी लवकर उठायचे आहे, आणि उशिरा उठलात, तर बाकीच्या लोकांना असे म्हणायचे नाही की, 'तुम्हाला माहीत होते मला गाडीने जायचे होते, मग लवकर का नाही उठविले?' असे भांडण करायची गरज नाही. आपण लोकांना लवकर उठवायला सांगितले असते तरी ते विसरून गेले असते! आपल्याला भांडायची काय गरज आहे? उशिरा उठलात हेच प्रारब्ध. तर आता आपण काय पुरुषार्थ करायचा? लवकर उठलेच पाहिजे असे ठरवले हा पुरुषार्थ आहे! आणि चहात साखर थोडी कमी पडली तर मनात ठरवा की प्रारब्धाच्या आधारावरच साखर कमी पडली आहे. म्हणून कोणाचा दोष नाही. मग विनंती करून साखर मागून घ्या किंवा मागायचीच नाही असे ठरवा. या दोन्हीपैकी काहीतरी एक करा. आपण भाव केला, त्याला पुरुषार्थ म्हणतात. पण तो 'रिलेटिव्ह' पुरुषार्थ आहे. मग रियल पुरुषार्थ कशाला म्हणतात? पारिणामिक भाव ज्याला उत्पन्न झाला त्याला 'रियल' पुरुषार्थ म्हणतात. लोक दिवसभर सामायिक, प्रतिक्रमण, जप-तप, ध्यान, क्रिया वगैरे सर्व करत असतात, पण सर्व झोपेत करतात. त्याला पुरुषार्थ म्हणत नाहीत. पुरुषार्थ जागा असलेला करतो की झोपलेला?

**प्रश्नकर्ता :** जागा असलेला.

**दादाश्री :** जग तर प्रारब्धालाच पुरुषार्थ म्हणते. अगदी थोडे, खूप कमी लोकच या जगात जागृत असतील. आणि असे लोक थोडेफार समजत असतील, जाणत असतील की असे व्हायला हवे. बाकी तर प्रारब्ध-पुरुषार्थ यातील फरकच त्यांना समजत नाही.

**प्रश्नकर्ता :** हे सर्व चुकीचे आहे असेच म्हणावे लागेल ना?

**दादाश्री :** खरे तर ते चुकीचे नाही. याचे कारण मी तुम्हाला समजावून सांगतो. प्रारब्ध आणि पुरुषार्थ यातील भेद जे पूर्वीच्या लोकांनी सांगितले आहेत, ते जोपर्यंत मन–वचन–काया यात एकता असेल तोपर्यंत बरोबर आहेत. म्हणजे तो मनात जसे असेल, तसेच बोलतो, आणि तसेच वर्तन करतो. पण या काळात मन–वचन–काया यांची एकता तुटली आहे. म्हणून आज प्रारब्ध आणि पुरुषार्थ यातील ते भेद चुकीचे ठरत आहेत. हे अगदीच चुकीचे नाही, पण सापेक्ष आहे.

**प्रश्नकर्ता :** प्रारब्ध म्हणजे काय हे समजले. पण पुरुषार्थ अजून नीट समजला नाही.

**दादाश्री :** संयोग जुळला ते प्रारब्ध आणि विपरित संयोग आल्यावर समता ठेवणे हा पुरुषार्थ. जे–जे संयोग येतात, ते सर्व प्रारब्ध आहे. तुम्ही 'फर्स्ट क्लास' पास झालात ते प्रारब्ध आणि कोणी फर्स्ट क्लास नापास झाला, तेही प्रारब्ध. हे शब्द लक्षात घ्या की जितके संयोग येतात ते सर्व प्रारब्धच आहेत. सकाळी जाग आली याला संयोग म्हणतात. साडेसातला जाग आली तर त्याला साडेसातचा संयोग म्हणतात. त्याला प्रारब्ध म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** एखादी व्यक्ती माझ्या बाबतीत काही वाईट बोलली, माझ्यासमोरच बोलली आणि मी त्या व्यक्तीबद्दल समभाव ठेवून पुरुषार्थ केला, तर खरोखर त्याला प्रारब्ध म्हणायचे का?

**दादाश्री :** नाही. आपल्याला काही चुकीचे संयोग मिळाले, कोणी आपल्याला शिव्या देत असेल, तर तेव्हा लोक पुरुषार्थ करत नाहीत, उलट समोरच्याला शिव्या देतात, तोंड वेडे–वाकडे करतात. कोणी तुम्हाला शिव्या दिल्या तर त्यावेळी तुमच्या मनात असे आले पाहिजे की हे माझ्याच कर्माचे फळ आहे, समोरचा तर फक्त निमित्त आहे, निर्दोष आहे. हा भगवंतांचा आज्ञारुपी पुरुषार्थ आहे. त्यावेळी तुम्ही समता राखता, तोच पुरुषार्थ आहे.

**प्रश्नकर्ता :** ज्यांना सम्यक् दर्शन झालेले नाही, अशा जगातील लोकांसाठी तर हाच पुरुषार्थ आहे?

**दादाश्री :** हो. जगातील लोकांसाठी तो पुरुषार्थ आहे. तो कुठला पुरुषार्थ आहे? 'रिलेटिव्ह' पुरुषार्थ आहे. कारण त्यांना संसारात 'रिलेटिव्ह' ज्ञान असते. काही ऐकण्यात येते, काही पुस्तके वाचून येते, ते सर्व 'रिलेटिव्ह' ज्ञान आहे. या 'रिलेटिव्ह' ज्ञानाचा प्रभाव दिसतो, त्याला 'रिलेटिव्ह' पुरुषार्थ म्हणतात. आणि इथे 'रियल' ज्ञानाचा प्रभाव दिसतो, त्याला 'रियल' पुरुषार्थ म्हणतात. जगात काही जण तरी पुरुषार्थ करतात. अगदीच नाही असे नाही. अंदाजे हजारातील दोन-तीन जण असे नक्कीच निघतील. पण त्यांना हे पूर्णपणे समजलेले नसते की याला प्रारब्ध म्हणावे की पुरुषार्थ! त्यांच्याकडून पुरुषार्थ स्वाभाविकपणेच घडून येतो. पण त्यांना हे माहीत नसते की यात 'ती' कुठल्या ग्रेडची वस्तू आहे आणि 'ही' कुठल्या ग्रेडची वस्तू आहे? प्रारब्ध आणि पुरुषार्थ यात तर लोकांना इतकेच माहीत असते की बस, मला अकरा वाजता जायचे आहे, मग उशीर का झाला? कढी का सांडलीस? असे केले आणि तसे केले? अरे, कढी सांडली तर तो संयोग आहे. यातून दोन भाग होतात की संसारात संयोग आणि वियोग हे दोनच आहेत. जितके संयोग आहेत तितके वियोग होणारच आहेत आणि जो संयोग आला त्यात समता राखणे, तो पुरुषार्थ. कोणी फुले वाहिली तर अशी छाती फुगवेल, त्याला पुरुषार्थ म्हणत नाहीत. स्वाभाविकपणे जे होते ते प्रारब्ध आहे. फुले वाहिली तरी पण आपण पद्धतशीरपणे राहावे. असा पुरुषार्थ पूर्वी कधी झाला होता का?

**प्रश्नकर्ता :** नाही. मला माहीतच नव्हते की हा पुरुषार्थ आहे.

**दादाश्री :** म्हणूनच आम्ही सांगतो की प्रारब्ध आणि पुरुषार्थ या गोष्टी समजून घ्या. आणि जो पुरुषार्थ होत असतो, तो स्वतःला समजतही नाही, स्वाभाविकपणेच होतो, झोपेतही होतो.

**प्रश्नकर्ता :** हे जे प्रारब्ध आहे, ते गेल्या जन्मात जे चार्ज झालेले असते त्यानुसार येते का?

**दादाश्री :** जे चार्ज झालेले आहे ते आता डिस्चार्ज होत असते. ते संयोग स्वरूपात डिस्जार्च होत असते. आणि उलटा संयोग आला तर त्याला सुलटा करून घेणे, तो पुरुषार्थ आहे. घसरून पडायचे तर सर्वच घसरून पडतात, त्यात कसला पुरुषार्थ? घसरून पडण्यापासून सावरणे, त्याला पुरुषार्थ म्हणतात. हे लोक तर अगदी आंधळ्यासारखे कुठेही आपटतात, आणि माहीत नाही स्वतःला काय समजतात! हे सर्व समजून घ्यावे लागेल ना? चुकीच्या गोष्टी जर सत्य समजल्या जात असतील तर त्यांचा आरपार कधी होईल? ज्याचा आर आला नाही त्याचा पार येईल का?

आणि हे 'व्यवस्थित शक्ती'चे ज्ञान सर्वांसाठी नाही. कारण त्यांच्याकडे अहंकार आहे ना! आता अहंकार तर 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे आणि तो म्हणतो की 'मी करीत आहे.' त्यामुळे त्या दोघांत संघर्ष होतो. 'व्यवस्थित'मध्येही ढवळाढवळ करून सुख बिघडवून टाकतो. तो जर अहंकाराने अशी ढवळाढवळ करत नसेल आणि जर समतापूर्वक पुरुषार्थ करत असेल तर ते खूप लाभदायक ठरेल. पण 'तो' 'व्यवस्थित'ला तर स्वीकारुच शकत नाही. व्यवस्थित तर शुद्ध झाल्यावर, आत्मा प्राप्त झाल्यावरच समजते! जग 'व्यवस्थित'च आहे त्यात दुमत नाही, परंतु जो अहंकार आहे, त्याने जर 'व्यवस्थित' म्हटले तर गडबड होईल. या प्रारब्धाचाच अर्थ लोकांनी इतका चुकीचा लावला आहे, मग इतर अवलंबनाबद्दल काय बोलावे?

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी पुरुषाच्या' कृपेने प्रारब्ध बदलता येते का?

**दादाश्री :** बदलता येते, पण कसे? भोगण्याचा रस जास्त कडू असेल तर तो जरा कमी कडू होऊ शकतो. कडूपणा कमी होतो पण भोगणे मूळापासून जात नाही.

स्वरूप ज्ञान नसेल आणि तुम्हाला कोणाचा राग आला किंवा दुसरा कोणी तुमच्यावर रागावला तर स्वाभाविकपणे तुम्हाला वाईट वाटते किंवा तुम्ही डिप्रेस होता, किंवा मग तुम्ही त्या व्यक्तीला रागवता. आता जर त्यावेळी तुम्ही तुमची प्रतिक्रिया बदललीत, तर त्याला पुरुषार्थ

म्हणतात. त्याला जागृत आहे असे म्हणतात. जागृत असेल तरच पुरुषार्थ करता येईल ना? झोपेत आहे म्हणून तर पुरुषार्थ करू शकत नाही. याला भावनिद्रा म्हणतात.

हे सर्व प्रारब्धच आहे. प्रकृती जबरदस्तीने नाचवते, उतावळ्याला जोर–जोरात नाचविते आणि आळश्याला हळूहळू नाचविते. आता उतावळा मनुष्य काय म्हणतो की, 'हा प्रारब्धवादी आळशी आहे आणि मी पुरुषार्थवादी आहे' खरे तर तुझे उतावळे प्रारब्ध आहे आणि त्याचे हळू प्रारब्ध आहे. दोन्ही संयोगाधीन आहेत. दुकान चांगले चालले तर तो पुरुषार्थ मानला जातो, आणि चांगले चालले नाही तर म्हणतात तो प्रारब्धवादी आहे! वास्तविक असे नसते. प्रारब्ध ही 'फ्री ऑफ कॉस्ट' (मोफत) गोष्ट आहे. पुरुषार्थ ही पुढे नेणारी गोष्ट आहे. ती कमावण्याची गोष्ट आहे. म्हणजे समोरच्याने तर संयम सोडला पण तुम्हीही संयम सोडला, त्यामुळे दोघेही अधोगतीला जाल. जर तुम्ही संयम ठेवला तर तुम्ही अधोगतीला जाणार नाही, घसरून पडणार नाही. समोरचा तर घसरला पण तुम्ही सुद्धा घसरलात तर तो कसला पुरुषार्थ?

प्रारब्ध–पुरुषार्थ नीट समजून घेण्यासारखे आहे. काल होती तीच प्रथा जर आजही चालवली तर त्याला पुरुषार्थ कसे म्हणता येईल? तरी पण पुरुषार्थ नाही असे नाही. फार फार तर हजारात दोन–पाच लोकांना होत असेल. त्यांची टक्केवारी खूप कमी असते. आणि शिवाय त्यांना कळतही नाही की हा पुरुषार्थ आहे. ते तर लवकर लवकर जाणे यालाच पुरुषार्थ म्हणतात. लोक तर घाई करणे, गडबड गोंधळ करणे, धावाधाव करणे, दिवसभर व्यस्त राहणे यालाच पुरुषार्थ म्हणतात. 'खूप पुरुषार्थी व्यक्ती आहे' असे म्हणतात. अहो, हा भोवरा तर दिवसभर फिरण्यासाठीच जन्माला आलेला आहे. मग त्याला पुरुषार्थ कसे म्हणता येईल?

## पुरुषार्थ म्हणजे उपयोगमय जीवन

पुरुषार्थ म्हणजे उपयोगमय जीवन. आपल्या इथे शुद्ध उपयोग असतो आणि इतरत्र शुभ उपयोग असतो. जे अशुभ झालेले असते, त्याला उपयोगपूर्वक शुभ करण्यात येते. म्हणजे ज्या लोकांमध्ये संयम

दिसतो, तो स्वाभाविक संयम आहे. त्याला स्वत:ला माहीतच नसते की मी पुरुषार्थ करत आहे तो त्याच्या प्रकृतीचा स्वभाव आहे. जे स्वाभाविक होत असते त्याला पुरुषार्थ म्हणता येणार नाही. आपल्याला तर हे माहीत आहे की हा पुरुषार्थ आहे, आणि बाकी सर्व प्रारब्ध आहे, कारण पुरुष झाल्यानंतरचा पुरुषार्थ, हा खरा पुरुषार्थ समजला जातो. हा 'रियल' पुरुषार्थ आहे आणि तो 'रिलेटिव्ह' पुरुषार्थ आहे.

**प्रश्नकर्ता :** समता आणि संयम यात काय फरक आहे?

**दादाश्री :** संयम, हा पुरुषार्थ आहे आणि समता तर ज्ञानातून उत्पन्न होणारा स्वभाव आहे. 'यमालाही' पुरुषार्थ म्हटले आहे, 'नियमालाही' पुरुषार्थ म्हटले आहे. आणि 'संयमालाही' देखील पुरुषार्थ म्हटले आहे. दिसून येणारा संयम नाही. पुरुषार्थ कधीच दिसत नाही.

**प्रश्नकर्ता :** संयम आणि तप यात काय फरक आहे?

**दादाश्री :** दोन्ही वेगळेच आहेत. संयमात तापायचे नसते आणि तपामध्ये तापायचे असते. कोणी म्हटले खाण्यावर तुमचा संयम नाही. तर प्रमाणात खाल्ले की संयम होतो. आणि तपामध्ये तर मनाला तापवावे लागते, जाळून तापवावे लागते, पण आपले तप तर वेगळे आहे. ज्ञान-दर्शन-चारित्र्य तप, त्यातले हे तप आहे. आपल्या तपात बाहेरून शरीराला अशाता होते त्यावेळी आपल्याला तप करावे लागते. कारण जोपर्यंत पूरण आहे, आणि त्याचे गलन होत नाही, तोपर्यंत आपल्याला तप करावे लागेल. आरडाओरडा करून काही होणार आहे का? आत हृदय पिळवटून निघाले, किंचाळावे असे वाटले, तिथे तप करावे लागेल. तप म्हणजे काय? अंतिम तप कशाला म्हणतात? 'होम डिपार्टमेंट' आणि 'फॉरेन डिपार्टमेंट' एकाकार होत नाहीत, तिथे जागृती असते, त्याला भगवंतानी तप म्हटले आहे!

चुकीचा पुरुषार्थ केला तर सगळे विस्कटून जाईल. कारण स्वत: 'होल ॲन्ड सोल' (पूर्णपणे) रिस्पॉन्सिबल आहे, जबाबदार आहे. तुम्हाला सरळ करायचे असेल तर सरळ करा, नाही तर उलटे करा. चिंता होणार नाही असे हे ज्ञान आहे. चिंतेने माणसाला खूप त्रास होतो.

एक व्यक्ती मला म्हणत होती की, चिंता नसेल तर माझ्याकडून कामच होत नाही. म्हणून माझ्या चिंता राहू द्या. मी त्याला म्हटले, 'फार छान, तू आमचे ज्ञान घेऊच नकोस. सत्संगात असाच ये.' त्याच्या मनात असे आहे की, चिंता असेल तरच काम होईल, नाही तर काम होणारच नाही ना? त्याला माहीत नाही की तो स्वत: करतो की दुसरा कोणी करत आहे. त्याला तर असेच वाटते की हे सर्व मीच करत आहे!

## 'व्यवस्थित शक्ती'ची यथार्थ समज

**प्रश्नकर्ता :** 'प्रारब्ध' आणि 'व्यवस्थित' यांचा काय संबंध आहे?

**दादाश्री :** तसा तर काहीच फरक नाही. पण लोकांनी प्रारब्धाचा अर्थ चुकीचा लावला आहे, म्हणून आम्ही हे दुसऱ्या भाषेत वेगळ्या प्रकारे समजावले पण प्रारब्धाच्या तुलनेत व्यवस्थित उच्च आहे. 'व्यवस्थित' सांगते की तू तुझे काम करत रहा, बाकी फळ वगैरे सर्व माझ्या सत्तेत आहे. आणि प्रारब्ध असे काही म्हणत नाही. म्हणूनच 'व्यवस्थित' ही कम्प्लीट वस्तू आहे. त्याच्या आधाराने चाललात तर त्रास होणार नाही. प्रारब्ध खरेच होते, पण चुकीचा आधार घेतला, त्याला काय करणार?

**प्रश्नकर्ता :** मला असे वाटते की प्रारब्ध हा शब्द व्यक्तीच्या संदर्भात आणि 'व्यवस्थित' हा समष्टीच्या संदर्भात आहे. हे बरोबर आहे का?

**दादाश्री :** नाही, तसे नाही. प्रारब्ध व्यक्तीच्या संदर्भात आहेच, पण व्यवस्थित तर त्याच्याही पुढे जाते. प्रारब्ध आधी होऊन जाते, त्यानंतर ते 'व्यवस्थित' होते. 'व्यवस्थित' व्यष्टी-समष्टी दोन्हींचे स्पष्टीकरण करते.

'व्यवस्थित'च्या ज्ञानात मी पूर्ण स्पष्टीकरण दिलेले आहे. जग कसे आहे? कोण चालविते? कशा प्रकारे चालते? हे सर्व सांगितले आहे. तुम्हाला हितकर व्हावे, तुम्हाला शांती मिळावी, संकल्प-विकल्प न होवोत, यासाठी सांगितले आहे. क्रमिक मार्गात 'व्यवस्थित' समजत

नाही. क्रमिक मार्ग शेवटपर्यंत अहंकारी मार्ग आहे, म्हणून तिथे 'व्यवस्थित' म्हणताच येत नाही. स्वतः कर्ता झाला तर 'व्यवस्थित'ला कर्ता मानणारच नाही. त्यांना तर असेच वाटत असते की 'मी कर्ता आहे.' आपण त्यांना विचारले की 'तुम्ही कर्ता होतात तर मग नुकसान कसे झाले?' तर ते म्हणतात, प्रारब्धाच्या आधीन आहे सर्व. ते लोक प्रारब्ध आणि पुरुषार्थ दोन्ही म्हणतात.

तुम्हाला ज्ञान घेऊन किती वर्षे झाली?

**प्रश्नकर्ता :** तीन वर्षे.

**दादाश्री :** मग या तीन वर्षात तुम्हाला 'व्यवस्थित'मध्ये काही चूक आढळली का?

**प्रश्नकर्ता :** नाही, अजिबात नाही.

**दादाश्री :** हरी (ईश्वर)ची शंका येते की, हरीने असे का बरे केले असेल? खरे तर तिथे हरी नावाचा कोणी नाहीच. हा तर आधार आहे. संत पुरुषांनी दिलेले शब्द, कारण लोकांना काही आधार तर हवा ना? हे तर आपले अक्रम विज्ञान आहे, म्हणून जग 'जसे आहे तसे' सांगितले आहे की इतके आपोआप चालत आहे म्हणून तुम्हाला काळजी करण्याचे काही कारणच नाही. हे केस कसे आपोआप उगवतात! मिशा फुटतात! तुला जेव्हा फ्रेंच कट करायचा असेल तेव्हा कर. कदाचित कोणी तुझ्या मिशा कापून टाकल्या तरी तू घाबरू नकोस. आणि मिशा कापणाऱ्यावर चिडूही नकोस. मिशा तर परत येतील. महिन्याभरात परत उगवतील. म्हणून त्यात चिडायचे कारण नाही. मुलाचा मुत्यू झाला तरी चिंता करू नकोस, 'व्यवस्थित' आहे. नुकसान झाले तरी चिंता करू नकोस, फायदा झाला तर उडया मारू नकोस. हे सर्व 'व्यवस्थित' करत असते. तू करत नाहीस. दिवस-रात्र, संध्या-उषा हे सर्व कसे नियमात आहेत. तसेच मनाचेही सर्व 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे. हे सर्व आम्ही उघड केले आहे. आणि हे सर्व उघड करण्यासाठीच आम्ही फार पूर्वीपासून शोध घेत आलो होतो की वास्तवात काय आहे? प्रारब्ध म्हटले तर आम्ही आरामात झोपून जाऊ पण मग पुरुषार्थ म्हणत आहात

तर लवकर उठावे की झोपून राहावे? अर्थात मला असले घोटाळे आवडतच नव्हते. तेव्हा हकीकत काय आहे? तर आम्ही सांगितले 'व्यवस्थित'! म्हणजे ऑल राईट!

व्यवस्थितचे ज्ञान दिल्यावर व्यक्ती ज्ञानी पुरुषासारखीच राहू शकते, संकल्प-विकल्प उत्पन्नच होत नाहीत. इनकमटॅक्सवाल्यांची नोटीस आली की तुम्हाला दंड करण्यात येईल, तर आपण लगेच समजून जाऊ की, हे 'व्यवस्थित' आहे. आणि 'व्यवस्थित'मध्ये असेल तरच तो दंड करेल ना? नाही तर ज्याला शौचाला जायचीही शक्ती नाही, तो आणखी काय करणार आहे? जगात कोणी काही करू शकेल, असे नाहीच. आणि जर आपले 'व्यवस्थित'च तसे असेल तर कोणी सोडणारही नाही. मग घाबरायचे कशाला? आपले आहे ते आपल्याला सोडणार नाही. त्यात साहेब बिचारा काय करेल? साहेब तर निमित्त आहे. आणि तो साहेबाशी वैर सुद्धा धरतो, की हा साहेबच असा आहे, कधीचा माझ्या मागे लागला आहे. अरे, साहेब तुझ्या मागे लागला नाही, तुझी कर्मे तुझ्या मागे मागे लागली आहेत. म्हणजे हे लोक न समजताच वैर बांधून घेतात!

जोपर्यंत स्वतःला कर्ता समजतो, तोपर्यंत 'कर्ता कोण आहे' हे समजतच नाही आणि कर्ता कोण आहे हे समजल्यावर स्वतः कर्ता होत नाही. बघा, तुम्हाला काहीच करावे लागत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** क्रमिक मार्गात अहंकार तर असतोच, आणि त्यासोबत हरीची इच्छा, या दोघांचा मेळ कसा बसणार? म्हणून महावीर भगवंतांनी सांगितले की व्यवहाराचा तू कर्ता आहेस. जर तू अहंकारी असशील तर तूच कर्ता आहेस आणि जर तू निर्‌अहंकारी असशील तर 'व्यवस्थित' कर्ता आहे.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, जर हरीला कर्ता म्हटले, तर स्वतःला अकर्ता समजून राहता येणार नाही का?

**दादाश्री :** नाही, स्वतः कधी अकर्ता बनेलच कसा? जर अकर्ता

झाला तर त्याग कसा करता येईल? 'हरीची इच्छा' असे बोलतात ते तर स्वत:च्या मनाच्या समाधानासाठी आहे, काचेचा पेला हातातून पडला तर ते हरी इच्छेच्या आधीन आहे असे म्हणतात. खरे तर हरी नावाचा कोणी नाहीच. मग कसली 'हरीची इच्छा'? आपल्या कामात हस्तक्षेप करण्याचा अधिकार कोणाला आहे का? माझ्या कामात हरीला कशाला इच्छा करावी लागते? तो काय माझा *उपरी* (वरिष्ठ, मालक) आहे? पण पाहा ना, अजूनही हा सावळा गोंधळ चालूच आहे ना? 'ज्ञानी पुरुष' तर कोणाचेही अवलंबन घेत नाहीत. काही लोक याला उदयकर्मांचे फळ असे म्हणतात. आम्ही तर तुम्हाला 'व्यवस्थित' इतके सुंदर दिले आहे की तुम्हाला कसलीच अडचण येणार नाही. आणि 'व्यवस्थित' पाहूनच तुम्हाला दिले आहे. अगदी शंभर टक्के 'व्यवस्थित' आहे! नाहीतर तुम्ही उलट दिशेला जाल. आम्ही काय म्हणतो की, जगाच्या बाबतीत 'व्यवस्थित' आहे. मी जे तुला दिले आहे, ते आता तुझे सर्व काही चालवेल. तू आता पुरुषार्थ धर्मात रहा. कोणी विचारले की साहेब 'माझे चालेल की नाही?' अरे, 'व्यवस्थित' आहे, म्हणून तू तिकडे लक्ष देऊ नको. हे शरीर, मन, वचन सर्व 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे. तू तर, शरीर जे करत आहे ते पाहत रहा. हे चंदुभाई काय करतात, ते तुम्ही पाहत राहा. आणि तुम्ही आमच्या पाच आज्ञा पाळत राहा. बोला आता, इतक्या सरळ आणि सोप्या पद्धतीने दिले आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** या पाच आज्ञांमध्ये राहणे याला पुरुषार्थ म्हणायचा का?

**दादाश्री :** हो, आज्ञेत राहणे हाच पुरुषार्थ आहे. तोच धर्म आणि तेच तप. आज्ञेत सर्व काही आले. मग आणखी काहीच करायचे नाही. जर ज्ञानींची भेट झाली तर त्यांच्या आज्ञेतच राहायचे असते.

## भाग्य मोठे की पुरुषार्थ?

**प्रश्नकर्ता :** भाग्य मोठे की पुरुषार्थ?

**दादाश्री :** भाग्य आणि पुरुषार्थ यांना जो ओळखतो 'तो' मोठा. पण लोक त्याला ओळखत नाहीत. तुम्ही पुरुषार्थ कशाला समजता? तुम्हाला भाग्याचा अनुभव आहे?

**प्रश्नकर्ता :** मी तर सर्व काही भाग्यानेच होते असे मानतो.

**दादाश्री :** पुरुषार्थ कुठे पाहिला तुम्ही?

**प्रश्नकर्ता :** रोजच्या रूटीन (दिनचर्या)मध्ये जो होतो तो पुरुषार्थ.

**दादाश्री :** प्रारब्ध कोणते?

**प्रश्नकर्ता :** चमत्कारासारखे असेल ते, आपले दर्शन झाले, त्याला आम्ही भाग्य मानतो.

**दादाश्री :** आणि तुम्ही इथे आलात याला पुरुषार्थ म्हणायचे?

**प्रश्नकर्ता :** हो, त्याला पुरुषार्थ म्हणतात.

**दादाश्री :** म्हणजे प्रारब्ध आणि पुरुषार्थ यातील भेद लोकांना समजतच नाही. भ्रांतीमुळे ते असे म्हणतात. भ्रांती ही पण एक दृष्टी आहे ना? त्या भ्रांत दृष्टीमुळे असे दिसते की हे प्रारब्ध आहे आणि तो पुरुषार्थ. खरे तर पुरुषार्थ दिसतच नाही. हे जे दिसते ते सर्व प्रारब्धच आहे. पुरुषार्थ तर होत असतो, पण त्याचा स्वतःला पत्ता देखील लागत नाही. जर पुरुषार्थ दिसला, तर सगळेच त्याला वळवून घेतील.

**प्रश्नकर्ता :** पुरुषार्थ कसा होतो?

**दादाश्री :** पुरुषार्थ आत होत आहे, त्याला भाव पुरुषार्थ म्हणतात. लोक भाव बोलतात तर खरे, पण त्यांना समजत नाही. सर्व द्रव्य प्रारब्ध आहे आणि भाव पुरुषार्थ आहे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जी कर्मे करतो, ती भाग्यामुळे होतात की कर्मांमुळे भाग्य बनते?

**दादाश्री :** भाग्यामुळे कर्म होते, पण कर्म होत असताना त्यात भाव जोडला जातो ते समजत नाही. त्यावेळी आत सूक्ष्मरूपात पुरुषार्थ चालूच असतो. ते कॉजेस आहेत. आणि हे सर्व 'इफेक्टस' आहेत. सर्व इफेक्टस प्रारब्ध आहे. तुम्ही इथे आलात ते प्रारब्ध, हे विचारलेत ते प्रारब्ध, हे ऐकत आहात ते प्रारब्ध आणि पुरुषार्थ तर आत होत आहे.

म्हणून जन्मापासून मरेपर्यंतचे सर्व अनिवार्य आहे. जे जे अनिवार्य आहे, ते सर्व प्रारब्ध आहे. म्हणून लग्न केल्याशिवाय गत्यंतर नाही, विधवा-विधुर झाल्याशिवाय गत्यंतर नाही, आणि नोकरी-व्यवसाय केल्याशिवाय गत्यंतर नाही. कोणी न्यायाने व्यापार केला तर उलटेच होते आणि अन्यायाने केला तर चांगला चालतो, हे सर्वच प्रारब्ध आहे. सगळा स्थूल भाग प्रारब्ध आहे आणि जो सूक्ष्म भाग आहे तो पुरुषार्थ आहे.

**प्रश्नकर्ता :** जे भाग्य आहे, ते बदलत राहते की तसेच्या तसेच राहते? कर्मे चांगली असतील तर भाग्य बदलते का?

**दादाश्री :** चांगली कर्मे केल्यामुळे जो बदल दिसून येतो, की मी असे-असे केले म्हणून मी वाचलो, पण खरे तर तसेच भाग्यात होते म्हणूनच झाले. उगाचच नाही. म्हणजे हे सर्व प्रारब्धच आहे, आणि ते बदलत नाही.

**प्रश्नकर्ता :** माणसाने चांगली कर्मे केली तरीही त्याला दु:ख तर भोगावेच लागते ना?

**दादाश्री :** चांगली कर्मे केली तरी दु:ख न भोगून जाईल कुठे? दु:खे तर भोगावीच लागतात. शाता वेदनीय आणि अशाता वेदनीय दोन्हीही असतात! मुलीचे लग्न केले की शाता वेदनीय असते मग लग्नानंतर जावई जेव्हा पैसे मागायला येतो तेव्हा अशाता वेदनीय उत्पन्न होते. बाहेरील शाता-अशाता 'व्यवस्थित'च्या आधीन आहेत आणि आत शाता राहते तो पुरुषार्थ आहे.

## क्रमिकमार्ग, भ्रांत पुरुषार्थाधीन

प्रारब्ध म्हणजे काय? आपल्या हातात सत्ता नाही. ती परसत्ता आहे, तरी पण आपण त्याला आपली सत्ता मानतो हा पुरुषार्थ आहे. मी असे केले, तसे केले, कर्ता नसताना सुद्धा तसा आरोपित भाव ठेवणे, हा सर्व पुरुषार्थ आहे, त्याला भ्रांत पुरुषार्थ म्हणतात. आणि 'मी कर्ता नाही' याचे भान झाले, तेव्हापासून भ्रांत पुरुषार्थ बंद होतो आणि मग मोक्षाचा पुरुषार्थ सुरू होतो.

**प्रश्नकर्ता :** 'मी कर्ता नाही' असा भाव होणे, ते देखील भाग्यात असेल तरच होते ना?

**दादाश्री :** भाग्यात असेल तरच होते. तरी पण भाग्याचेच आहे असे बोलून चालणार नाही. आत्मा प्राप्त झाल्यावर यथार्थ पुरुषार्थ सुरू होतो. नाही तर भ्रांत पुरुषार्थ तर आहेच ना! भ्रांतीचा भ्रांत पुरुषार्थ चालूच असतो, आणि ज्ञानाचा ज्ञान पुरुषार्थ चालू असतो. ज्ञान पुरुषार्थ मोक्षाला घेऊन जातो आणि भ्रांत पुरुषार्थ इथे संसारातच भटकवत ठेवतो.

**प्रश्नकर्ता :** प्रयत्न, प्रारब्ध आणि पुरुषार्थ हे तिन्ही एकच आहेत का?

**दादाश्री :** प्रारब्ध आणि प्रयत्न हे तर एकच आहेत. दोन्ही एकाच आई-बापाची मुले आहेत. आणि खरा पुरुषार्थ कशाला म्हणतात? ज्यात भेसळ नसते त्याला. त्यात भेसळ नसते. खऱ्या पुरुषार्थात कोणाचे अवलंबन नसते. तो तर जेव्हा करायचा असतो तेव्हा होतो आणि संसारात ज्याला पुरुषार्थ म्हणतात तो तर, पाय ठीक असतील तर स्टेशनवर जाता येईल, डोके जड नसेल तर पुढे जाता येईल, म्हणजे हे सर्व पराधीन आहे. सापेक्ष, अपेक्षासहित आहे. आणि (खरा) पुरुषार्थ निरपेक्ष असतो. जर यथार्थ पुरुषार्थात आला तर सर्व समस्यांचे निवारण होते.

**प्रश्नकर्ता :** यापूर्वी मी क्रमिक मार्गात होतो. आज अक्रम मार्गाकडे माझे ध्यान वळले आहे. तर हा माझा पुरुषार्थ मानायचा की भाग्योदय?

**दादाश्री :** तो तुमच्या पुण्याचा उदय म्हणायचा. भाग्योदय तुम्हाला या इथे घेऊन आला. मग आम्ही तुम्हाला ज्ञान दिले. म्हणजे तुम्ही पुरुष झालात आणि पुरुष झाल्यानंतर पुरुषार्थ सुरू झाला! जोवर 'मी करतो' असे समजता तोवर पुरुषार्थ झाला असे म्हणता येणार नाही. आत्म्याचे ज्ञान झाले म्हणजे 'आत्मा पाहणे-जाणणे' शिकला. 'आपण' 'ज्ञाता' आणि 'चंदुलाल' 'ज्ञेय' एवढे जाणून घेतले तेव्हापासून पुरुषार्थ सुरू झाला!

आत्मा आणि प्रकृती हे दोनच आहेत. प्रकृती पूर्णपणे प्रारब्धाधीन आहे. या क्रिया होण्यामुळे भाव आपोआप नैसर्गिक रित्या उत्पन्न होतात. हे भाव म्हणजे पुढील जन्माचा पुरुषार्थ आहे. पण लोकांना हे माहीत नाही की हा भ्रांत पुरुषार्थ आहे! पुढील जन्मासाठी जो चार्ज करतो तो भ्रांत पुरुषार्थ आणि बाकी सर्व प्रारब्ध आहे. भाव तर होतातच ना? लग्न करायचे आहे हा भाव करावाच लागतो ना? पूर्वजन्मी केलेल्या भावामुळे आता आपल्याला इच्छा होतात. भाव चार्ज केला होता म्हणून असे घडले. म्हणजे भाव केले त्याला पुरुषार्थ म्हटले जाते आणि द्रव्याला प्रारब्ध म्हटले जाते. पण लोक तर त्यांच्या भाषेत द्रव्यालाच पुरुषार्थ म्हणतात. आणि भाव पुरुषार्थ तर त्यांना समजतच नाही.

या अक्रम मार्गात द्रव्य आणि भाव दोन्हीही डिस्चार्ज स्वरूपात ठेवले आहे. क्रमिक मार्ग भावाच्या आधीन आहे. अक्रम मार्गात तर आपण स्वभावात आलो, म्हणून बाकी सर्व परभाव आहेत. आपण सर्व भाव एका बाजूला ठेवले आणि द्रव्याचा समभावाने निकाल करण्यास सांगितले.

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत 'स्वत:ला' जाणले नाही, तोपर्यंत पुरुषार्थ केला असे म्हणताच येणार नाही का?

**दादाश्री :** खरा पुरुषार्थ झाला असे म्हणता येणार नाही, पण भ्रांत पुरुषार्थ तर होईल. जर मन-वचन काया यांची एकात्मवृत्ती असेल, तर भ्रांत पुरुषार्थातून बीज पडते. त्याला व्यवहार पुरुषार्थ म्हणतात. मनात जसे असेल तसेच बोलेल आणि तसेच वर्तन असेल. आणि शुभात पडला तर व्यवहार पुरुषार्थात फायदा होतो. आणि असे करता करता 'रियल'चे योग जुळून येतात. म्हणूनच शुभची प्रशंसा केली आहे. हा भ्रांत पुरुषार्थ एक प्रकारे पुरुषार्थच आहे. त्याला भ्रांत पुरुषार्थ का म्हटले आहे ते तुम्हाला समजावतो. क्रमिक मार्ग असा आहे की जर कुणाला जप करायला बस असे सांगितले, तर तो जप करायला बसतो. जप तर प्रारब्धामुळे होतो, पण त्यावेळी तो आत जो भाव करतो, त्यामुळे परत पुढील जन्माचे बीज टाकतो. त्याला पुरुषार्थ म्हणतात. म्हणजे प्रारब्ध

भोगत असताना आत पुरुषार्थ उत्पन्न होतो. प्रारब्ध भोगत असताना आत पुरुषार्थाचे बीज टाकतो. कारण 'मी कर्ता आहे' असे भान आहे म्हणून. अन्यथा प्रारब्ध भोगताना बीज पडणार नाही आणि मोक्षाला जाईल. पण कर्ताभाव आहे, म्हणून प्रारब्धावर आणि क्रियांवर फार जोर देत असत. कारण त्यासोबत पुरुषार्थ आपोआप होतच असतो.

आज तर तो क्रमिक मार्ग फ्रॅक्चर झाला आहे. जप करायला बसला तर जप करत जातो आणि मनात भाव ठेवतो की 'माझे वडील नालायक आहेत, माझे वडील नालायक आहेत... मला त्रास देतात. मला पिळून घेतात.' अर्थात मनात वेगळे, वाणीत वेगळे आणि वर्तनात वेगळेच असते. नाहीतर आतापर्यंत क्रमिक मार्ग कसा होता की प्रारब्ध भोगताना पुरुषार्थ करा. आणि अक्रम मार्ग म्हणजे काय? सरळ 'डायरेक्ट' पुरुषार्थ. 'ज्ञानी पुरुषां'च्या कृपेमुळे पुरुष होऊन पुरुषार्थ उत्पन्न होतो. संपूर्ण जागृतीत येतो, एकदम प्रकाश पडतो! मग एक सेकंद देखील तुम्ही तुमचे 'स्वरूप' विसरत नाही!

## प्रारब्ध उदयास कसे येते?

**प्रश्नकर्ता :** पण पुरुषार्थ केला तरच प्रारब्ध येईल ना?

**दादाश्री :** तो पुरुषार्थ नाही. तो नैमित्तिक प्रयत्न आहे. नैमित्तिक प्रयत्न तुम्ही करत राहा.

**प्रश्नकर्ता :** ते प्रारब्धाचेच नैमित्तिक कर्म आहे?

**दादाश्री :** ते प्रारब्धाच्या आधारानेच होणार आहे. प्रारब्धाच्या प्रेरणेनेच होणार आहे.

**प्रश्नकर्ता :** प्रारब्ध म्हणजे काय?

**दादाश्री :** प्रारब्ध म्हणजे मागील जन्मात भावकर्म बांधलेले असते. आता ते भावकर्म जाते 'कॉम्प्युटर'कडे, म्हणजेच समष्टीमध्ये जाते आणि समष्टीत त्याची भेट निसर्गाशी होते, दुसरी सर्व नैसर्गिक कारणेही एकत्र येतात आणि मग इथे आपल्याला रूपकाच्या स्वरूपात

ते प्राप्त होते. 'व्यवस्थित शक्ती' आपल्याला ते रूपकाच्या रुपात देते. मग प्रारब्ध उठवील तर आपण उठावे आणि चालविल तसे चालावे. वाईट विचार देखील त्याच्या माध्यमातून येतात आणि चांगले विचार देखील त्याच्याच माध्यमातून येतात. ही खूप सूक्ष्म गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** आता जे प्रारब्ध आहे, ते पूर्वजन्मातील आपल्या भावांचे फळ आहे?

**दादाश्री :** हो, ते पूर्वजन्मातील भावांचे फळ आहे, आणि आता जे नवीन भाव उत्पन्न होत आहेत, ते पुढील जन्माचे कारण आहे.

**प्रश्नकर्ता :** नवीन भाव उत्पन्न होतात ते याच जन्मात फळ देणार नाही का?

**दादाश्री :** नाही, काहीही फळणार नाही. नवीन भाव हे कॉजेस आहेत आणि कॉजेसचा पुढील जन्मात इफेक्ट होतो. म्हणजे 'कॉजेस आणि इफेक्ट' 'इफेक्ट आणि कॉजेस' असे चालतच राहते. अनंत जन्मांपर्यंत चालतच राहते! जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' कॉजेस बंद करत नाहीत, भावकर्माचा कर्ता बंद होत नाही, तोपर्यंत ते चक्र चालतच राहते!

## सफलता आणतो तोच पुरुषार्थ

**प्रश्नकर्ता :** दृढ पुरुषार्थ करून प्रारब्ध बदलता येते का?

**दादाश्री :** फक्त पुरुषार्थच असेल तर बदलता येईल. पण पुरुषार्थ कशाला म्हणतात हे तर माहीत असायला हवे ना? माहीत असल्याशिवाय कसे होईल? या नोटांमध्ये एक खरी असेल आणि दुसरी नकली असेल, त्यातील खरी नोट जर आपण ओळखली नाही आणि नकली नोट घेऊन गेलो तर कोण पैसे देईल? पुरुषार्थ कशाला म्हणता तुम्ही?

**प्रश्नकर्ता :** धर्म आणि मोक्षासाठी ज्या क्रिया करतो, तो पुरुषार्थ!

**दादाश्री :** त्याला पुरुषार्थ म्हणत नाहीत. ती हितकारी कृत्ये केली असे म्हणतात. आणि त्यांच्याशिवाय जी जी करता ती सर्व अहितकारी.

हे तर हितकारी आणि अहितकारीबद्दल झाले, पण पुरुषार्थ कशाला म्हणतात? आपण जे करू ते सफल होईल त्याला पुरुषार्थ म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** कोणी म्हणतात की आपण श्रम केले तरच प्रारब्ध प्राप्त होईल आणि कोणी म्हणतात की प्रारब्धात असेल तरच श्रम करण्याची संधी मिळेल. यातील खरे काय?

**दादाश्री :** या डोळ्यांनी जे काही दिसते, कानांनी जे काही ऐकू येते, नाकांनी जो जो सुगंध घेतो, जीभेने जे जे चाखतो, त्वचेने ज्याचा स्पर्श जाणवतो, या पाच इंद्रियांच्या ज्ञानाद्वारे जे जे अनुभवास येते. ते सर्वच प्रारब्ध आहे. बोला आता, हे सर्व लोकांना कसे समजेल?

**प्रश्नकर्ता :** पण पुरुषार्थाची गरज तर आहेच ना?

**दादाश्री :** खरे तर हे सर्व प्रारब्धच आहे. खरा पुरुषार्थ लोकांना समजला नाही, म्हणून भ्रांत पुरुषार्थ शोधून काढला. भ्रांत पुरुषार्थ हा 'इल्यूजन' (भ्रांती) सारखा आहे. पुरुषार्थ शोधून सापडेल असा नाही. पुरुषार्थ जर शोधता आला ना, तर उद्याच सर्व जण पुरुषार्थ करून मोक्षाला जातील! पण ते, तर प्रारब्धच बदलत राहतात. म्हणून त्यांची मेहनत फुकट जाते. परंतु मी तर ते सहजरित्या सांगतो. म्हणून त्यांची मेहनत फळाला येते. जो सफल होतो त्याला पुरुषार्थ म्हणतात. नाहीतर अनंत जन्मांपर्यंत डोकेफोड केली तरी काहीही निष्पन्न होणार नाही. कारण अज्ञानींची डोकेफोड! अज्ञानीद्वारा अज्ञान कधीही जात नाही.



## [ 4 ]
# श्रद्धा

## अंधश्रद्धा-अज्ञश्रद्धा

एक मोठे फार्म सुपरिटेंडंट होते. ते मला म्हणाले की आम्ही अंधश्रद्धा ठेवत नाही. त्यांची ही गोष्ट आम्ही लक्षात ठेवली. नंतर आम्ही फार्ममध्ये फिरत होतो. मध्ये पन्नास फुटांचे शेत लागले. त्यात खूप उंच गवत होते. ते ओलांडताना ते भाऊ चार चार फुटांच्या लांब उड्या मारत पलीकडे गेले. मी त्यांना विचारले 'या गवतात साप आहे की विंचू आहे हे आपल्याला माहीत नव्हते तर मग कोणत्या आधारावर आपण पाऊल टाकत होतात?' किती जबरदस्त अंधश्रद्धा आहे!

अंधश्रद्धेशिवाय तर भोजनही करता येणार नाही, स्टीमरमध्ये बसता येणार नाही, आणि टॅक्सीत देखील बसता येणार नाही. कुठल्या श्रद्धेने टॅक्सीत बसता? एक्सिडन्ट होणार नाही अशी तर तुमची श्रद्धा नाही! घरी पाणी पिता तर त्यात पाल पडलीय का कुठला जीवजंतू पडला आहे की कुणी शेजाऱ्याने ढेकूण मारण्याचे औषध टाकले आहे की नाही, हे तपासता का? म्हणजे आंधळ्या विश्वासाशिवाय तर क्षणभर देखील चालणार नाही.

तुम्ही ज्याला अंधश्रद्धा म्हणता किंवा समजता ती अंधश्रद्धा नाही, अज्ञश्रद्धा आहे. संपूर्ण जगत अज्ञश्रद्धेतच आहे. लहान मुले बाहुला-बाहुलीशी खेळतात ती अज्ञश्रद्धा आहे, तसेच धर्मातही अज्ञश्रद्धा असते.

फक्त स्वत: 'ज्ञानी पुरुष' अंधश्रद्धारहित असतात, तरी सुद्धा देह अंधश्रद्धेत असतो. आता आम्ही सुद्धा घरी जाऊन तपासून न पाहता पाणी पिऊ, पण आम्हाला देहाचा मालकीभाव नाही.

## आत्मश्रद्धा -प्रभुश्रद्धा

**प्रश्नकर्ता :** आत्मश्रद्धा आणि प्रभुश्रद्धा यात काय फरक आहे?

**दादाश्री :** प्रभुश्रद्धेत प्रभु वेगळा आणि मी वेगळा, असे वेगळेपण मानले जाते आणि आत्मश्रद्धा म्हणजे स्वत: आत्मा होऊन आत्म्याची भक्ती करणे होय. ही प्रत्यक्ष भक्ती आणि ती परोक्ष भक्ती म्हटली जाते. ज्यांना आत्मअनुभव आला नाही, त्यांच्यासाठी ते ज्याला प्रभु म्हणतात, तोच त्यांचा आत्मा आहे, पण त्याची त्यांना जाणीव नसते. म्हणूनच प्रभुच्या नावाने आराधना करतात, पण परोक्ष रूपाने त्यांच्याच आत्म्यापर्यंत पोहोचते.

## श्रद्धा आणि ज्ञान

**प्रश्नकर्ता :** श्रद्धेशिवाय ज्ञान होऊ शकते की नाही?

**दादाश्री :** हे अज्ञान पण श्रद्धेशिवाय होत नाही. श्रद्धा, ही 'कॉज' आहे आणि ज्ञान हा 'परिणाम' आहे.

स्वरूप ज्ञान झाल्यावर कसे बनायला हवे? श्रद्धेची प्रतिमा बनायला हवे! पाहताक्षणीच सर्वांना श्रद्धा निर्माण होईल असे हवे. श्रद्धेची प्रतिमा क्वचितच प्रकट होते!



# [ 5 ]
# अभिप्राय

## अभिप्रायांचा आंधळेपणा

कोणी तीन पत्तीवाला (पत्ते खेळणारा) इथे आला असेल आणि त्याच्याबद्दल तुमचा अभिप्राय बनला असेल की हा 'तीन पत्तीवाला आहे.' तर तो जोपर्यंत इथे बसलेला असेल तोपर्यंत तुम्हाला खटकत राहील, दुसऱ्या कुणाला नाही खटकणार, त्याचे काय कारण?

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांना माहीत नाही की तो 'तीन पत्तीवाला आहे', म्हणून.

**दादाश्री :** दुसऱ्यांना माहीत आहे, पण त्यांनी अभिप्राय ठेवला नाही आणि तुम्ही अभिप्राय ठेवला आहे, म्हणून खटकते. तुम्ही अभिप्राय सोडून दिले पाहिजेत. हे अभिप्राय आपणच बांधलेले आहेत, म्हणजे ती आपलीच चूक आहे, म्हणून खटकते. समोरचा असे म्हणत नाही की, माझ्याकरिता अभिप्राय बांधा. आपल्याला खटकते, तो तर आपल्याच चुकीचा परिणाम आहे.

**प्रश्नकर्ता :** जाणल्याशिवाय एखाद्या वस्तूबद्दल मत बनविणे, तो प्रेज्युडिस (पूर्वग्रह) आहे का?

**दादाश्री :** नाही, तसे नाही. हे भाऊ नेहमी दान देतात आणि आजही ते दान देतील असे मानणे, म्हणजे प्रेज्युडिस. एखादी व्यक्ती रोज आपली काही तरी कुरापत काढत असेल आणि आज भोजनाचे आमंत्रण द्यायला आला तर त्याला पाहताच विचार येतो की आता हा काहीतरी कुरापत काढणार, त्याला प्रेज्युडिस म्हणतात. या प्रेज्युडिसमुळे

संसार उभा राहिला आहे. एखाद्याबद्दलचे पूर्वीचे जजमेंट सोडून द्या. कारण तो तर बदलतच असतो. चोराने आपल्यासमोर चोरी केली तरी त्याच्याबद्दल पूर्वग्रह ठेऊ नका. कारण उद्या कदाचित तो सावकार सुद्धा झाला असेल. आम्हाला एका क्षणापुरता देखील पूर्वग्रह होत नाही.

## अभिप्राय आणि इंद्रिये

आंबा चवदार असेल तर इंद्रिये त्याचा स्वीकार करतीलच. समोर दिसला की तो लगेच खाऊ लागतो. पण खाल्यानंतर आंबा परत आठवतो, ते का? कारण त्याने अभिप्राय बनवला होता की, 'आंबा खूप छान आहे.' इंद्रिये काही आठवत नाहीत. ती तर बिचारी समोर दिसला की खातात. आपले अभिप्राय आपल्याकडून राग-द्वेष करवितात. अभिप्राय सुटले की सहज दशा होईल.

अभिप्राय बांधले की राग-द्वेष होतात. जिथे अभिप्राय नाही तिथे राग-द्वेष नाही.

## अभिप्रायातून अटकण

**प्रश्नकर्ता :** अभिप्राय बांधले गेले असतील आणि ते सुटत नसतील तर काय होते?

**दादाश्री :** एखाद्या वस्तूबद्दल जर जबरदस्त अभिप्राय बनवला तर *अटकण* (जी बंधनरूप होते, पुढे जाऊ देत नाही) होतेच. अभिप्राय जर वेगवेगळ्या जागी विखुरलेले असतील तर ते काढणे सोपे होते, परंतु जर *अटकणसारखे* असतील तर मात्र काढणे कठीण आहे. तो एक मोठा रोग आहे. विषय राग-द्वेष वाले नाहीत, अभिप्रायाची मान्यताच राग-द्वेष आहे.

## अभिप्राय कसे सुटतील?

**प्रश्नकर्ता :** गाढ अभिप्राय कसे काढावे?

**दादाश्री :** जेव्हापासून अभिप्राय सोडायचे आहेत असे ठरविले तेव्हापासून ते निघू लागतात. फार गाढ असतील तर, त्यांना रोज दोन-

दोन तास खोदून काढले तर ते संपून जातात. आत्मा प्राप्त झाल्यावर पुरुषार्थ धर्म प्राप्त झाला असे म्हणतात आणि पुरुषार्थ धर्म पराक्रमापर्यंत पोहोचू शकतो, जो कसल्याही *अटकणला* उपटून फेकून देऊ शकतो. पण एकदा जाणून घेतले पाहिजे की कोणत्या कारणामुळे हा (अभिप्राय) उत्पन्न झाला आहे, मग त्याचे प्रतिक्रमण करावे.

घरातील सर्वांचे एक दुसऱ्याबद्दलचे अभिप्राय निघून गेले तर घर कसे स्वर्गासारखे होईल!

**प्रश्नकर्ता :** आम्हाला कोणाबद्दल काही खास अभिप्राय असेल की याची प्रकृती अशीच आहे, तेव्हा मनात असे येते की याला सांगितले नाही तर हा ठिकाणावर येणार नाही.

**दादाश्री :** जोपर्यंत, समोरच्याला रागवल्याशिवाय चालणार नाही, असा अभिप्राय तुटत नाही, तोपर्यंत कुणाशी काही झाले तर रागवल्याशिवाय राहणार नाही, मागील रिॲक्शनस् तर येतीलच ना! आपण ठरवले की अभिप्राय सोडायचा आहे, तरी पण काही काळ मागील रिॲक्शन राहतील. समोरच्यालाही राहतील आणि आपल्यालाही राहतील.

**प्रश्नकर्ता :** अभिप्राय सारखे सारखे त्रास देतात.

**दादाश्री :** त्या अभिप्रायांचाही अभिप्राय ठेवायचा नाही. असा काही उपाय करायला हवा.

**प्रश्नकर्ता :** अभिप्राय कोण ठेवतो?

**दादाश्री :** हा आंबा इथे ठेवला, तर आपल्या प्रकृतीनुसार इंद्रियांना छान वाटते. पण इंद्रिये काही चांगला किंवा वाईट अभिप्राय बांधतील असे नाहीत, तो त्यांचा स्वभाव नाही. लोकसंज्ञा यात खूप काम करते. लोकांनी जे मानले त्याच्यावर त्याची 'बिलीफ' (मान्यता) बसते की हे चांगले आणि ते वाईट. मग बुद्धी ठरवते आणि काम करते. ज्ञानींच्या संज्ञेमुळे लोकसंज्ञा नाहीशी होते, तेव्हा त्यातून सुटका होते.

कोणाबद्दल थोडा देखील उलटा किंवा सरळ विचार आला की लगेच तो धुऊन टाकावा. तो विचार थोडावेळ जरी राहिला तरी तो

समोरच्यापर्यंत पोहोचतो, आणि मग वाढीस लागतो. चार तासात, बारा तासात किंवा दोन दिवसांनी सुद्धा तो उगवतो. म्हणूनच स्पंदनाचा प्रवाह त्या बाजूला जाता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी आपण काय करायला हवे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण करून लगेच पुसून काढायला हवे. प्रतिक्रमण होत नसेल तर 'दादां'ना आठवून किंवा आपल्या इष्ट देवतेला आठवून थोडक्यात सांगावे की, 'असे विचार येत आहेत ते चांगले नाहीत, ते माझे नाहीत.'

समोरच्याबद्दल आपला अभिप्राय तुटला की मग आपण त्याच्याशी गोड बोलतो आणि मग तो देखील खुश होतो. पण त्याला अभिप्रायासहित पाहिले, त्याचे दोष पाहिले, तर आपल्या मनाची छाप त्याच्या मनावर पडते. मग तो समोर आला तरी आपल्याला आवडत नाही, तो फोटो (परिणाम) लगेच त्याच्या आत पडतो.

अभिप्राय बदलण्यासाठी काय करावे लागेल? चोर असेल तर मनात त्याला 'सावकार, सावकार' म्हणावे. हा चांगला मनुष्य आहे, शुद्धात्मा आहे, आमच्याकडूनच चुकीचा अभिप्राय पडला आहे, असे आत बदलत राहावे.

अभिप्रायामुळे वाणी थोडीशी बिघडली आहे, त्यामुळे *तंतीली* (बोचणारी, वादग्रस्त) वाणी निघते. *तंतीली* वाणी बोलल्यामुळे समोरचा सुद्धा वाद घालतो.

कोणावर संशय असता कामा नये. संशय येणे, हा आधी बनविलेल्या अभिप्रायांचा परिणाम आहे.

पाहा ना, हल्लीची मुले इतके लांब केस ठेवतात, ते का? कारण त्यांच्या अभिप्रायात आहे की ते चांगले दिसते, आणि या भाऊंना लांब केस ठेवायला सांगितले तर? त्यांना ते आवडणार नाही. हे अभिप्रायाचेच साम्राज्य आहे. बुद्धीने ज्याच्यात सुख मानले त्याचे हे अभिप्राय आहेत. अभिप्राय बुद्धीच्या आशयाच्या आधीन आहे.

कोणी आपल्याला दगा दिला असेल, तर नंतर त्याची आठवण काढू नये. सध्या वर्तमानात तो काय करत आहे ते पाहावे. नाही तर त्याला प्रेज्युडिस (पूर्वग्रह) म्हटले जाईल. पूर्वीच्या गोष्टी आठवल्याने खूप नुकसान होते.

**प्रश्नकर्ता :** पण ध्यानात तर ठेवायला हवे ना?

**दादाश्री :** ते तर आपोआपच असते. ध्यानात ठेवला तर तो प्रेज्युडिस होतो. प्रेज्युडिसमुळे तर उलट सगळा संसार बिघडतो. आपण वीतराग भावात राहायला हवे. मागचे सर्व लक्षात तर राहीलच पण त्याचा काही उपयोग नाही. आपल्या कर्मांचा उदय तसा होता, म्हणून त्याने आपल्याबरोबर तसे वर्तन केले. उदय चांगले असतील तर चांगले वर्तन करील. म्हणून प्रेज्युडिस ठेऊ नका. तुम्हाला कसे कळेल की, काल ज्याने फसवले, तोच आज फायदा करून देण्यासाठी आला नसेल कशावरून? आणि तुम्हाला त्याच्याशी व्यवहार करायचा असेल तर करा आणि नसेल करायचा तर नका करू. पण प्रेज्युडिस मात्र ठेऊ नका! आणि जर कदाचित व्यवहार करण्याची वेळ आलीच, तर प्रेज्युडिस अजिबात ठेऊ नका.

**प्रश्नकर्ता :** अभिप्राय वीतरागता तोडतात का?

**दादाश्री :** हो. आपण अभिप्राय ठेऊ नये. अभिप्राय अनात्म विभागाचे आहेत, तुम्ही ते 'जाणा' की ते चुकीचे आहेत, नुकसानकारक आहेत. स्वतःचे दोष, स्वतःच्या चुका, स्वतःचे व्ह्यू पॉइंटस, यामुळे अभिप्राय बांधले जातात. तुम्हाला अभिप्राय बांधण्याचा काय अधिकार आहे?

**प्रश्नकर्ता :** अभिप्राय बांधला गेला आणि तो पुसला नाही, तर नवे कर्म बांधले जाते का?

**दादाश्री :** हे अक्रम विज्ञान प्राप्त झाले असेल आणि आत्मा –अनात्मा यांचे भेदज्ञान झाले असेल, तर त्याला नवीन कर्म बांधले जात नाही. हो, पण अभिप्रायांचे प्रतिक्रमण झाले नसेल तर समोरच्या व्यक्तीवर त्याचा परिणाम होत राहतो, त्यामुळे त्याचे तुमच्याबद्दल (चांगले) भाव होत नाहीत. शुद्ध भावात राहिले तर एकही कर्म बांधले जाणार नाही,

आणि जर प्रतिक्रमण केले तर तो परिणामही उडून जाईल. साताने गुणले त्याला साताने भाग दिला, तोच पुरुषार्थ!

जन्मापासून मृत्यूपर्यंत सर्व काही सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सच्या हाती आहे, तर अभिप्राय बांधण्याची गरजच काय? स्वरूपज्ञान मिळाल्यानंतर, ज्ञाता-ज्ञेय असा संबंध प्राप्त झाल्यावर, दोन-पाच अभिप्राय पडले असतील त्यांना काढून टाकले, तर 'विथ ऑनर्स' पास होऊ आपण!

अभिप्रायामुळे जसे आहे तसे पाहता येत नाही, मुक्त आंनदाचा अनुभव येत नाही, कारण अभिप्रायाचे आवरण असते. जेव्हा अभिप्रायच राहत नाहीत तेव्हा निर्दोष होऊ शकतो. स्वरूपज्ञानानंतर अभिप्राय असेपर्यंत तुम्हाला मुक्त म्हटले जाते, पण महामुक्त म्हटले जात नाही. अभिप्रायामुळेच अनंत समाधी थांबून राहिली आहे.

पूर्वी जे कॉजेस होते, त्यांचा आता इफेक्ट येत आहे. पण त्या इफेक्टवर 'चांगले आहे, वाईट आहे' असा अभिप्राय दिला जातो, त्यामुळे राग-द्वेष निमार्ण होतात. क्रियेमुळे कॉजेस बांधले जात नाहीत तर अभिप्रायामुळे कॉजेस बांधले जातात.

## स्वागतार्ह अभिप्राय

वस्तूंचा उपभोग घ्यायला हरकत नाही. पण त्यावर अभिप्राय राहता कामा नये. 'आता मला काही हरकत नाही' असा देखील अभिप्राय असता कामा नये. खोटे बोलावे लागले त्याला हरकत नाही, पण अभिप्राय मात्र खरे बोलण्याचाच असला पाहिजे.

अब्रह्मचर्याला हरकत नाही, पण तसा अभिप्राय असता कामा नये. अभिप्राय तर ब्रह्मचर्याचाच असला पाहिजे. अभिप्राय तर 'हा देह म्हणजे धोका आहे' असाच असला पाहिजे. कुठल्याही प्रकारचा अभिप्राय बोजा वाढवतो. ज्याचा अभिप्राय त्याचा बोजा!

आपण समोरच्याबद्दल अभिप्राय ठेवतो म्हणून तोही आपल्यावर ठेवतो. आपण आपला अभिप्राय तोडला तर त्याचा अभिप्राय आपोआप निघून जाईल.

## अभिप्रायाचे स्वरूप

**प्रश्नकर्ता :** अभिप्राय म्हणजेच प्रतिष्ठित अहंकार का?

**दादाश्री :** हो. अभिप्राय अहंकाराच्या परमाणूंपासून बनतो. अभिप्राय व्यक्तित्व दाखवितो. अभिप्रायामुळे दृष्टीच बदलून जाते.

अभिप्राय मृतप्राय असतील, त्यात आग्रह नसेल तर हरकत नाही, ते लवकर निघून जातात. परंतु ज्या अभिप्रायात आग्रह आहे, ते ज्ञानावर आवरण आणतात.

## मिश्रचेतनाबद्दल अभिप्राय

जडवस्तूबद्दल अभिप्राय दिला तर त्याला काही फार हरकत नाही, त्याला सोडायला वेळ लागत नाही. पण मिश्रचेतनाबद्दलच्या अभिप्रायांपासून सावध राहा, असे आम्ही सांगतो.

आपापल्या पत्नीबद्दल प्रत्येकाचे अभिप्राय पडलेले असतात. म्हणूनच भांडणे होतात.

'मी चंदुलाल आहे' हा देखील अभिप्रायच आहे ना? तुम्ही जसे आहात तसे मानत नाही, आणि नाही आहात तसे मानता.

घरातील सर्व लोकांबद्दल अभिप्राय बांधले गेलेले असतात. ज्यांचे चेहरे कधी उतरतात, तर कधी फुगतात, अशा मिश्रचेतनाबद्दल अभिप्राय बांधूच नका. अभिप्राय हेच अंतराय आहेत. पाप जळून जाऊ शकते, पण अभिप्रायांचे अंतराय तर स्वत:साठीच हानिकारक बनतात. ज्यापासून सुटायचे आहे तिथेच अधिक गुंता निर्माण होतो.

स्वत:चे हावभाव स्वत:लाच कडू वाटतात. पण ते पुद्गलाचे आहेत. आपण आपल्या राजीखुशीने अभिप्रायांचा माल भरला आहे. प्रत्येकाचे स्वत:च्या अभिप्रायानुसार हावभाव होत असतात.

'शुद्धात्मा' तर आहे, पण प्रतिष्ठित आत्म्याचा अभिप्राय उत्पन्न झाला आहे, त्यामुळे त्यानुसारच 'मशिनरी' चालेल. 'शुद्धात्म्या'शिवाय इतर सर्वच मशिनरी आहेत.



# [ 6 ]
# कौशल्याचा आंधळेपण

## कुशलता, एक्सपर्ट होणे थांबवते

आम्हाला लिहिणे वगैरे जमत नाही, पेन पकडतासुद्धा येत नाही. आम्हाला काहीच येत नाही. संसाराचे काही येत नाही त्याचे नाव 'ज्ञानी'. आम्ही अबुद्ध आहोत.

**प्रश्नकर्ता :** आपण स्वतःला अबुद्ध म्हणता, पण आम्हाला तर तुम्ही प्रबुद्ध वाटता.

**दादाश्री :** पण मी तर प्रत्येक गोष्टीचा अनुभव घेतल्यानंतरच बोलतो. आज सत्तर वर्षांचे वय झाले, पण अजून मला दाढी करता येत नाही. लोक मनात मानतात की त्यांना दाढी करता येते, तो सर्व इगोइजम आहे. काहींनाच, फार थोड्या लोकांनाच दाढी करता येत असेल. मला स्वतःलाच कळते की, हा रेजर कसा पकडला पाहिजे, किती डिग्रीत पकडला पाहिजे, त्याबद्दल मला काहीच माहीत नाही. आम्ही त्यातले एक्सपर्ट झालेलो नाही. जोवर मी एक्सपर्ट होत नाही, तोवर मला येत नाही असेच म्हणावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** एक्सपर्ट होण्यात आपल्याला काही फायदा दिसत नाही ना?

**दादाश्री :** फायद्याची गोष्ट नाही. पण 'जसे आहे तसे' मी

म्हणतो की मला दाढी करता येत नाही. तुम्हाला वाटेल की असे कसे असू शकते? पण तुम्हाला येते तेच खोटे आहे. तो फक्त इगोइजम आहे. काहींना तर ब्लेडचा उपयोग करताच येत नाही, ब्लेड वापरले गेले की नाही ते सुद्धा समजत नाही. असा सर्व गोंधळ चालू असतो.

**प्रश्नकर्ता :** एक्सपर्ट म्हणजे?

**दादाश्री :** मनुष्य एक्सपर्ट होऊ शकत नाही. एक्सपर्ट असणे ही तर निसर्गाची देणगी आहे. या आत्मविज्ञानात मी पण एक्सपर्ट झालो आहे, ती देखील निसर्गाची देणगी आहे. नाही तर मनुष्य ज्ञानी कसा बनू शकेल? म्हणूनच आम्ही म्हणतो की 'धिस इज बट नॅचरल'.

अरे, मला तर चालता देखील येत नाही. लोक म्हणतात की दादा खूप चांगले चालतात! पण मी तर ज्ञानदृष्टीने पाहतो, म्हणून मला कळते की मला चालतासुद्धा येत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण आम्हाला तर आपले सर्व आदर्शरूपच वाटते.

**दादाश्री :** तसे वाटते, पण मी ज्ञानरूपाने पाहतो, अंतिमस्थितीतील चश्म्यातून पाहतो, म्हणून अंतिम प्रकाशात हे सर्व कच्चे वाटते.

काहीजण मला म्हणतात की दादा, आपल्यासोबत बसून आम्ही कसे जेवावे हे शिकलो. पण माझे मलाच माहीत आहे की मला जेवताच येत नाही. जेवताना जेवणाऱ्याचा फोटो कसा असला पाहिजे, चारित्र्य कसे असले पाहिजे, ते आमच्या लक्षात असतेच. पण ते कोणाला असते? देणगीवाल्याला असते.

एका बाजूला अहंकार असणे आणि एका बाजूला एक्सपर्ट होणे, ह्या दोन्ही गोष्टी एकत्र असूच शकत नाहीत. अहंकारच एक्सपर्ट होण्यापासून रोखतो.

आम्ही अबुध आहोत हे आम्ही अनुभवपूर्वक सांगतो, असेच काही सांगत नाही. तरी पण तुम्हाला प्रबुध दिसतात ती तुमची दृष्टी आहे. पण आमची दृष्टी कुठे असेल? हे तुम्हाला समजले का? आमची अंतिम दृष्टी आहे.

व्यापारातही मी स्वत:ला एक्सपर्ट समजत होतो. हे ज्ञान झाल्यानंतर तटस्थ दृष्टीने पाहिले, लोकांना व्यापार करताना पाहिले तेव्हा मला समजले की आपल्याला तर काहीच येत नाही. हा तर केवळ इगोइजमच आहे. काही पाच-सात लोकांनी मानले, स्वीकारले म्हणून काय सर्व कौशल्य आले का?

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपल्या दृष्टीने अबुधता ठीक आहे, पण व्यावहारिक दृष्टीने?

**दादाश्री :** 'मी बुद्ध आहे' असे भान आणि हे ज्ञान हे दोन्ही एकत्र राहूच शकत नाहीत. आमच्यापाशी ज्ञानाचा फुल प्रकाश आहे, म्हणून आम्हाला बुद्धीची गरजच नाही ना? बुद्धी इमोशनल करते आणि ज्ञान मोशन (संतुलन)मध्ये ठेवते.

आम्हाला संसाराचा विसर पडलेला असतो. आम्हाला सही सुद्धा करता येत नाही. पंधरा-वीस वर्षांपासून काहीच लिहिले नाही, म्हणून सर्व विस्मृत झाले आहे. हा संसार आपोआप विस्मृत होईल असे आहे. त्यासाठी एवढे सारे प्रयोग करण्याची गरज नाही. परिचय सुटला की विस्मृत होतो. म्हणजे परिचय सुटला पाहिजे. साधारण व्यवहाराला हरकत नाही, परिचयाला हरकत आहे.

## निष्कर्षाचे वहीखाते

मागील जन्मातून काय काय सोबत घेऊन आला आहात? चंदुभाईला लागणाऱ्या सर्व वस्तू घेऊन आला आहात, मनाला लागणाऱ्या सर्व वस्तू घेऊन आला आहात, चित्ताला लागणाऱ्या सर्व वस्तू घेऊन आला आहात, बुद्धीला, अहंकाराला लागणाऱ्या सर्व वस्तू घेऊन आला आहात. आता या लागणाऱ्या सर्व वस्तू निसर्ग तुम्हाला सप्लाय करतो (पुरवतो) आणि तुम्ही म्हणता की मी करतो. सगळेच तयार असेल तर आपण केले असे कसे म्हणायचे? जे तयार नाही ते करायचे आहे, त्याला पुरुषार्थ म्हणतात.

हे सर्व तर तुम्ही तयार घेऊन आला आहात. दुकान, ऑफिस,

पत्नी, मुले सर्व तयार सामान घेऊन आले आहात. हा वहीखात्याचा हिशोब आहे. आत्म्याचा कोणी पिताही नसतो आणि पुत्रही नसतो. कर्माच्या वहीखात्यातील देण्याघेण्याच्या हिशोबासाठी सर्व एकत्र आलेले असतात. आणि आता पुढे काय करायचे हे माहीत नसल्यामुळे आज नांगरणी करत राहतात. अहो, हे तर नांगरलेलेच आहे, तयारच आहे. त्यात फार लक्ष घालायची गरजच नाही. चित्त सहज (अवस्थेत) ठेवून दुसरे सर्व करा. जन्मापासून मृत्यूपर्यंतची सर्व स्टेशनस् अनिवार्यपणे घेऊन आलेले आहात. स्वत:ला आवडत असेल तेव्हा म्हणतात माझ्या मर्जीनुसार आहे आणि आवडत नसेल तर म्हणतात अनिवार्य आहे. खरे तर सर्व काही अनिवार्यच आहे. हे सर्व जाणून घ्यावे लागेल ना? कधीपर्यंत थापा चालू द्यायच्या? काही तरी निष्कर्ष तर काढावा लागेल ना? निष्कर्षाचे खाते सोबत ठेवायला हवे. भाजी आणायला गेलात ते अनिवार्य आहे, ती आणायलाच हवी, पण रस्त्यात कोणी तुम्हाला नमस्कार केला तर छाती अशी फुगून जाते! त्याने नुकसानच होते ना? म्हणून वहीखाते पाहून निष्कर्ष काढायला हवा की कुठे नुकसान झाले आहे? लग्नाला गेलात आणि कोणी तुम्हाला 'या शेठ' म्हटल्याबरोबर तुम्ही हुरळून गेलात तर पाहणारा समजून जातो की शेठचे नुकसान झाले. तुम्हाला 'या, या' म्हणणे हे तर समोरच्याचे कर्तव्यच आहे, पण तुम्ही तिथे कच्चे पडता कामा नये. इतके पक्के व्हा की कधीही नुकसान होणार नाही. एकदा नुकसान झाले, दोनदा झाले, वीस वेळा झाले, पण शेवटी तुम्ही निष्कर्ष काढायला हवा की हा नमस्कार मला आहे की आत बसलेल्याला आहे? 'आत' 'भगवंत' बसलेले आहेत, ते शुद्धात्मा आहेत.



# [ 7 ]
# अंतराय

## अंतराय कसे पडतात?

**प्रश्नकर्ता :** हा संसारच असा आहे की इथे निव्वळ अंतराय (विघ्न, बाधा) आहेत.

**दादाश्री :** तुम्ही स्वत: परमात्मा आहात, पण तुम्हाला त्या पदाचा लाभ मिळत नाही, कारण निव्वळ अंतरायच आहेत. 'मी चंदुभाई' आहे म्हटले की अंतराय पडतात. कारण भगवंत म्हणतात, 'तू मला चंदू म्हणतोस?' असे अज्ञानतेने म्हटले तरी अंतराय पडतात. विस्तवात अज्ञानतेने हात घातला तर तो सोडेल का? (हात भाजणारच ना?)

आत परमात्मा बसले आहेत, अनंत शक्ती आहे आत, ती हवी तेवढी मिळेल. पण जितके अंतराय पाडाल तितकी शक्ती आवृत्त होते.

इच्छा केली की अंतराय पडतात. ज्या वस्तूची इच्छा होते तिचा अंतराय पडतो. हवा घेण्याची इच्छा होते का? म्हणून तिचा अंतराय पडत नाही. पण पाण्याची थोडी थोडी इच्छा होते म्हणून त्याचे अंतराय पडतात.

ज्ञानी पुरुषांना कुठल्याही वस्तूची इच्छा होत नसते. म्हणून त्यांना निर्‌अंतराय पद असते, प्रत्येक वस्तू त्यांना सहज मिळते. 'ज्ञानी पुरुषां'ना कोणत्याही वस्तूची भीक नसते. तुमचा भिकारीपणा सुटला तर तुम्ही स्वत:च परमात्मा आहात. भिकारीपणामुळेच ही सर्व बंधने आहेत.

स्वत:च्या वस्तूंसाठी स्वत:च अंतराय निर्माण करतात. आशयामध्ये असेल आणि जर अंतराय नसेल तर ती वस्तू इच्छा न करताच समोर येईल.

जगात सर्व वस्तू आहेत, पण मिळत का नाहीत? तर 'अंतराय बाधा आणतात'.

**प्रश्नकर्ता :** अंतराय कसे पडतात?

**दादाश्री :** हे भाऊ नाश्ता देत असतील आणि तुम्ही जर म्हटले 'आता राहू दे ना, उगाच वाया जाईल' याला अंतराय पाडले म्हणतात. कोणी दान देत असेल आणि तुम्ही म्हटले, 'यांना कशाला देता? ते तर हडप करतील. म्हणजे तुम्ही दानाचा अंतराय पाडला. मग देणारा देईल की नाही, ही वेगळी गोष्ट आहे, पण तुम्ही अंतराय पाडले. मग तुम्हाला दु:खात सुद्धा कोणी दाता मिळणार नाही.

**प्रश्नकर्ता :** वाणीने अंतराय पाडले नसतील पण मनाने पाडले असतील तर?

**दादाश्री :** वाणी ने बोललेल्याचा परिणाम याच जन्मात येतो आणि मनाने चित्रित केलेले, पुढच्या जन्मी रूपकात येते.

अर्थात हे सर्व स्वत:च पाडलेले अंतराय आहेत. नाही तर आत्म्याजवळ काय नाही? जगातील सर्व वस्तू त्याच्यासाठी तयारच आहेत. त्या तर 'आम्ही येऊ का? आम्ही येऊ का?' असे विचारत असतात. पण अंतराय म्हणतात, 'नाही, नका येऊ?' अंतराय त्या वस्तू मिळूच देत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे स्वत: अशी जागृती ठेवायला हवी की विपरीत विचार येणारच नाहीत.

**दादाश्री :** असे होणार नाही, उलटे-सुलटे विचार आल्याशिवाय राहणारच नाहीत. पण आपण त्यांना पुसून टाकावेत हेच आपले काम! तुमच्या मनात विचार आला की 'याला द्यायचे नाही.' पण मग ज्ञान हजर होते की 'आपण का अंतराय घालावा?' म्हणजे विचार लगेच पुसून टाकायला हवेत. आणि ज्याला ज्ञान नसेल तो काय करील? तुम्ही

त्याला विचारले की 'असा विचार का बरे केला?' तर उलट तो तुम्हाला म्हणेल, 'करायलाच हवा. तुम्हाला यात काय कळते?' असे उलट डबल करेल. वेडा अहंकार वाटेल ते करेल. स्वतःच स्वतःच्या पायावर कुऱ्हाड मारेल. पण आता आपण ते पुसू शकतो. मनात पश्चात्ताप करा, क्षमा मागा, आणि निश्चय करा की पुन्हा असे बोलणार नाही. तर पुसून टाकता येईल. पत्र पोस्टात टाकण्याआधी मजकूर बदलता येतो आणि जर विचार केला की दान देणे चांगले आहे, तर आधी म्हटलेले पुसले जाईल.

**प्रश्नकर्ता :** आणि जर चांगल्या कामाला अनुमोदन दिले तर?

**दादाश्री :** तर त्यामुळे देणाऱ्याला लाभ होतो आणि स्वतःला सुद्धा लाभ होतो. आपण अनुमोदन दिले नसेल तर आपल्याला अनुमोदन देणारा कोणी भेटणार नाही. पण हे सगळे ज्ञानी पुरुषांसाठी *हेय* (त्याज्य) आहे. ते सर्व संसार वाढविणारे आहेत. तरी सुद्धा ज्याला आत्म्याचे ज्ञान झालेले नाही त्यासाठी सुंदर संसाराचे साधन आहे.

या संसारात अंतराय कसे पडतात ते मी तुम्हाला समजावतो. तुम्ही ज्या ऑफिसमध्ये काम करता तिथे तुमच्या असिस्टन्टला बेअक्कल म्हटले की त्यामुळे तुमच्या अकलेवर अंतराय पडतो! बोला आता, सारे जग या अंतरायांत फसले आहे, आणि मनुष्य जन्म हरवून बसलेले आहे! समोरच्याला बेअक्कल म्हणण्याचा तुम्हाला अधिकारच नाही. तुम्ही तसे म्हणालात तर समोरचाही वाकडे बोलेल आणि त्यामुळे अंतराय पडतील! सांगा आता, जग अंतरायांपासून कसे थांबेल? कुणाला तुम्ही नालायक म्हटले की तुमच्या लायकीवर अंतराय पडतात! तुम्ही लगेच त्याचे प्रतिक्रमण केले तर अंतराय पडण्यापूर्वीच धुतले जातील.

वेलची महाग, लवंग महाग, सुपारी महाग म्हणून लोक खात नाहीत. हे खायला मिळत नाही कारण तसे अंतराय पाडले आहेत म्हणून. घरात सात जण श्रीखंड खात असतात आणि एक जण बाजरीची भाकरी आणि ताक खात असतो, कारण डॉक्टरने सांगितले आहे की श्रीखंड खाशील तर मरशील! हे असे अंतराय कशामुळे पडतात? तर जेवण समोर आल्यावर कधीतरी त्याचा तिरस्कार केला असेल, त्यामुळे.

## मोक्षमार्गात अंतराय

मोक्षमार्गात अंतराय आले की स्वत:च्या शक्ती अधिक प्रकट होत जातात. म्हणून त्यात जरी अंतराय आले तरी पण आपण आपला निश्चय दृढ ठेवायला हवा. आणि 'मला थांबवण्याची कुणाची हिम्मत नाही' असा भाव ठेवायला हवा. पण हे बोलून दाखवण्याची गरज नाही, बोलणे हा तर अहंकार आहे.

स्वत:चा अनिश्चय हाच अंतराय आहे. निश्चय केला की अंतराय दूर होतात. आत्म्याचा निश्चय झाला की सर्व अंतराय तुटतातच ना!?

सांसारिक बुद्धीच्या अंतरायांना जास्त हरकत नाही, पण धार्मिक बुद्धीचे अंतराय तर अनंत जन्म भटकावयास लावतात. कित्येक साधू, साध्वी, आचार्य, महाराजांचे 'रिलेटिव्ह' धर्माचे अंतराय दूर झालेले असतात. पण 'रियलधर्म' 'आत्मधर्म' याचे अंतराय खूप असतात.

आता धर्मात अंतराय कसे पडतात? 'मी काही तरी (विशेष) जाणतो' हा सगळ्यात मोठा अंतराय. धर्मात जाणणे कशाला म्हणतात? तर कधीही ठोकर लागत नाही, आर्तध्यान-रौद्रध्यान होत नाही, रौद्रध्यानाचा थोडादेखील परिणाम उत्पन्न होत नाही, तसे योगच येत नाहीत, त्याला 'जाणले' असे म्हणतात. म्हणून भगवंताने सांगितले, 'जोपर्यंत आर्तध्यान आणि रौद्रध्यान होते, तोपर्यंत 'मी काहीच जाणत नाही, 'ज्ञानी पुरुष' जाणतात' असे म्हणावे. तोपर्यंत डोक्यावर जबाबदारी घेऊ नये. त्यात खूप जोखीम आहे, भलत्याच स्टेशनवर उतरावे लागेल. भगवंतांनी ज्ञानांतरायाला सगळ्यात मोठा अंतराय म्हटले आहे. लक्ष्मी आणि दान यातील अंतराय दूर होतात, पण ज्ञानाचे अंतराय लवकर दूर होत नाहीत.

## ज्ञानांतराय-दर्शनांतराय कशामुळे?

**प्रश्नकर्ता :** ज्ञानांतराय-दर्शनांतराय कशामुळे पडतात?

**दादाश्री :** धार्मिक बाबतीत उलट-सुलट बोलणे. 'तुम्हाला काही समजत नाही, मलाच समजते' असे म्हणणे, यामुळे ज्ञानांतराय- दर्शनांतराय पडतात. किंवा कोणी आत्मज्ञान प्राप्त करत असेल, त्यात जो अडथळे

आणेल त्याला ज्ञानाचा अंतराय पडेल. कोणी म्हटले, की 'ज्ञानी पुरुष' आले आहेत, चला येता का?' तेव्हा जर तुम्ही म्हणाल, 'असे 'ज्ञानी पुरुष' खूप पाहिले आहेत.' तर अंतराय पडला! आता माणूस आहे, बोलल्याशिवाय तर राहणारच नाही ना? तुम्हाला जाता येत नसेल तरी पण मनात जर असा भाव असेल की 'ज्ञानी पुरुष आले आहेत पण मला जाता येत नाही' तर अंतराय दूर होतील. अंतराय पाडणारा अज्ञानतेमुळे अंतराय पाडत असतो. त्याला त्याची जाणीवही नसते.

प्रत्येक शब्द बोलण्यात जोखीम आहे. बोलता येत नसेल तर मौन राहिलेले बरे. त्यातसुद्धा धार्मिक बाबतीत फारच जोखीम आहे, व्यवहारातील जोखीम तर निघून जातात. उडून जातात.

भजन का गाता येत नाही? 'मला तर गाता येतच नाही' असे बोलून अंतराय निर्माण केले आहेत, 'मला गाता येईलच' असे म्हटले की अंतराय दूर होतात. कुठे शिकायला जायची गरजच नाही, सर्व शिकूनच आलेला आहे.

**प्रश्नकर्ता :** 'मला भजन गाता येते' म्हटले की गाता येईल का?

**दादाश्री :** नाही. 'गाता येईल' असे नाही. 'का येणार नाही?' असे मनातून दृढ असायला हवे.

काही लोक म्हणतात, 'असे अक्रम ज्ञान कुठे असते का?' तासाभरात मोक्ष होतो का? असे म्हटले की त्यांना अंतराय पडतात. या जगात काय होऊ शकत नाही, ते काही सांगता येणार नाही. बुद्धीने समजता येईल असे हे जग नाही! कारण असे घडले आहे, आणि ही हकीकत आहे. 'आत्मविज्ञाना'साठी तर खास अंतराय पडलेले असतात. हे सर्वात शेवटचे स्टेशन आहे.

ज्यांचे परोक्ष (ज्ञानीं)चे अंतराय दूर झाले असतील त्यांना प्रत्यक्ष (ज्ञानीं)चे अंतराय असतातच. म्हणूनच त्यांना परोक्षच मिळतात. आणि प्रत्यक्षचे तर खूप मोठे-मोठे अंतराय पडलेले असतात, ते जर दूर झाले तर अनंत जन्मांचे नुकसान भरून येते.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानांतराय-दर्शनांतराय दूर कसे होतात?

**दादाश्री :** ते अंतराय 'ज्ञानी पुरुष' दूर करतात. 'ज्ञानी पुरुष' अज्ञान दूर करतात आणि अंतराय पण दूर करतात. पण काही अंतराय तर 'ज्ञानी पुरुष' पण दूर करू शकत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** असे कुठले अंतराय आहेत?

**दादाश्री :** जिथे विनयधर्म खंडित होत असेल असे. विनय ही तर मोक्ष मार्गातील मुख्य गोष्ट आहे. 'ज्ञानी पुरुषां'बद्दल एकही चुकीचा विचार येता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** इथे यायचा भाव तर असतो, पण पुद्‌गल-माया येऊ देत नाही, तर काय करावे?

**दादाश्री :** हेच अंतराय कर्म आहे. तुमचे भाव दृढ असतील तर ते कधी ना कधी पूर्ण होतील. अंतराय कर्म अचेतन आहेत आणि आपले भाव चेतन प्राप्त केलेले आहेत, त्यामुळे अंतराय दूर होतात. आणि 'विधी'मध्ये 'ज्ञानी पुरुषां'जवळ, सतत मागत राहायला हवे की आमचे अंतराय दूर करा, तर ते दूर करतील. ज्ञानींचे वचनबळ तुमचे अंतराय दूर करते. मी सत्संगाला जाऊ शकत नाही याचा मनापासून खेद होत असेल तर अंतराय दूर होतात.

**प्रश्नकर्ता :** अंतराय आपोआप दूर होतात की पुरुषार्थामुळे दूर होतात?

**दादाश्री :** तसा भाव असेल तर अंतराय दूर होतात. अंतराय दूर होण्याची वेळ आली की तसा भाव होतो.

ज्याला हे ज्ञान मिळते त्याचे तर सर्व अंतराय दूर होतात. कारण अंतराय 'मी कोणीतरी (विशेष) आहे' या अहंकारामुळे पडतात. अंतराय दूर झाले की मग अजिबात वेळ लागत नाही. आत्मा आणि मोक्ष यात किती अंतर आहे? काहीच नाही. मध्ये अंतराय पडलेले आहेत तेवढेच.

आत्मा प्राप्त झाल्यावर अंतराय संयोग स्वरूपी आहेत आणि संयोग वियोगी स्वभावाचे असतात, आणि आपण 'शुद्धात्मा' असंयोगी, अवियोगी आहोत.



# [ 8 ]
# तिरस्कार-झिडकार

## ज्याचा तिरस्कार त्याचीच भीती

ज्याचा तिरस्कार कराल, त्याची भीती वाटते. या पोलिसांची भीती का वाटते? त्यांचा तिरस्कार वाटतो म्हणून. तुम्ही ज्याचा तिरस्कार कराल, त्याची भीती तुमच्या मनात बसते. रात्री डासांचा तिरस्कार कराल तर ते रात्रभर झोपू देणार नाहीत.

कोर्टाचा तिरस्कार वाटत असेल, वकिलाचा तिरस्कार वाटत असेल, तर कोर्टात पाऊल ठेवताच भीती वाटते.

कोणी ओळखीचा असेल तर त्याची भीती का वाटत नाही? कारण त्याचा तिरस्कार वाटत नसतो.

**प्रश्नकर्ता :** आधी तिरस्कार वाटतो की आधी भीती वाटते?

**दादाश्री :** आधी तिरस्कार वाटतो. आधी भीती वाटत नाही. ते कसे? तर हा पोलीस खूप वाईट आहे असे ज्ञान झालेले असते म्हणून त्या ज्ञानाच्या आधारे तिरस्कार निर्माण होतो, आणि तिरस्कारातून भीती उत्पन्न होते. आणि मग ती भीती वाढत जाते आणि पोलिसवाल्याला पाहिले की अस्वस्थ वाटू लागते. पोलिस शेजारच्या घरात फक्त पत्ता विचारायला आला असला तरी!

**प्रश्नकर्ता :** तिरस्कारामुळे भीती निर्माण होते तर आसक्तीमुळे काय होते?

**दादाश्री :** मूर्च्छा येते, बेशुद्धपणा होतो. ह्या दोन्ही गेल्या की वीतरागता येते.

## झिडकारण्यात किती जोखीम?

**प्रश्नकर्ता :** तिरस्कार आणि झिडकार यात काय फरक आहे?

**दादाश्री :** तिरस्काराची तर कदाचित जाणीवही होत नाही. तिरस्कार अगदी 'माइल्ड' (हलका-फुलका) आहे. पण झिडकार तर खूपच उग्र स्वरूपाचा आहे, लगेच रक्तच निघते. देहाचे नाही मनाचे रक्त निघते.

**प्रश्नकर्ता :** तिरस्कार आणि झिडकार यांचे काय फळ मिळते?

**दादाश्री :** तिरस्काराचे फळ इतके मोठे नसते. पण झिडकारण्याचे फळ खूप मोठे येते. झिडकारल्याने सर्व प्रकारचे अंतराय पडतात. आपल्याला हव्या असलेल्या वस्तू मिळू देत नाहीत, फार त्रास देतात. झिडकार काय करत नाहीत? झिडकारांमुळे हे जग उभे राहिले आहे. म्हणूनच आम्ही एक गोष्ट सांगतो की, 'वैर विसरा, कोणाला झिडकारले जाणार नाही असे वागा.'

झिडकाराबद्दल आमचे चित्त खूप जागृत असते. रात्री उशीरा रस्त्यावरून जाताना, आमच्या बुटांच्या आवाजाने कुत्रे जागे होणार नाहीत अशी जागृती आम्हाला असते. त्याच्यातही आत्मा आहे ना? कोणी आम्हाला प्रेमाने विष दिले, तरी देखील आम्ही त्याला झिडकारणार नाही.

वीतराग मार्गात तर कोणाचाही विरोध किंवा झिडकार होत नाही. वीतरागी कोणाचेही विरोधक होत नाहीत, अगदी चोर, डाकू, बदमाशांचेसुद्धा. चोराला असे म्हटले की 'तू वाईट धंदा करतो आहेस' तर त्याला झिडकारल्यासारखे वाटेल आणि जिथे झिडकार असेल तिथे भगवंत दिसणार नाहीत. भगवंत तर एवढेच म्हणतात की, 'त्याला देखील तू तत्त्वदृष्टीने पाहा. अवस्था दृष्टीने पाहिलेस तर तुझेच बिघडेल.'

आपण चिखलात दगड टाकला तर चिखलाचे काय बिघडणार आहे? चिखल तर बिघडलेलाच आहे, शिंतोडे आपल्यावरच उडतील. वीतराग खूप समंजस होते. ते जीवमात्राला न झिडकारता निघून जात.

झिडकार सर्व दरवाजे बंद करतो. ज्याला आपण झिडकारता तो मग कधीही दरवाजा उघडत नाही.

**प्रश्नकर्ता :** तिरस्कार आणि झिडकार, यांचा जीवन व्यवहारात पदोपदी अनुभव येतो.

**दादाश्री :** हो, सर्वांना असेच वाटते ना? त्यामुळेच जगात दुःख आहे. कित्येकांची वाणी तर इतकी उलटी असते की 'दुष्काळ पडो' असे बोलतात.

**प्रश्नकर्ता :** सध्या तर लोक उलट्या वाणीचे राजा असतात.

**दादाश्री :** आम्हाला आता मागील जन्मातील दिसते, तेव्हा आश्चर्य वाटते की अरेरे! झिडकारण्यात किती प्रचंड नुकसान आहे! म्हणून मजुरांना देखील झिडकारले जाणार नाही असे आम्ही वागतो. ज्याला झिडकारले असेल तो सूड घेतल्याशिवाय राहत नाही, शेवटी साप होऊनही चावेल.

बाहेरचे घाव तर भरून निघतील पण वाणीने केलेले घाव तर शंभर-शंभर जन्मांनीही भरून निघत नाहीत.

## झिडकारल्यावर उपाय काय?

**प्रश्नकर्ता :** झिडकारल्याचे परिणाम भोगावे लागू नयेत, यासाठी काय उपाय करावा?

**दादाश्री :** त्यासाठी दुसरा काही उपाय नाही, सतत प्रतिक्रमण करीत राहावे. जोपर्यंत समोरच्याचे मन बदलत नाही, तोपर्यंत प्रतिक्रमण करीत राहावे. आणि प्रत्यक्ष भेटल्यावर त्याच्याशी गोड बोलून क्षमा मागावी की, 'भाऊ, माझी फार मोठी चूक झाली, मी तर मूर्ख आहे,

बेअक्कल आहे' असे म्हटल्याने समोरच्याचे घाव भरून निघतात. आपण स्वत:ला कमी लेखले म्हणून समोरच्याला बरे वाटते, तेव्हा त्याचे घाव भरून निघतात.

संसारात सुखी व्हायची इच्छा असेल तर कोणालाही झिडकारू नका. कोणाला झिडकारता? भगवंतांनाच. कारण प्रत्येकाच्या आत भगवंत बसले आहेत. शिवी दिली तर ती माणसाला नव्हे तर भगवंताला पोहोचते. संसाराचे सर्व परिणाम भगवंत स्वीकारतात, म्हणून ते परिणाम असे आणा की भगवंत त्याचा स्वीकार करतील तर मग 'तिथे' आपले वाईट दिसणार नाही. एक सुद्धा जीवाला झिडकारून कोणी मोक्षाला जाऊ शकत नाही.



# [ ९ ]
# व्यक्तित्व सौरभ

## वीतराग होऊन वावरतात 'हे' ज्ञानी

**प्रश्नकर्ता :** आपल्याला कोणती वस्तू सर्वात प्रिय आहे?

**दादाश्री :** मला आत्म्याशिवाय काहीच प्रिय नाही.

**प्रश्नकर्ता :** आध्यात्मिकतेबद्दल आपले अनुभव, विचार सांगावेत.

**दादाश्री :** मी मन-वचन-काया यापासून संपूर्ण वेगळा राहतो. तरी पण केवलज्ञान झालेले नाही, काळामुळे ते चार डिग्री पचले नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण संसारापासून अलिप्त कसे राहू शकता?

**दादाश्री :** संपूर्ण वीतरागतेने! व्यापार-धंदा करतो, इन्कमटॅक्स, सेल्सटॅक्स सर्व भरतो, संसारातील शेकडो टांगत्या तलवारींच्या खाली असूनही वीतरागतेत राहतो. हात कापून टाकला तरी वीतरागता राहते.

**प्रश्नकर्ता :** इतके असूनही आपल्याला व्यापार महत्त्वाचा वाटतो?

**दादाश्री :** आम्हाला कुठल्याही गोष्टीचे महत्त्व वाटत नाही, तरी पण करावे लागते. पोलीस पकडून घेऊन जातात आणि जे करायला सांगतात ते सर्व करावे लागते, तसे हे आहे.

**प्रश्नकर्ता :** व्यापारात फायदा झाला तर?

**दादाश्री :** तशी काही वृत्तीच नाही. फायद्याचा कधी विचारच आला नाही, सर्व सहजपणे होते. कसलीही इच्छा नाही, अशी निरिच्छ दशा झाली आहे!

**प्रश्नकर्ता :** आपली अशी दशा केव्हापासून झाली?

**दादाश्री :** तसे तर सर्व जीवन धर्मध्यानातच गेले आहे, पण 1958 मध्ये ज्ञान प्रकट झाले!

**प्रश्नकर्ता :** हे ज्ञान आपल्याला प्रकट झाले, तर त्यासाठी आपण किती साधना केली होती?

**दादाश्री :** 'हे' तर अनंत जन्मांच्या साधनेचे फळ आहे, तरी पण या जन्मातही साधना झालीच होती. शिवाय आईचे संस्कार फार उत्तम मिळाले.

**प्रश्नकर्ता :** आपण व्रत, नियम, उपवास केले होते?

**दादाश्री :** आमच्याकडून नावालाही उपवास झाला नाही. हो, आयुष्यभर उणोदरी तप केले आहे. चोविहार (सूर्यास्ताआधी भोजन करणे), उकळलेले पाणी पिणे, कंदमूळ न खाणे, ह्या सर्व गोष्टी फार कडकपणे पाळल्या आहेत.

## 1958 चे ते अद्भुत दर्शन

**प्रश्नकर्ता :** आपल्याला 1958 मध्ये जे दर्शन झाले, ते कसे झाले?

**दादाश्री :** जणू या देहातून वेगळे झालो आहोत, असे वाटले.

**प्रश्नकर्ता :** ती मुक्तता कशी होती?

**दादाश्री :** ॲबसोल्युट मुक्तच, ती दशा वेगळीच होती! त्याचे वर्णनच होऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** तो क्षण आला त्याआधी आपल्याला असे काही वाटले होते की काही होणार आहे?

**दादाश्री :** खूप शांती वाटत होती. पण ती अहंकारसहितची शांती म्हटली जाते. ती काही उपयोगाची नाही. ती तर अज्ञानीलाही वाटू शकते.

**प्रश्नकर्ता :** त्यावेळी स्टेशनवरचा तुमचा आनंद विलक्षण होता?

**दादाश्री :** ज्ञाता-दृष्टा-परमानंद, साऱ्या गुणांसहित वेगळा झालो होतो. देहात नाही, वचनात नाही, मनात नाही, असा वेगळा झालो होतो, त्या स्थितीला 'ज्ञान प्राप्त झाले' असे म्हणतात. ज्ञानच आत्मा आहे.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला ज्ञान प्रकट झाल्यावर ज्ञानप्रकाश तेवढाच राहतो की वाढत जातो?

**दादाश्री :** आमचे तर हे 'अनुभवज्ञान' आहे. त्यात दोन प्रकारचे प्रकाश नसतात. निरंतर एकाच प्रकारचा प्रकाश असतो. आम्हाला आत्म्याचा स्पष्ट अनुभव आहे. जोवर आत्म्याचा स्पष्ट अनुभव होत नाही, तोवर ज्ञान वाढत जाते. पण स्पष्ट अनुभव आला की ते ज्ञान पूर्ण होते.

**प्रश्नकर्ता :** आध्यात्मिक स्टडी करणारा पूर्णतेला पोहोचलेला आहे हे कसे समजेल?

**दादाश्री :** त्यांची वाणी वीतराग असते, बोलणे वीतराग असते, वर्तन वीतराग असते. त्यांच्या प्रत्येक बाबतीत वीतरागता असते. कोणी शिव्या दिल्या तरी वीतरागता आणि कोणी फुले वाहिली तरीही वीतरागताच असते. त्यांची वाणी स्याद्वाद असते म्हणून कोणत्याही धर्माचे किंवा जीवांचे प्रमाण दुखावले जात नाही.

## ज्ञानाची काही रीत नसते

**प्रश्नकर्ता :** आपण मुक्तीत वावरता, पण ती सिद्धी कशी प्राप्त झाली?

**दादाश्री :** तुमच्यासारखे खूप लोक मला विचारतात, तेव्हा मला सांगावे लागते की, 'तुम्हाला नक्कल करायची आहे का? नक्कल कराल

तर तुमची मेहनत वाया जाईल' 'धिस इज बट नॅचरल'. आणि ते सुद्धा सूरत स्टेशनवरील बाकावर बसलो होतो, तेव्हा अतिशय गर्दीमध्ये हे ज्ञान प्रकट झाले!

**प्रश्नकर्ता :** आपल्याला 'बट नॅचरल' ज्ञान प्रकट झाले म्हणजे नक्की काय? हे जरा समजावून सांगा.

**दादाश्री :** 'बट नॅचरल' ज्ञान क्वचितच कोणाला होते. कोणी म्हणेल की 'मी आपलेआपण केले आहे.' तर ते ज्ञान अर्धवट राहते. हे तर 'नॅचरली' आपोआपच झाले आहे. हे जर केले असते तर 80 टक्के विकल्प कमी झाले असते आणि 20 टक्के बाकी राहिले असते. हे तर 100 टक्के निर्विकल्प आहे, हे वीतराग विज्ञान आहे.

## 'ज्ञानी' मोक्षाचा पुरावा देतात

**प्रश्नकर्ता :** आपला नित्यक्रम काय आहे?

**दादाश्री :** मी निरंतर माझ्या मोक्षातच राहतो. आतासुद्धा मी माझ्या मोक्षातच आहे. ही जी वाणी निघत आहे ती टेपरेकॉर्ड निघत आहे. तिचा मालक मी नाही. ही वाणी 'खरी की खोटी' हे मी पाहत असतो.

**प्रश्नकर्ता :** आपल्या आतील टेप बोलली नाही, तर ती 'ब्लँक' होते का?

**दादाश्री :** ऐकू येईल अशी टेप पण चालू असते आणि सूक्ष्म वाणीची टेपही चालू असते.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी पुरुष' परमाणू बदलू शकतात का? की मग त्यांच्या उपस्थितीमुळे ते बदलतात?

**दादाश्री :** दुधात दही टाकल्यानंतर ज्ञानी काही करू शकत नाहीत. दही टाकण्याअगोदर सांगितले तर होईल, नंतर काहीही होणार नाही. ज्ञानी कर्मे भस्मीभूत करू शकतात, त्यांची फक्त ही एकच सत्ता आहे. काही भागांचे रंग बदलू शकतात, ते आम्ही करतो.

**प्रश्नकर्ता :** दुधात दही टाकले असे कशाला म्हणतात?

**दादाश्री :** जी गोठलेली आहेत, बर्फासारखी झाली आहेत ती कर्मे तर भोगावीच लागतात. वाफ आणि पाण्याच्या रूपात असतील तर ती 'ज्ञानी' भस्मीभूत करतात. तरीसुद्धा स्वत: नैमित्तिक भावातच असतात, अकर्ताच राहतात.

**प्रश्नकर्ता :** मोक्ष म्हणजे काय?

**दादाश्री :** मोक्ष म्हणजे सर्व दु:खातून मुक्ती आणि सनातन परमानंदाची स्थिती. मोक्ष म्हणजे मुक्तभाव.

**प्रश्नकर्ता :** बंधन कशामुळे पडते?

**दादाश्री :** अज्ञानामुळे.

**प्रश्नकर्ता :** मोक्ष हे स्थळ आहे की अवस्था?

**दादाश्री :** ती अवस्था आहे, पण ती ही 'अवस्था' नाही, ती स्वाभाविक अवस्था आहे.

**प्रश्नकर्ता :** मोक्ष म्हणजे स्वातंत्र्य?

**दादाश्री :** हो, खरे स्वातंत्र्य. कोणी *उपरी* नाही आणि कोणी अंडरहँडही नाही.

**प्रश्नकर्ता :** अशी मुक्त स्थिती संसारात उपलब्ध असते का?

**दादाश्री :** का नसेल? तशी स्थिती मी प्राप्त केलीच आहे ना! संसारात राहून ही स्थिती उपलब्ध होऊ शकते, त्याचा पुरावा म्हणून मी आहे. मला पाहून तुम्हाला एन्करेजमेंट (प्रोत्साहन) मिळते की संसारात राहूनही अशी स्थिती उपलब्ध होऊ शकते.

**प्रश्नकर्ता :** दर्शन आणि ज्ञान यात फरक आहे?

**दादाश्री :** दर्शनच मोक्षाला जाण्याचे मुख्य साधन आहे. ज्ञान तर दर्शनाच्या विशेष भावाने आहे. आणि ज्ञान-दर्शन एकत्र आले की चारित्र्य उत्पन्न होते. ज्ञान कशाला म्हणतात? दर्शनाद्वारे जे जाणले, समजले, ते

आत फिट होते, आणि मग तो दुसऱ्यांना समजावू शकतो, अशी दशा उत्पन्न होते तेव्हा त्याला ज्ञान म्हणतात. वास्तवात तर दर्शनच काम करत असते.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान आणि शुद्धात्मा यांचा काही संबंध आहे का?

**दादाश्री :** शुद्धात्मा स्वत:च ज्ञान स्वरूप आहे. स्वत: संपूर्ण ज्ञानस्वरूप झाला की त्याला परमात्मा स्वरूप असे म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आत्मा क्रिया करत नाही, मग कर्म कोण बांधतो?

**दादाश्री :** अहंकार, जो म्हणतो की 'मी हे केले' तोच कर्म बांधतो.

**प्रश्नकर्ता :** ज्ञायक आणि जिज्ञासू यात काय फरक आहे?

**दादाश्री :** खूप फरक आहे. त्यांची तुलना तर होऊच शकत नाही. ज्ञायक तर स्वत: परमात्मा झालेला असतो आणि जिज्ञासूला तर गुरु करावे लागतील, शोधत राहावे लागेल. जिज्ञासा उत्पन्न झाली म्हणजे तो पुरुषार्थी झाला असे म्हणतात, पण ज्ञायक तर स्वत:च परमात्मा असतो.

**प्रश्नकर्ता :** मुमुक्षू आणि जिज्ञासू यात काय फरक आहे?

**दादाश्री :** मुमुक्षू म्हणजे केवळ मोक्षाची इच्छा करणारा आणि जिज्ञासू म्हणजे अजूनही सुखाची इच्छा असणारा. जिथून सुख मिळेल तिथे तो सुख मिळवण्यासाठी जातो.

**प्रश्नकर्ता :** ब्रह्मांडाच्या आत आणि ब्रह्मांडाच्या बाहेर पाहणे म्हणजे काय?

**दादाश्री :** ज्ञेयात तन्मयाकार असेल तेव्हा ब्रह्मांडाच्या आत म्हणतात आणि ज्ञेयाला ज्ञेय रूपात पाहतो तेव्हा ब्रह्मांडाच्या बाहेर म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** ॲबसोल्यूट विज्ञान म्हणजे काय?

**दादाश्री :**अज्ञानापासून बिलकुल निर्लेप विज्ञान, ते ॲबसोल्यूट विज्ञान आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्मा शब्द अनादिकाळापासून आहे?

**दादाश्री :** हो, अनादिकाळापासून आहे. अनादिकाळापासून ज्ञान आणि ज्ञानाची पद्धत तीच आहे.

## निमित्ताचे महत्त्व

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला ओळखण्यासाठी निमित्ताची आवश्यकता आहे का?

**दादाश्री :** निमित्ताशिवाय तर काहीच होत नाही. एखाद्यालाच हे अपवादरूपात होते, त्यांना स्वयंबुद्ध म्हणतात. स्वयंबुद्धांना पण मागील जन्मात ज्ञानी भेटले असतील तरच होते. निमित्ताशिवाय तर काहीच होत नाही. उपादान पण जागृत पाहिजे आणि निमित्तही पाहिजे.

*'उपादाननुं नाम लई अे जे तजे निमित्त ;*
*पामे नहीं सिद्धत्वने रहे भ्रांतीमां स्थित.'* – श्रीमद राजचंद्र.

(उपादानाचे नाव घेऊन जो निमित्ताचा त्याग करतो त्याला सिद्धत्व प्राप्त होत नाही, तो भ्रांतदशेतच राहतो.)

म्हणजे आधी निमित्त पाहिजे. उपादान अजागृत असेल तरी ज्ञान त्याला ऊंच घेऊन जाईल, पण निमित्ताशिवाय काहीही होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** निमित्तामुळे आत्मानुभव होत नाही अशी शंभर टक्के खात्री असेल तर?

**दादाश्री :** तर आत्मानुभव कधीच होणार नाही. जरी लाखो मण उपादान जागृत ठेवले परंतु जर निमित्त मिळाले नाही तर आत्मानुभव कधीच होणार नाही. निमित्ताचीच किंमत आहे सगळी.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे असे निश्चित समजावे की, निमित्तानेच आत्मानुभव होतो?

**दादाश्री :** असे आहे की, उपादानाची जागृती तर सर्वांनी ठेवायलाच हवी. आणि ती तर बऱ्याच लोकांना असते, पण निमित्ताशिवाय काय होणार? दुसरा काही इलाजच नाही.

**प्रश्नकर्ता :** निमित्त पुण्याने मिळते की पुरुषार्थामुळे?

**दादाश्री :** पुण्याने. नाही तर पुरुषार्थ करावा आणि या उपाश्रयातून त्या उपाश्रयात धावावे, असे अनंत जन्म जरी भटकत राहिले तरीही निमित्त प्राप्त होणार नाही, आणि आपले पुण्य असेल तर रस्त्यातच (ज्ञानी) भेटतील. त्यासाठी पुण्यानुबंधी पुण्य लागते.

## पुण्याचा संबंध कुठपर्यंत?

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचा पुण्याशी काही संबंध आहे का?

**दादाश्री :** काहीही संबंध नाही. पण जोवर 'हे मी करतो' अशी बिलीफ (मान्यता) आहे, तोवर संबंध आहे. जेव्हा 'मी करत नाही' ही राइट बिलीफ बसते, त्यानंतर मात्र आत्मा आणि पुण्याचा काही संबंध नाही.

**प्रश्नकर्ता :** पुण्याची वृद्धी होईल यासाठी काय करावे?

**दादाश्री :** दिवसभर लोकांवर उपकार करीत राहावे. हे मनोयोग, वाणीयोग आणि देहयोग यांचा उपयोग लोकांसाठी करणे, याला पुण्य म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांचे भले करायला जावे आणि स्वत:चे बिघडत असेल तर?

**दादाश्री :** स्वत:चे त्यामुळे बिघडणार नाही याची आम्ही गॅरंटी देतो.

**प्रश्नकर्ता :** सध्याचा काळ असा आहे की माळ जपा, जप करा, तप करा, भक्ती करा, काहीही करा, तरी शांती काही मिळत नाही, हे काय आहे?

**दादाश्री :** याचा अर्थ असा आहे की योग्य मार्ग मिळालेला नाही, तेव्हा आता मार्ग बदला.

## धर्मध्यान

**प्रश्नकर्ता :** धर्मध्यान कशाला म्हणतात?

**दादाश्री :** कोणी शिव्या दिल्या तर त्याचा राग येतो, ते रौद्रध्यान आहे. आणि कोणी शिव्या दिल्या, तेव्हा जर एवढे ज्ञान हजर झाले की हा तर निमित्त आहे, आणि हे माझ्याच कर्मांच्या उदयाचे फळ आले आहे, त्यामुळे यात कोणीही गुन्हेगार नाही. असे समजले, आणि स्वत:ला राग आला नाही, तर तेव्हा धर्मध्यान होते. आर्तध्यान आणि रौद्रध्यान यांना बदलणे, ते धर्मध्यान आहे.

## शुक्लध्यान

**प्रश्नकर्ता :** शुक्लध्यान म्हणजे काय?

**दादाश्री :** शुक्लध्यान म्हणजे 'मी शुद्धात्मा आहे' असे निरंतर ध्यान असणे. ते तुटक-तुटक नाही तर निरंतर असायला हवे. शुक्लध्यान म्हणचे शाश्वत वस्तूचे ध्यान उत्पन्न होणे, आणि धर्मध्यान म्हणजे अवस्थाचे, अशाश्वत वस्तूचे ध्यान उत्पन्न होणे.

## मन आणि आत्मा

**प्रश्नकर्ता :** मन आणि आत्मा यात काय फरक आहे?

**दादाश्री :** मन तर अज्ञान परिणामामुळे उत्पन्न झालेल्या स्पंदनांच्या गाठी आहेत, त्या गाठी फुटतात तेव्हा विचार स्वरूपात येतात. मन तर स्थूल आहे, निश्चेतन चेतन आहे आणि आत्मा तर चैतन्य परमात्मा आहे.

## प्रेम आणि भक्ती

**प्रश्नकर्ता :** प्रेम आणि भक्ती या दोन्हीमध्ये उत्तम काय?

**दादाश्री :** भगवंतावरचे प्रेम ना? संसारी प्रेम नाही ना? भगवंतावर प्रेम असेल तरच भक्ती उत्पन्न होईल, नाही तर होणार नाही. प्रेमाशिवायची भक्ती ही भक्ती मानली जात नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रेमलक्षणा भक्ती कशाला म्हणतात?

**दादाश्री :** भगवंतावरील प्रेम हीच खरी प्रेमलक्षणा भक्ती आहे. दिवसभर भगवंत विसरले जात नाहीत, पैसे मोजताना सुद्धा आठवत राहतात, ते भगवंत प्रेम. अजून तर लक्ष्मीसाठी जास्त प्रेम आहे. मुलीचे लग्न करून देताना भगवंतांचा विसर पडतो, तो मोह आहे, मूर्च्छा आहे. प्रेमलक्षणा भक्ती ही तर फार उच्च भक्ती आहे. त्यात तर भगवंत स्वयं हजर होतात.

## निर्दोष दृष्टी तिथे जग निर्दोष

**प्रश्नकर्ता :** निर्दोषपणा कसा प्राप्त होतो?

**दादाश्री :** संपूर्ण जगाला निर्दोष पाहाल तेव्हा. मी संपूर्ण जगाला निर्दोष पाहिले आहे, त्यामुळे मी निर्दोष झालो आहे. हित करणाऱ्याला आणि अहित करणाऱ्यालाही आम्ही निर्दोष पाहतो.

**प्रश्नकर्ता :** 'रिलेटिव्ह' तर साहजिकच दोषी दिसतो ना?

**दादाश्री :** दोषी कधी मानला जाईल? त्याचा शुद्धात्मा तसे करीत असेल तर. पण शुद्धात्मा तर अकर्ता आहे, तो काही करू शकेल असे नाही. हे तर डिस्चार्ज होत आहे, त्यात तू समोरच्याला दोषी मानतोस. दोष दिसला की, त्यासाठी प्रतिक्रमण करावे. जोपर्यंत जगात कोणताही जीव दोषी दिसत असेल तोपर्यंत समजून जावे की आत शुद्धीकरण झालेले नाही, तोपर्यंत इंद्रिय ज्ञानच आहे.

**प्रश्नकर्ता :** कडवटपणा हा एक प्रकारचा अहंकारच म्हणायचा ना?

**दादाश्री :** कडू–गोड ही दोन्हीही कर्मांची फळे आहेत आणि ही कर्मांची फळे जोपर्यंत अहंकार असतो तोपर्यंत असतात. चांगले करण्याचा अहंकार झाला तर गोड वाटते, वाईट करण्याचा अहंकार झाला तर कडवटपणा निर्माण होतो.

**प्रश्नकर्ता :** या जगात गोंधळवतो कोण?

**दादाश्री :** अज्ञान.

**प्रश्नकर्ता :** क्षमा मागणारा मोठा की क्षमा करणारा?

**दादाश्री :** क्षमा मागायला तर घोडागाडीवाला, टॅक्सीवाला किंवा मडकेवाला देखील येऊ शकतो. परंतु क्षमा कोणीच देत नाही. म्हणून खरी किंमत जो क्षमा करतो त्याची आहे. क्षमा करणे फार कठीण आहे. आमची सहज क्षमा असते. तुमची चूक झाली तर आपोआपच क्षमा केली जाते, तुम्ही मागा किंवा नका मागू, तरीही.

## कर्ता झाला की बीज पडणार

**प्रश्नकर्ता :** एक व्यक्ती मारण्याचा विचार करते आणि दुसरी व्यक्ती खरोखरच मारते, तर या दोघांत फरक काय?

**दादाश्री :** जो विचार करतो तो गुन्हेगार आहे आणि जो खरोखर मारुन टाकतो तो जगाचा गुन्हेगार आहे. ज्याने या जन्मात मारून टाकले, तो गेल्या जन्मीचा गुन्हेगार आहे, त्याचा तर या जन्मी निकाल होऊन जाईल. तो जेलमध्ये जाईल, लोक त्याची निंदा-नालस्ती करतील आणि त्याचा हिशोब पूर्ण होईल, पण पुन्हा बीज टाकले गेले नसेल तर.

**प्रश्नकर्ता :** बीज पडण्याचा काही क्रम आहे का? असे काही आहे का, की हे बीज पडेल आणि ते पडणार नाही?

**दादाश्री :** हो. तुम्ही म्हटले की 'हा नाश्ता किती चांगला झाला आहे आणि 'मी खाल्ला' की बीज पडेल. 'मी खाल्ला' असे बोलण्याची हरकत नाही. पण खरोखर कोण खातो हे तुम्ही जाणून घेतले पाहिजे की, 'मी खात नाही. खाणारा खातो.' म्हणजे तुम्ही कर्ता बनलात तरच बीज पडेल.

## आत्मज्ञान मिळाले की प्रकट झाले?

**प्रश्नकर्ता :** 'आपल्यासारखी दशा प्राप्त करणे' आणि 'मोक्ष प्राप्त करणे' या दोन्हीमध्ये काय फरक आहे?

**दादाश्री :** काहीच फरक नाही. आमचा तर मोक्ष झालाच आहे.

माझी दशा तू प्राप्त करशील तर तुझाही मोक्ष होईलच. मोक्ष बाहेर शोधायचा नसतो, तो आतच आहे.

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणालात की तुम्ही स्वत:ला ओळखा, तर स्वत:ला ओळखण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** त्यासाठी तर माझ्याकडे या. तुम्ही सांगा की मला स्वत:ला ओळखायचे आहे. मग मी तुमची ओळख करून देईन.

**प्रश्नकर्ता :** आपल्याकडून जे ज्ञान मिळाले तेच आत्मज्ञान आहे ना?

**दादाश्री :** जे मिळाले ते आत्मज्ञान नाही, आत प्रकट झाले ते आत्मज्ञान आहे. आम्ही बोलवून घेतो आणि तुम्ही ते बोलता, त्याबरोबरच पापे भस्मीभूत होतात आणि आत ज्ञान प्रकट होते. तुमच्या आत प्रकट झाले आहे ना?

**महात्मा :** हो, झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानीं'ची कृपा प्राप्त करण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** 'ज्ञानीं'च्या आज्ञा पाळल्या की 'ज्ञानीं'ना कळून चुकते, 'ज्ञानीं'ना आणखी काही नको असते. ज्या गावी जायचे त्या गावाच्या नियमात असले की ते खुश असतात, आणखी काही नाही.

## ...तेव्हा वाणी विज्ञान सांगते

**प्रश्नकर्ता :** आपल्याला साधनेची लिंक कधीपासून सुरू आहे?

**दादाश्री :** किती तरी काळापासून प्रत्येकाच्या लिंकबद्ध टोळ्या असतातच. ह्या सर्व लींकच आहेत. 1958 मध्ये त्यादिवशी हे ज्ञान झाले. पण नंतर ते ज्ञान प्रकट व्हायला हवे, ते प्रकट होण्यासाठी लिंक मिळतच राहते. आम्हाला तीनशे छपन्न डिग्रीचे ज्ञान झाले आहे, पण ते बाहेर आलेले नाही, त्याच्या खालील ज्ञान बाहेर येते. आणि ज्यादिवशी तीनशे छपन्न डिग्रीचे ज्ञान बाहेर पडेल, त्या दिवशी तर ते या काळातले मोठे आश्चर्यच असेल!

**प्रश्नकर्ता :** तीनशे छपन्न डिग्रीचे ज्ञान बाहेर पाडण्यासाठी काही पात्र जीवांची गरज पडेल?

**दादाश्री :** हो. अशा पात्र जीवाची गरज पडते. तो आला की पटापट बाहेर पडेल. म्हणजे जसजसे पात्र जीव येत जातील तसतसे उच्च ज्ञान बाहेर पडू लागेल. ते प्रकट करणे आमच्या हाती नाही. ही तर रेकॉर्ड आहे. मग पात्र जीवही मिळतील आणि रेकॉडही बोलेल.

## ...ते कसले अद्‌भुत सुख

**प्रश्नकर्ता :** जेव्हा आपल्याला ज्ञान झाले तेव्हा कळले होते की मला हे ज्ञान झाले आहे?

**दादाश्री :** अरे, कळणार काय? त्यावेळी तर सिद्धगतीत बसल्यासारखे अपार सुख बरसले, मग ते कळणार कसे नाही? बाकावर बसलो होतो तरीही सिद्धगतीतले सुख बरसत होते! त्यावेळी माझ्याबरोबर सेवेसाठी जे बसले होते, त्यांचा तर असाच मोक्ष झाला. हे अक्रम विज्ञान तर खूपच आश्चर्यकारक निघाले आहे!!!

## 'ज्ञानी' स्वशक्ती विकसित करतात

**प्रश्नकर्ता :** आपल्या चरणाशी विधी करतो, त्याचा काय अर्थ आहे?

**दादाश्री :** हा चरणविधी आत आत्म्याला देहापासून वेगळा करतो आणि अंतरसुख, स्वयंसुख उत्पन्न होते. सगळी निर्बळता निघून जाते. ज्ञानींच्या चरणांत आश्चर्यकारक शक्ती असते.

## ज्ञानींना उपमा?

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानीं'ना उपमा नसते का?

**दादाश्री :** त्यांना उपमा नसते. 'ज्ञानी' कोण? सगळ्यांनाच 'ज्ञानी' म्हणत नाहीत. ज्यांना देहाचा मालकपणा अजिबात नाही, वाणीचा, मनाचा मालकपणा नाही, जे स्वतः निरंतर आत्म्यातच असतात, ज्यांच्यात किंचितमात्र अहंकार नसतो, ते 'ज्ञानी'.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानीं'मध्ये नम्रतेची पराकाष्ठा असते?

**दादाश्री :** नम्रता तर सामान्य माणसात देखील असते, पण 'ज्ञानीं'ना तर अहंकारच नसतो. शिव्या दिल्या तरी अहंकार जागृत होत नाही.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी' निस्पृही असतात?

**दादाश्री :** 'ज्ञानी' निस्पृही नसतात. निस्पृही तर बरेच लोक असतात. 'हम को कुछ नहीं चाहिए' (आम्हाला काहीच नको.) असे खूप लोक म्हणतात, पण तो निस्पृहतेचा अहंकार आहे. 'ज्ञानी पुरुष' सस्पृह-निस्पृह असतात, म्हणजे भौतिक सुखात निस्पृह आणि तुमच्या आत्म्यासाठी सस्पृह.

**प्रश्नकर्ता :** स्पृहा म्हणजे इच्छा?

**दादाश्री :** स्पृहा म्हणजे एकाच प्रकारची इच्छा नव्हे, तर अनेक प्रकारच्या, वेगवेगळी विनाशी सुखे भोगण्याच्या इच्छा होतात, त्यांना स्पृहा म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** आपण भविष्य सांगू शकता?

**दादाश्री :** आम्ही तसे म्हणत नाही. पण तुम्ही दुःखी असाल, तर तुम्हाला संपूर्ण चिंतारहित करू शकतो.

## 'ज्ञानीं'ची पारख

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानीं'ना कसे ओळखावे?

**दादाश्री :** त्यांना डिवचल्यावर त्यांनी फणा काढला नाही तर समजा की ते खरे ज्ञानी आहेत. परीक्षा तर घ्यावी लागेल ना? बाबाजींमध्ये क्रोध-मान-माया-लोभ दिसले तर लगेच दुकान बदलून टाकावे.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानीं'ची परीक्षा घेतली तर तो अविनय होतो, त्यांना वाईट वाटते, आणि जर खरे 'ज्ञानी' असतील तर आपल्याला दोषही लागतो ना?

**दादाश्री :** जर खरे ज्ञानी भेटले असतील तर ते तुमचे कल्याणच करतील, अनुचित घडले तरी कल्याणच करतील. आणि जर क्रोधित झाले, फणा काढला तर तुम्ही त्यांची माफी मागून त्यांना पाच-पन्नास रुपयांचा चश्मा देऊन खुश करायला हवे. असे करूनही ते शांत झाले नाहीत तर त्यांना म्हणावे, 'बाबाजी, माझे डोके जरा चक्रम आहे. आत्ताच घरी बायकोशी भांडून आलो आहे', मग ते खुश होऊन जातील. किती दिवस आपला वेळ तिथे वाया घालवायचा?

## आप्तवाणी - कशी क्रियाकारी

**प्रश्नकर्ता :** आपली 'आप्तवाणी' वाचल्यावर इतका चांगला परिणाम होतो की वाचतच राहावे असे वाटते.

**दादाश्री :** ही 'ज्ञानी पुरुषां'ची वाणी आहे आणि ताजी वाणी आहे, आत्ताचेच पर्याय आहेत, त्यामुळे ती वाचताच आपले सर्व पर्याय बदलत जातात, आणि तसतसा आनंद उत्पन्न होत जातो. असे करता करता कोणाला सहजच समकित होऊन जाईल! कारण ही वीतराग वाणी आहे. राग-द्वेषरहित वाणी आहे. राग-द्वेषरहित वाणी असेल तरच काम होते, नाही तर काम होत नाही. भगवंतांची वाणी वीतराग होती, तिचा परिणाम आजही होत आहे. 2500 वर्षे झाली, तरीसुद्धा तिचा परिणाम होतो, तसेच 'ज्ञानी पुरुषां'च्या वाणीचा देखील परिणाम होतो, दोन-चार पिढ्यांपर्यंत तर होतोच.

मोक्षाला जाण्यासाठी वीतराग वाणीशिवाय दुसरा काही उपाय नाही.

**प्रश्नकर्ता :** आप्तवाणीचे दोन्ही भाग मी वाचले आहेत. त्यात कुठेही कोणाचे खंडन किंवा टीका नाही, पूर्ण पुस्तकात!

**दादाश्री :** असे आहे, की समकिती जीव कोणालाही विरोध करत नाहीत. त्यांच्यात खंडन-मंडन नसते. खंडन-मंडन कशाला करायचे? कशासाठी विरोध? विरोध करणे हा तर एक प्रकारचा अहंकार आहे, त्याला वेडा अहंकार म्हणतात.

धर्म त्यालाच म्हणतात की ज्यात विखवाद नसतो, अमृत वाद असतो तो धर्म, विख म्हणजे विष.

**प्रश्नकर्ता :** आप्तवाणी वाचता वाचता 'दादा' दिसतात.

**दादाश्री :** हो... 'दादा' दिसतात. 'एक्झॅक्ट' 'दादा' दिसतात. जिथे इच्छा कराल तिथे 'दादा' दिसतील, आणि आपले फळ मिळेल असे आहे. हे 'दादा' नाहीत, हे जे दिसत आहेत ते तर भादरण गावचे पटेल आहेत. हे बोलतात ते ही दादा नाहीत, तो तर टेपरेकॉर्ड बोलत असतो. 'दादा' तर 'दादा' आहेत! जे वीतराग आहेत, 'चौदालोक'चे नाथ आहेत!! 'आम्ही' पण त्यांची भक्ती करतो. आत जे वीतराग बसलेले आहेत, ते 'दादा' आहेत. ते तर आत प्रकट झालेले आहेत! किती तरी लोकांचे कल्याण होईल. हाताने स्पर्श करेल त्याचेही कल्याण होईल! हे 'अक्रम विज्ञान' आहे. सध्या क्रमिक चालेल असे नाही.



# [ 10 ]
# अक्रम मार्ग

## 'ज्ञानी' कृपेनेच प्राप्ती

**प्रश्नकर्ता :** आपण जो अक्रम मार्ग सांगितला, तो आपल्यासारख्या 'ज्ञानीं'साठी ठीक आहे, सोपा आहे. पण आमच्यासारख्या सामान्य, संसारात राहणाऱ्या, काम करणाऱ्या लोकांसाठी तो कठीण आहे. तर त्यावर काय उपाय आहे?

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुषां'मध्ये भगवंत प्रकट झालेले असतात. 'चौदालोकां'चे नाथ प्रकट झालेले असतात, असे 'ज्ञानी पुरुष' भेटले की मग काय बाकी राहिले? तुमच्या शक्तीने करायचे नाही. त्यांच्या कृपेने होणार आहे. कृपेमुळे सर्व काही बदलून जाते. म्हणून इथे तर तुम्ही जे मागाल तो सर्व हिशोब पूर्ण होतो. तुम्हाला काहीच करायचे नाही. तुम्ही फक्त 'ज्ञानी पुरुषां'च्या आज्ञेतच राहायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** पण स्वत:च्या आत्म्याचा उद्धार स्वत:च्या आत्म्यालाच करावयाचा आहे ना?

**दादाश्री :** बरोबर आहे, पण ही 'क्रमिक मार्गा'ची गोष्ट झाली. हे तर 'अक्रम विज्ञान' आहे. म्हणजे प्रत्यक्ष भगवंतांकडून काम करून घ्यायचे आहे, आणि ते तर तुम्हाला क्षणोक्षणी राहते, तास-दोन तासांसाठी नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्यांच्यावर सर्व सोपविले की, तेच सर्व करतात?

**दादाश्री :** तेच सर्व करतील, तुम्हाला काहीच करायचे नाही. केल्यामुळे तर कर्मे बांधली जातात. तुम्हाला तर फक्त लिफ्टमध्ये बसायचे आहे. लिफ्टमध्ये पाच आज्ञा पाळायच्या आहेत. लिफ्टमध्ये

बसल्यावर आत उड्या मारू नका, हात बाहेर काढू नका, इतकेच तुम्हाला करायचे आहे. कधी तरीच असा मार्ग निघतो, तो पुण्यशाली लोकांसाठीच आहे. हा तर अपवाद मार्ग आहे. दहा लाख वर्षातून एकदाच अपवाद मार्ग निघतो! जगातील हे अकरावे आश्चर्यच म्हटले जाते! अपवादात ज्याला तिकीट मिळाले त्याचे काम झाले.

## ...अपूर्व आणि अविरोधाभास

**प्रश्नकर्ता :** या 'अक्रम' मार्गाद्वारे मोक्ष दिला जातो, ते आपणच सुरू केले की या आधी असे काही होते?

**दादाश्री :** प्रत्येक वेळी हे दहा लाख वर्षांनी येते. हे अगदीच नवे नाही. पण नवे वाटते, कारण दहा लाख वर्षात कुठल्याही पुस्तकरूपात आले नाही म्हणून अपूर्व म्हटले जाते. पूर्वी वाचलेले नाही, ऐकलेले नाही, जाणलेले नाही, असे हे अपूर्व!

**प्रश्नकर्ता :** आपण ज्ञान देता, त्यामागे काही वैज्ञानिक भूमिका असेल तर त्याबद्दल काही सांगा ना!

**दादाश्री :** हे पूर्ण विज्ञानच आहे, अविरोधाभासी विज्ञान आहे. आणि विज्ञानाची भूमिका काय आहे? तर तुमची सर्व पापे भस्मीभूत करणे. त्याशिवाय तुम्हाला साक्षात्कार होणारच नाही, आणि साक्षात्कार झाल्याशिवाय मोक्षाला जाता येत नाही, आणि तो साक्षात्कार योग निरंतर राहिला पाहिजे. एक क्षणही साक्षात्कार योग बदलणार नाही, आपोआपच चालू राहील, तुम्हाला आठवावा लागणार नाही, असा.

आत्मा जाणण्यासाठी, अरे, आत्मा जाणून घेणे जाऊ दे, पण आत्म्याबाबत काही श्रद्धा निर्माण होण्यासाठी, 'मी आत्मा आहे' अशी प्रतीती येण्यासाठी लोकांनी आतोनात प्रयत्न केले आहेत. पण तशी श्रद्धा बसणे कठीण असते, असा हा विचित्र काळ आहे. आता अशा काळात आत्म्याचा अनुभव 'ज्ञानी पुरुषां'कडून येणे, ह्याच या 'अक्रम ज्ञाना'च्या सिद्धी आहेत. सर्व देवी-देवतांची कृपा ह्या 'ज्ञानी पुरुषां'वर बरसत आहे, सर्व ब्रह्मांड ह्यांच्यावर खुश आहे, म्हणूनच हे सर्व प्राप्त होते.

## अक्रममध्ये पात्रता

**प्रश्नकर्ता :** उपादानाची योग्यता असल्याशिवाय, पात्रतेशिवाय निमित्त उपकार करू शकते का? जर करू शकत असेल तर किती आणि कशा प्रकारे?

**दादाश्री :** क्रमिक मार्गात उपादानाची योग्यता असल्याशिवाय निमित्त उपकार करू शकत नाही. हे अक्रम ज्ञानी कोणाचेही काम करू शकतात, त्यांना भेटला तीच त्याची पात्रता. हे तर 'अक्रम विज्ञान' आहे, तासाभरातच मुक्ती देते, असे हे विज्ञान आहे! जे करोडो जन्मात होऊ शकत नाही, ते तासाभरातच होऊन जाते. त्वरित फळ देणारे विज्ञान आहे हे. क्रमिक म्हणजे काय, तर 'स्टेप बाय स्टेप.' पायरी पायरीने वर चढणे. परिग्रह सोडत सोडत वर चढणे.

**प्रश्नकर्ता :** जर सत्तेत दोष पडले असतील तर काय अक्रमिक मार्गाने सद्गुरु त्यांचा नाश करू शकतात? असे आहे का?

**दादाश्री :** हो, सर्व दोषांचा नाश करतात.

**प्रश्नकर्ता :** स्वत:चा आत्मा त्या दोषांचा नाश करू शकत नाही, पण सद्गुरु करू शकतात?

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुष' सर्व काही करू शकतात. 'ज्ञानी पुरुष' काय करू शकत नाहीत? सर्व काही करू शकतात, कारण ते कर्ता नाहीत. जे कर्ता असतील त्यांच्याकडून काहीच होत नाही. आणि 'ज्ञानी पुरुष' तर कर्ता नसतातच, फक्त निमित्तच असतात.

**प्रश्नकर्ता :** स्वत:चा आत्मा हे करू शकत नाही का?

**दादाश्री :** स्वत:चा आत्मा जर करू शकला असता तर आतापर्यंत भटकावे लागले नसते ना? निमित्ताशिवाय काही पत्ता लागत नाही. स्वत:चा आत्मा काही करू शकत नाही. जो बंधनामध्ये आहे तो स्वत:च कसा सुटू शकेल?

**प्रश्नकर्ता :** यापूर्वी इतके सारे ज्ञानी होऊन गेले आहेत, तर त्यातील कोणीही असा अक्रमिक मार्ग सांगितला होता का?

**दादाश्री :** हो, सांगितला होता. ऋषभदेव भगवंतांनी सांगितला आहे. ऋषभदेव भगवंत यांनी भरत राजाला अक्रम मार्ग सांगितला आणि संसारात तेराशे राण्यांसह मोक्ष दिला होता, बाकीच्या नव्याण्णव मुलांना 'क्रमिक मार्ग' दिला होता.

**प्रश्नकर्ता :** ती तर भरत राजाची पात्रता असेल म्हणून. पण आमची तशी योग्यता कुठून असेल?

**दादाश्री :** या 'अक्रम विज्ञाना'त योग्यता पाहतच नाहीत. मला भेटायला हवा. आणि माझे कल्याण करा असे म्हणायला हवे, तरी खूप झाले.

## अहाहा! असे आश्चर्यकारक ज्ञान!

ही आम्हाला मिळालेली निसर्गाची देणगी आहे. मी शोधत होतो, पण आता हे 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्स' आहे. नैसर्गिकपणे 'लाइट' (प्रकाश) झाले आहे. तुम्ही तुमचा दिवा पेटवून घ्या.

**प्रश्नकर्ता :** या 'अक्रम मार्गा'त सातव्या मजल्यावर पोहोचल्यानंतर परत चौथ्या, पाचव्या मजल्यावर उतरतो, असे होते का?

**दादाश्री :** नाही, मग उतरत नाही. पण असे आहे की, जर स्वतःला जाणूनबुजून खोदून काढायचे असेल, उडी मारायची असेल, तर त्याला कोण थांबवू शकतो? बाकी, स्वतःच्या इच्छेशिवाय कोणी खाली पाडणारा नाही.

इथेच मोक्ष झाला पाहिजे. उधार मोक्ष आम्हाला नको. मोक्ष म्हणजे मुक्त भाव. इथेच चिंता, काळजी होत नाहीत, कसलाही परिणाम होत नाही, आपला *उपरी* कोणीच नाही, असे अनुभवास येते. असा अनुभव यायलाच हवा. अनुभवाशिवाय काही कामाचे नाही, अनुभव नसेल तर सर्व घोटाळाच आहे, असे म्हणावे लागेल. 'कॅश' पाहिजे. म्हणून 'दिस इज द कॅश बँक ऑफ डिवाइन सोल्यूशन.'

**प्रश्नकर्ता :** आयुष्यात वर्षे कमी आहेत आणि पल्ला लांबचा आहे, पण हे अक्रम विज्ञान मिळाले, त्यामुळे खूप उल्हास येतो.

**दादाश्री :** असे आहे की, असे कधी घडत नाही, आणि आता घडले आहे तर आपण आपले (मोक्षाचे) काम उरकून घ्यायला हवे. उल्हास तर वाटेलच ना! मला हे ज्ञान प्रकट झाले तेव्हा मला देखील खूप उल्हास वाटला की किती हे आश्चर्यकारक ज्ञान! आश्चर्यकारक सिद्धी उत्पन्न झाल्या आहेत! कारण आता या जगात अशी कुठली वस्तू नाही की ज्याची मला भीक (याचना, तीव्र इच्छा) असेल. मानाची भीक, लक्ष्मीची भीक, कीर्तीची भीक, विषयांची भीक, शिष्यांची भीक, मंदिरे उभारण्याची भीक, कुठल्याही गोष्टीची भीक आम्हाला नव्हती, म्हणूनच हे पद प्राप्त झाले आहे! तरीसुद्धा हे 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्स' आहे. आता या पदाच्या आधारे तुम्हाला देखील तीच दशा प्राप्त होते. ज्यांचे निदिध्यासन कराल तद्रूप व्हाल.

**प्रश्नकर्ता :** पूर्वजन्माच्या योगामुळेच 'अक्रम' मिळते ना?

**दादाश्री :** हे एकच साधन आहे ज्याच्याद्वारे माझी भेट होऊ शकते. कोटी जन्मांचे पुण्य जागृत होते तेव्हा असा योग जुळतो.

बाकी सर्व मार्गांना क्रमिक मार्ग म्हणतात. क्रमिक मार्ग हा 'रिलेटिव्ह' मार्ग आहे. 'रिलेटिव्ह' म्हणजे भौतिक फळे देणारा, आणि मोक्षाकडे हळूहळू 'स्टेप बाय स्टेप' घेऊन जाणारा. त्याग आणि तप करत करत शेवटी अहंकार शुद्ध करावा लागेल. मग तिथे मोक्षाचा दरवाजा दिसेल. क्रोध-मान-माया-लोभ, विषय, संसारिक भाव - या सर्वातून अहंकार शुद्ध करावा लागतो, तेव्हाच तिथे मोक्षाचा दरवाजा उघडतो. क्रमिक मार्ग तर खूप अवघड आहे! आणि इथे या 'अक्रम मार्गा'त तर 'ज्ञानी पुरुष' तुमचा अहंकार शुद्ध करून टाकतात. अहंकार आणि ममता दोन्ही काढून टाकतात, मग उरले काय? मग तुम्ही तुमच्या स्वरूपाच्या अनुभवात येता. तुम्हाला आत्म्याचा अनुभव येतो, तेव्हाच काम होते.



# [ 11 ]
# आत्मा आणि अहंकार

## सनातन चेतन

**प्रश्नकर्ता :** चेतन कुठून आले. त्याची उत्पत्ती कुठून झाली?

**दादाश्री :** त्याची उत्पत्तीही नाही आणि व्ययही नाही. या तर जीवाच्या अवस्था आहेत. अवस्था बदलतात, वस्तू तशीच्या तशी राहते.

## निसर्ग म्हणजे...

**प्रश्नकर्ता :** निसर्ग म्हणजे काय?

**दादाश्री :** निसर्ग म्हणजे 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्स' आहे.

**प्रश्नकर्ता :** हे वैज्ञानिक सांयोगिक पुरावे एकत्र येतात तेव्हा त्यांच्या मागे कुठली तरी शक्ती तर आहेच ना?

**दादाश्री :** ती जिवंत शक्ती नाही, ती जड शक्ती आहे. जड आणि चेतन यांची मिश्र शक्ती आहे. यात जडाचा विशेष भाव झालेला आहे. यात आत्मा तर अनादि काळापासून जसा आहे तसा, तसाचा तसाच राहिला आहे.

## कोणाचे कोणावर नियंत्रण?

**प्रश्नकर्ता :** जीव शरीरावर नियंत्रण ठेवते की शरीर जीवावर?

**दादाश्री :** हाच प्रश्न आहे ना! आता जीवाचे या शरीरावर बिलकुल नियंत्रण नाही. नियंत्रण का नाही? तर 'त्याला स्वतःलाच रॉंग बिलीफस् बसल्या आहेत.' 'मी चंदुलाल आहे.' हीच सर्वात मोठी 'रॉंग बिलीफ' आहे.

**प्रश्नकर्ता :** व्यावहारिक रूपात असे मानावे लागते.

**दादाश्री :** व्यावहारिक रूपात मानले तर हरकत नाही, पण तुम्हाला कोणी शिव्या दिल्या तर तुम्ही त्या स्वीकारता की नाही? तुमच्यावर त्याचा परिणाम होत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** होतो.

**दादाश्री :** मग तुम्ही व्यावहारिक रूपात 'चंदुलाल नाहीत', वास्तविक रूपातच 'चंदुलाल आहात' अशी रॉंग बिलीफ बसली आहे. लोकांनी म्हटले 'चंदुलाल', म्हणून तुम्हीही तसे मानले. मग 'या स्त्रीचा पती आहे, या मुलाचा बाप आहे, मी असा आहे, कलेक्टर आहे, अमुक आहे.' अशा किती 'रॉंग बिलीफस्' आहेत?

**प्रश्नकर्ता :** खूप साऱ्या.

**दादाश्री :** ह्या सर्व 'रॉंग बिलीफस्' बसल्या आहेत, म्हणूनच देहाचा जीवावर 'कंट्रोल' आहे. जर 'रॉंग बिलीफस्' निघून गेल्या तर देहाचा जीवावर बिलकुल 'कंट्रोल' राहणार नाही. आत्मा स्वतः अनंत शक्तीवाला आहे, पण या 'रॉंग बिलीफस्'मध्ये अडकला आहे. ह्या 'रॉंग बिलीफस्' कशा जातील? तर जेव्हा 'ज्ञानी पुरुष' 'राइट बिलीफ' देतील तेव्हा. आपल्या शास्त्रात ज्याला सम्यक् दर्शन म्हटले आहे ते सम्यक् दर्शन झाले की रॉंग बिलीफ निघून जातात. अन्यथा 'मी चंदुलाल आहे' असे मानण्याने काहीही निष्पन्न होणार नाही. खरे तर तुम्ही 'स्वतः' चंदुलाल नाहीत. 'बाय रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंटने' तुम्ही चंदुलाल आहात. बाय रियल व्ह्यू पॉइंटने तुम्ही कोण आहात? याचा शोध घेतला पाहिजे ना? शोध घ्यायला नको का? अर्थात आता तुमच्यावर देहाचाच 'कंट्रोल' आहे. फक्त देहाचाच नाही, तर मनाचा सुद्धा 'कंट्रोल' आहे! मन

'कम्प्लीट फिजिकल' आहे. या सर्वांचा 'कंट्रोल' आता तुमच्यावर आहे. अरे, देहाचा जीवावरील कंट्रोलबद्दल काय बोलता? एक फोड आला, आणि दुखत असेल तर त्याचाही 'कंट्रोल' जीवावर आहे!

## अहंकाराचे स्वरूप

**प्रश्नकर्ता :** वास्तवात आवागमन (येणे-जाणे) आत्म्याचे होते की देहाचे?

**दादाश्री :** आवागमन आत्म्याचेही होत नाही की देहाचेही होत नाही, अहंकाराचेच आवागमन होते. हा देह तर त्याचे सर्व सामान घेऊनच येतो, पण मुळात आवागमन तर अहंकारच करत असतो. ज्याचा अहंकार संपला त्याचे आवागमन बंद झाले.

**प्रश्नकर्ता :** अहंकाराची खरी व्याख्या काय?

**दादाश्री :** अहंकाराची खरी व्याख्या जगाला समजलेलीच नाही. लोक समजतात तशी ती नाही. सर्व जण स्वतःच्या भाषेत समजतात. प्रत्येकाची स्वतःची भाषा वेगळी असते ना? पण भगवंताच्या भाषेसमोर हे चालणार नाही. तिथे तर 'टेस्ट' घेतली जाणार आहे. तिथे हे कामी येणार नाही.

अहंकार म्हणजे स्वतः करत नाही, तरी देखील 'मी करतो' असा आरोपित भाव, याला अहंकार म्हटले जाते. अहंकार मुख्य वस्तू आहे आणि त्यातून मान, अभिमान, गर्व, *घेमराजी* (घमेंडघोरपणा, इतरांना तुच्छ मानणे) असे सर्व वेगवेगळे शब्द बनले आहेत. अभिमान कसा असतो? त्यात आरोपित भाव म्हणजे अहंकार तर असतोच, पण 'माझे चार बंगले आहेत, दोन गाड्या आहेत' असे प्रदर्शन करणे, त्याला अभिमान म्हणतात.

स्वतः जे करत नाही, ते करण्याचा आरोप करणे, तो अहंकार आहे.

**प्रश्नकर्ता :** गीतेमध्ये अहंकाराला मूळ वस्तू म्हटले आहे, म्हणजे अहंकार ही उत्पत्तीच्या अगोदरची वस्तू असेल ना?

**दादाश्री :** अहंकार ही उत्पत्तीच्या अगोदरचीच वस्तू आहे. गीतेचे वचन खरे आहे. अहंकार उत्पत्तीनंतर नसतो. मुळात आधी अहंकार होतो आणि मग उत्पत्ती होते. या जन्मात तुम्ही जी जी कर्मे केलीत, त्याचा जो अहंकार करता, त्याची फळे पुढच्या जन्मात येतात. खरे तर करत असतो कोणी दुसराच आणि तुम्ही भ्रांतीमुळे मानता की मी केले. जर स्वत: कर्ता असता तर कोणी मृत्यू पावले नसते. शौचाला जायचीही शक्ती कोणामध्ये नाही. तरी पण त्याच्याकडे स्वत:च्या अन्य काही शक्ती आहेत, पण त्या शक्ती प्रकट झालेल्या नाहीत. आणि 'मी करतो' असे जे म्हणतात ते तर 'स्वत:च्या' शक्तीच्या पलीकडची बाब आहे. लोक म्हणतात ना की, 'मी खाल्ले, मी प्यायलो, मला भूक लागली!' 'लागली आहे तर ती विझव ना!' तर म्हणेल, 'नाही, आत काही तरी टाकल्याशिवाय ती विझणार नाही! आधी अहंकार (निर्माण) होतो त्यानंतर हे शरीर बनते, त्यानंतर हे बाहेरील परिणाम दिसतात. अहंकारामुळे कर्मे बांधली जातात आणि त्याचे हे फळ आहे. मन-वचन-काया ही सर्व फळे आहेत. अहंकार 'कॉज' आहे आणि मन-वचन-काया हे सर्व 'इफेक्टस्' आहेत. 'कॉजेस आणि इफेक्टस्', 'इफेक्टस् आणि कॉजेस' असे चालतच राहते. 'ज्ञानी पुरुष' कॉजेस बंद करतात. म्हणून फक्त इफेक्टस् राहतात आणि मग 'इफेक्टिव बॉडी' (पारिणामिक देह) बनत नाही.

## धर्म भेद स्वरूपात - अभेद स्वरूपात

जगात दोन प्रकारचे धर्म असतात : एक, आत्मा-परमात्मा यांना अभेद स्वरूपात ओळखणे, हा एक प्रकारचा धर्म. दुसरा, आत्मा-परमात्मा यांना भेद स्वरूपात ओळखणे म्हणजे मी आणि भगवंत दोन्ही वेगळे आहोत, अशा प्रकारे ओळखणे.

पहिल्या प्रकारचा धर्म असा आहे की आत्माच परमात्मा आहे याचे भान येणे. हा खरा धर्म आहे, त्यानंतर मुक्ती मिळते. स्वत:चा आत्माच परमात्मा आहे, असे भान आले की मुक्ती मिळते.

आणि जोपर्यंत आत्मा आणि परमात्मा वेगळे आहेत असे वाटत

असते तोपर्यंत पुण्य किंवा पाप बांधले जाते, म्हणून कारण-शरीर उत्पन्न होत राहते आणि अनंत जन्म भटकत राहतो. परमात्मा वेगळा आणि मी वेगळा असे म्हणतात, ती भ्रांत मान्यता आहे. खरे तर परमात्मा आणि तुम्ही एकच आहात, पण तुम्हाला ते समजत नाही. तुम्ही आणि परमात्मा एकच आहात, हे समजावणारा कोणी भेटत नाही. तो भेटला तर तुम्हाला अभेद स्वरूपाचे भान करून देईल. परमात्मा वेगळे वाटतात हा तुमचा कमकुवतपणा आहे आणि म्हणूनच तुम्ही जीव स्वरूपात आहात. आणि परमात्म्यामध्ये कमकुवतपणा नाही म्हणून तुमचा कमकुवतपणा गेला की परमात्म्याच्या स्वरूपाचा सतत साक्षात्कार होत राहील.

लोक 'चंदू-चंदू' करतात म्हणून त्याला वाटते की 'मी चंदू आहे.' ही भ्रांती मग जात नाही. खरे तर स्वत:च परमात्मा आहे.

## तरणतारणच तारेल

**प्रश्नकर्ता :** त्या परमात्म्याच्या 'स्टेज'पर्यंत जाण्यासाठी काय करावे लागते?

**दादाश्री :** त्याकरिता 'ज्ञानी पुरुषा'ची कृपा प्राप्त करावी लागते. जर हळूहळू त्या स्टेजपर्यंत जायचे असेल तर 'ज्ञानी पुरुषां'कडून आज्ञा घ्यावी लागते, आणि जर कृपा प्राप्त केली तर तासाभरातच ती स्टेज मिळून जाते. नाही तर हळूहळू, हळूहळू जावे. ज्याला फार घाई नाही, अजून इंद्रियांचे रस भोगण्याची इच्छा राहिली आहे, सांसारिक इच्छा राहिल्या आहेत, त्याने हळूहळू जावे आणि ज्याला सांसारिक सुखातसुद्धा दु:ख वाटत असेल, सुख पण सहन होत नसेल, तर मग तो 'मुक्ती'चा अधिकारी झाला. मग 'ज्ञानी पुरुष' त्याला मुक्ती देतात. कारण 'ज्ञानी पुरुष' स्वत: तरणतारण झाले आहेत, ते स्वत: तरले आहेत आणि अनेकांना तारण्यास ते समर्थ आहेत.

**प्रश्नकर्ता :** अशी गुरुकृपा झाली तर मग मेहनत कमी करावी लागेल.

**दादाश्री :** सध्या तुम्ही जी मेहनत करत आहात ती सर्व वाया जाईल. तशी अगदीच वाया जात नाही, पण जे काम तासाभरात होईल, त्यासाठी पूर्ण वर्ष घालवावे लागेल. आणि माथी गुरु असतील, तर गुरु जिथपर्यंत पोहोचले असतील तिथपर्यंत आपल्याला घेऊन जातील. आणि 'ज्ञानी पुरुष' शेवटपर्यंत पोहोचलेले असतात, म्हणून ते आपल्याला शेवटपर्यंत नेतात.



# [ 12 ]
# व्यवस्था ‘व्यवस्थित’ची

## ‘व्यवस्थित शक्ती’

**प्रश्नकर्ता :** जगाचे नियंत्रण करणारी जी शक्ती आहे, तीच ‘व्यवस्थित शक्ती’ आहे का?

**दादाश्री :** तीच व्यवस्थित शक्ती आहे. हे नियंत्रण म्हणजे काय? आपल्याला पाणी वर चढवायचे असेल तर पंप चालवावा लागतो आणि पाणी खाली सोडायचे असेल तर? तुम्हाला काहीच करावे लागत नाही. कोणी विचारेल असे का? कारण पाण्याचा स्वभावच आहे की खाली वाहत जाणे. तसेच हे नियंत्रण देखील स्वभावानेच होत असते.

**प्रश्नकर्ता :** जगात जी मूळ तत्त्वे आहेत, त्यावर तर ‘व्यवस्थित’शक्तीचा ताबा आहे ना?

**दादाश्री :** कोणाचाही कोणावर ताबा नाही. हे अनियंत्रित टोळके आहे. सगळेच स्वतंत्र आहेत. ‘व्यवस्थित’ तर तुम्हाला जाणण्यासाठी आहे, समजण्यासाठी आहे. बाकी, त्यांना कसली पर्वा नाही. ‘व्यवस्थित’ तर तुम्हाला मोक्षाच्या स्टेशनपर्यंत जाण्याचे तिकीट आहे. ते तिकीट असेल तर तुम्ही पुढे जाऊ शकाल. कोणी कुणाच्या ताब्यात नाही. सगळे स्वतंत्र आहेत. यात आत्मा तर परमात्मा आहे, चेतन आहे. तरी पण दुसरी तत्त्वे त्याला जुमानत नाहीत. दुसरी तत्त्वे म्हणतात, ‘तू परमात्मा आहेस, त्याचे आम्हाला काय? तू वेगळा आणि आम्ही वेगळे!’

## काळचक्रानुसार...

**प्रश्नकर्ता :** युग, सत्युग, कलियुग वगैरे कसे बनले?

**दादाश्री :** हे तर काळचक्र आहे. जसे गोल चक्र फिरता फिरता खाली उतरत जाते, तसेच काळचक्राचा हा उतरता काळ आहे. यानंतर परत चढता काळ येईल.

**प्रश्नकर्ता :** मग पापी आणि पुण्यवंतांचा काय दोष?

**दादाश्री :** काहीही दोष नाही. खरे तर स्वतः दोषी नाहीच, पण स्वतःच म्हणतो की 'मी हे केले.' चुकीचे केले किंवा बरोबर केले तरी 'मी केले' असे म्हणतो. स्वतःच सही करतो म्हणून भोगावे लागते. हे स्वतः करत नसतो. करायचे नसेल तरी निसर्ग त्याच्याकडून जबरदस्ती करून घेतो, हे सर्व नैमित्तिक धक्क्यामुळे होत असते. सतयुग वगैरे सगळे युग कसे आहेत? दिवसा आपण हरभरे घ्यायला गेलो तर थोडेतरी मिळतील, शंभर-दोनशे मण मिळतील सुद्धा. परंतु जर रात्री अडीच वाजता गेलो तर? किती हरभरे मिळतील? तसेच हे आहे. काळानुसार होत राहते.

## सेवेत समर्पणता

**प्रश्नकर्ता :** मग या जगासाठी आम्हाला काही करायला नको का?

**दादाश्री :** तुम्हाला काही करायचे नव्हतेच, हा फक्त अहंकार उभा झाला आहे. फक्त मनुष्यच कर्तेपणाचा अहंकार करतात.

**प्रश्नकर्ता :** या ताई डॉक्टर आहेत. एखादा गरीब 'पेशंट' आला की त्याच्यासाठी अनुकंपा होते आणि त्या इलाज करतात, पण आपण म्हणता त्यानुसार तर अनुकंपा करण्याचा काही प्रश्नच उद्‌भवत नाही ना?

**दादाश्री :** ती अनुकंपा देखील नैसर्गिक आहे. पण मग अहंकार करतात की 'मी किती अनुकंपा केली!' अहंकार केला नाही तर काही हरकत नाही. पण अहंकार केल्याशिवाय राहतच नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** या जगाची सेवा करताना परमात्म्याच्या सेवेचा भाव ठेवून सेवा केली तर त्याला कर्तव्य म्हणायचे का?

**दादाश्री :** हो, पण त्याचे फळ म्हणून पुण्य मिळते, मोक्ष नाही.

**प्रश्नकर्ता :** त्याचे श्रेय साक्षात्कारी परमात्म्याला दिले तरी मोक्ष मिळत नाही?

**दादाश्री :** असे कुणाला फळ देता येत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** मनापासून समर्पण केले तर?

**दादाश्री :** समर्पण केले तरी कोणी फळ घेतही नाही आणि कोणी देतही नाही. फक्त बोलण्यापुरते समर्पण आहे. फळ ज्याचे त्यालाच मिळते. निसर्गाचा न्यायच असा आहे की 'भोगतो त्याची चूक.'

**प्रश्नकर्ता :** 'मी करतो' हा भाव सुटला तर?

**दादाश्री :** कर्ताभाव सुटला आणि स्वरूपज्ञान झाले तर कर्म बांधले जात नाही.

## ही नवीनच समाज-रचना?

**प्रश्नकर्ता :** जगात काही लोक दुसऱ्यांना मारतात, कापून टाकतात आणि नवी समाज-रचना करतात, मग त्याचे काय होईल?

**दादाश्री :** हा समुद्र आहे, त्यात एकमेकांवर हल्ले होतात, ते तुम्ही पाहिले आहेत का? मोठमोठे मासे, शंभर-शंभर मणाचे, दहा-दहा मणाचे मासे आतल्याआत लढत असतात, ते सर्व तुम्ही पाहिले आहे?

**प्रश्नकर्ता :** मग, तशाच लढाया चालत राहतील, असेच ना?

**दादाश्री :** हो. हे निसर्गाचे काम आहे. यात कोणी काही करत नाही बिचारे! हे सर्व 'व्यवस्थित' करून घेते. या लढाया, 'वॉर' सर्व नैसर्गिक आहेत. तुम्हाला जर हा संसार आवडत नसेल तर तुम्ही अकर्ता होऊन 'ज्ञानी पुरुष' जे सांगतात त्याप्रमाणे वागा, तरच सुटका होईल.

यात कोणाची सत्ता चालत नाही. या जगात कोणालाही शौचाला जायची देखील सत्ता नाही. निसर्गात जेव्हा संयोग असतील तेव्हाच सर्व होईल.

**प्रश्नकर्ता :** हे जग तर 'लक्जुरीयस' (ऐषोआरामी) होत चालले आहे. जड होत चालले आहे.

**दादाश्री :** कधीपर्यंत 'लक्जुरीयस' नव्हते? जोपर्यंत काही पाहिले नव्हते तोपर्यंतच. म्हणजे ज्यांनी हे सर्व पाहिले नव्हते ते निर्मोही होते. गावात असे काही पाहायला मिळतच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे कोणी भेटलेच नाही म्हणून ब्रह्मचारी होते, असे?

**दादाश्री :** आता जो मोह दिसतो, तो पाहण्याचा मोह आहे, आणि या मोहातून ज्ञान उत्पन्न झाले आहे. ठोकरा खाऊन खाऊन दम निघाला आहे आणि त्या मोहातून वैराग्याचा जन्म झाला आहे.



## [ 13 ]
# व्यवहार धर्म : स्वाभाविक धर्म

## सुख प्राप्तीसाठी कोणता धर्म?

**प्रश्नकर्ता :** धर्म कशाला म्हणतात? कोणी धर्म पाळावा? धर्म पालन करणे याचा अर्थ काय?

**दादाश्री :** हे सर्व प्रचलित धर्म आहेत, ते सर्व व्यावहारिक धर्म आहेत. व्यावहारिक म्हणजे व्यवहार चालविण्यासाठी. वैष्णव धर्म, जैन धर्म, शैव धर्म वगैरे सर्व व्यावहारिक धर्म आहेत.

आता या रस्त्यावर वाहतूकीचा व्यवहार असतोच ना? त्यांचा धर्म काय आहे की टक्कर झाली तर तुम्ही मराल. टक्कर होण्यात धोका आहे म्हणून कोणाशी टक्कर होऊ देऊ नका, कोणाला दु:ख किंवा त्रास देऊ नका, असे वाहतुकीचा धर्मही सांगतो. तसेच हा व्यवहार धर्म देखील सांगतो की कोणाला त्रास देऊ नका. तुम्हाला सुख हवे असेल तर दुसऱ्यांना सुख द्या. त्याच माणसाने तुम्हाला सुख दिले नाही तर दुसरा कोणीतरी तुम्हाला सुख देईल. आणि जर दु:ख दिले तर कोणी न कोणी तुम्हाला दु:ख देईलच, याला व्यावहारिक धर्म म्हणतात.

खरा धर्म तर स्वत:च्या 'वस्तू'चा (आत्म्याचा) स्वभाव आहे. तो आत्मधर्म आहे, स्वत:चा स्वाभाविक धर्म आहे, त्यात तर निरंतर परमानंदच आहे. खरा धर्म तर 'ज्ञानी पुरुष' आत्मा देतात तेव्हापासून आपोआपच सुरू होतो, आणि व्यवहार धर्म तर आपल्याला करावा लागतो, शिकावा लागतो.

## समाधानातून सुख!

**प्रश्नकर्ता :** धर्मात आणि व्यवहारात, सगळीकडे लागू होईल आणि सुखावह असेल, अशी कोणती गोष्ट आहे?

**दादाश्री :** आमच्याकडून स्वरूपज्ञान घेऊन जाईल त्याला सर्व काही सुखावहच वाटेल. आणि ज्याला काही अंतराय असतील आणि ज्ञान घ्यायचे नसेल तर, त्याने आम्हाला हे सर्व विचारले आणि समजून घेतले की 'हा संसार कसा चालतो, हे सर्व काय आहे?' तरी तो सुखी होईल.

समाधान वाटणे, हाच धर्म आहे. काही प्रमाणात समाधान आणि काही प्रमाणात असमाधान वाटणे तो 'रिलेटिव्ह' धर्म झाला, ती पहिली पायरी आहे. त्यानंतर 'रियल' धर्मात येतो, ज्यात प्रत्येक संयोगात समाधान असायला हवे. समाधान असेल तरच शांती मिळेल ना?

जीवमात्र काय शोधत असतो? आनंद शोधत असतो, पण क्षणभरही आनंद मिळत नाही. लग्नाला जा किंवा नाटकाला जा, पण नंतर परत दु:खच येते. ज्या सुखामागून दु:ख येते त्याला सुख म्हणावेच का? हा तर मूर्च्छेचा आनंद आहे. सुख तर 'पर्मनन्ट' असते. हे तर 'टेम्परगी' सुख आहे शिवाय कल्पित आहे, मानलेले आहे. प्रत्येक आत्मा काय शोधत असतो? कायमचे सुख, शाश्वत सुख शोधत असतो. 'यातून मिळेल, त्यातून मिळेल, हे घेतले, ते केले, बंगला बांधला तर सुख मिळेल. गाडी घेतली तर सुख मिळेल.' असे करत राहतो. पण काहीच सुख मिळत नाही. उलट अधिकाधिक जंजाळात अडकून जातो. सुख स्वत:च्या आतच आहे. आत्म्यातच आहे. आत्मा प्राप्त केला की सुखच मिळते.

रात्री साडेदहा वाजता झोपला आणि कोणाला तरी दोनशे रुपये उधार दिले 'त्याची मुदत आज संपली, त्याचे काय होईल? असा विचार आला तर झोप येईल का? अशा वेळी समाधान होण्यासाठी काही साधन हवे की नको? समाधानाशिवाय तर माणूस 'मॅड' होऊन जाईल 'प्रेशर' वाढून जाईल आणि छातीत दुखायला लागेल. समाधान झाले तर थोडे बरे वाटेल.

## भगवत् उपाय हेच सुखाचे कारण!

**प्रश्नकर्ता :** आपण 'टेम्परारी' आनंद म्हटले आहे, आणि दुसरा 'पर्मनन्ट' म्हटले आहे. पण या दोन्हींमधील फरक आम्ही जोपर्यंत ते सुख उपभोगले नसेल तोपर्यंत कसा कळेल?

**दादाश्री :** ते कळतच नाही. 'पर्मनन्ट' सुख मिळत नाही तोपर्यंत यालाच तुम्ही सुख म्हणता.

शेणात राहणाऱ्या किड्याला जर फुलात ठेवले तर तो मरून जाईल. कारण त्याला त्याच सुखाची सवय आहे, परिचय आहे, त्याची प्रकृतीच तशी बनली आहे. आणि फुलातील किड्याला शेणात बरे वाटणार नाही.

लोक म्हणतात की पैशात सुख आहे, पण काही साधू महाराज असे असतात की त्यांना पैसे दिले तरी ते घेत नाहीत. तुम्ही मला सर्व जगातले सोने आणून दिले तरी मी ते घेणार नाही. कारण मला पैशात सुख वाटतच नाही. म्हणजेच पैशात सुख नाही. जर पैशात सुख असते तर सर्वांना मिळाले असते. पण आत्म्यातील सुख सर्वांनाच जाणवते. कारण ते खरे सुख आहे, सनातन सुख आहे. तो आनंद तर कल्पना देखील करता येणार नाही इतका अधिक आहे!

जिथे आत्मा–परमात्मा या शिवाय दुसरी कोणतीच चर्चा नाही तिथे खरा आनंद आहे, जिथे संसाराबद्दल किंचितही चर्चा होत नाहीत उदा. संसारात कशा प्रकारे फायदा होईल, कशा प्रकारे गुण उत्पन्न होतील, वगैरे. लोक सद्गुण उत्पन्न करू इच्छितात. गुण, सद्गुण, दुर्गुण हे सर्व अनात्मा विभागात येतात, आणि विनाशी आहेत. तरी पण लोकांना त्याची आवश्यकता आहे. ज्याला त्याला त्याच्या अपेक्षेप्रमाणे वेगवेगळे हवे असते. पण ज्याला संपूर्ण वीतराग पद हवे आहे, त्याने या सर्व सद्गुण, दुर्गुणांच्या पलीकडे जायला हवे. आणि 'मी कोण आहे' हे जाणून घ्यायला हवे आणि ते जाणून घेतल्यावर आत्मा–परमात्मा यांच्याच चर्चेत राहिला, तर त्याला संपूर्ण वीतराग दशा प्राप्त होईल.

**प्रश्नकर्ता :** खरे सुख मिळत नाही आणि वेळ निघून जात आहे.

**दादाश्री :** खरे सुख हवे असेल तर आपल्याला पण खरे व्हावे लागेल. आणि संसारिक सुख हवे असेल तर संसारी व्हावे लागेल. संसारिक सुख हे पूरण-गलन स्वभावाचे आहे, येते आणि नंतर निघून जाते, ते द्वंद वाले आहे. 'मी कोण आहे' हे कळले की मगच खरे सुख नेहमी मिळत राहते.

**प्रश्नकर्ता :** संसारात सुख कधी मिळणार?

**दादाश्री :** संसारात सुख नसतेच. पण भगवत् उपाय केले तर थोडी शांती लाभते आणि ज्ञान उपायाने कायमची शांती मिळते.

सध्याच्या काळात नव्याण्णव टक्के दु:ख आणि एक टक्का सुख, सांसारिक सुख आहे. सत्युगात सुख होते.

## काळाचा काय दोष?

**प्रश्नकर्ता :** काळामुळे सुख-दु:ख होतात का?

**दादाश्री :** हा तर समसरण मार्ग आहे. हे जीव प्रवाहात वाहत आहेत, म्हणजे गतीत आहेत. गतीचे मोजमाप कसे करावे? द्रव्य, क्षेत्र, काळ आणि भाव एकत्र आले की कार्य झालेले दिसते. काळ प्रत्यक्ष दिसतो म्हणून लोक काळाबद्दलच बोलत राहतात. या कलियुगात, दूषमकाळात आपण आलो त्यात आपले कर्तेपण किती? त्यात आपला वाटा किती?

साऱ्या जगाला आतून अपार जळजळ होत असते, निरंतर अंतरदाह होत असतो. कोणी म्हटले, 'चंदुभाईला अक्कल नाही' तर त्याचा परिणाम होतो, अंतरदाह होतो. अंतरदाह म्हणजे काय? आत परमाणू पेटतात आणि एक पेटला की तो दुसऱ्याला पेटवतो, दुसरा तिसऱ्याला पेटवतो, असे निरंतर चालत राहते. 'इलेक्ट्रिसीटी' प्रमाणे पेटत राहते, वेदनांच्या स्वरूपात ते भोगावे लागते. विशेष परमाणू पेटले की लोक म्हणतात 'माझा जीव जळत आहे.' हे कसे सहन होईल? अंतरदाह गेला की मुक्तीचे नगारे वाजू लागतात!

## अंतरसुख-बाह्यसुख

आजचे भौतिक विज्ञान 'आउट ऑफ बॅलेन्स' (असंतुलीत) झाले आहे. 'नॉर्मालिटी'च्या बाहेर गेले आहे, म्हणून 'पॉइजन' झाले आहे. आज या भौतिक विज्ञानामुळे अपार बाह्यसुख उपलब्ध झाले आहे. तर दुसऱ्या बाजूला अंतरसुख लोप पावले आहे! अंतरसुख आणि बाह्यसुख यात थोडा 'इक्वल बॅलेन्स' (संतुलन) असायला हवा. थोडे फार कमी-जास्त झाले तर चालेल पण त्याचे काही प्रमाण असायला हवे. भौतिक सुख कमी असेल तर चालू शकेल, पण आज तर अंतरसुख नाहीसे झाले आहे. या अमेरिकेत तर पूर्णपणे नाहीसे झाले आहे. तेथील प्रजेला तर वीस-वीस गोळ्या खाल्ल्यावर मोठ्या मुश्किलीने झोप येते! अमेरिकेने एकीकडे अपार भौतिक सुख मिळविले आहे, तर दुसरीकडे अंतरसुख नष्ट झाले आहे!! हे कुठले सायन्स!!!

लोक अंतरशांतीसाठी बाहेर धावाधाव करत असतात, पण अशी धावाधाव केल्याने शांती मिळते का? अंतरशांती असेल तरच बाहेर शांती मिळेल. म्हणूनच आत सुख आहे अशी श्रद्धा बसली पाहिजे तर अंतरशांती मिळेल.

भगवंताने काय सांगितले होते की अंतरसुख आणि बाह्यसुख यांच्या तागडीवर लक्ष ठेवा. अंतरसुख कमी झाले आणि बाह्यसुख वाढले की समजा आता मरण आलेच. तागडी थोडी वर-खाली झाली तर चालवून घ्या, पण इथे तर अंतरसुखाची दांडी एकदम उंच झाली आहे मग तुझी काय दशा होईल? बाहेरची सुखे वाढवून ठेवली, चाळीस लाखाचा फ्लॅट घेतला आहे, खाण्या-पिण्याची चंगळ आहे, फळांच्या टोपल्या भरलेल्या आहेत, तरी साहेबांना 'ब्लड प्रेशर' आणि 'हार्ट अॅटॅक' आलेला असतो आणि बाई साहेबांना 'डायबिटीस' झालेला असतो! दोघांच्या तोंडावर डॉक्टरने शीकी (पशुंच्या तोंडावर बांधली जाणारी पट्टी) बांधून ठेवलेली असते!!! मग हे सगळे खातो कोण? तर घरातील ते उंदीर, म्हणजेच नोकर आणि आचारी, खाऊन पिऊन चांगले गलेलठ्ठ झालेले असतात. 'फ्लॅट'मध्ये गेलो तर वाटते जणू आपण

स्मशानात आलो आहोत! शेठबरोबर बोललो तर खूप अहंकारीपणे बोलतात. शेठ महाग चहा पाजतात, पण जोपर्यंत भावरूपी द्रव्य पडत नाही तोपर्यंत अगदी सोळा आणे सोने असले तरी काही कामाचे नाही. शेठचा चेहरा पाहिला तर शेठ हसणे विसरूनच गेले आहेत असे वाटते! ही कसली बाह्यसुखाची भेट (!) ?

अंतरशांती तृप्ती देते आणि बाह्यशांतीमुळे लोभ वाढत जातो. जिथे स्वार्थ बुद्धी आहे तिथे अंतरशांती राहत नाही.

## अहंकार विलय झाल्यावर सनातन सुख

जितके उलट दिशेने जाल तेवढा 'इगोइजम' (अहंकार) वाढतो आणि 'इगोइजम'चा जितका विलय होतो तितके जास्त सुख मिळते. आमचा 'इगोइजम' संपला आहे, म्हणून आम्हाला निरंतर सनातन सुख असते. दु:खात सुद्धा सुख वाटते, ते खरे सुख. कोणी अपमान करतो तेव्हाही आत सुखच वाटते, तेव्हा कळते की 'अहाहा, हे कसे सुख!'

आत्म्यात परम सुखच आहे, परंतु कलुषित भावामुळे त्या सुखावर आवरण पडते. हे सुख कुठून येते? विषयातून? मानातून? क्रोधातून? लोभातून? या कशातून येत नसेल तर समजा की ही समकित स्थिती आहे.

जिथे किंचितही दु:ख होत नाही तिथे आत्मा आहे.

## मिथ्या दर्शनामुळेच दु:ख

संसारात दु:खाची उपासना केली आहे, म्हणून दु:ख आहे. वास्तवात दु:ख नाहीच.

या जगात सर्व काही आहे, पण दु:खे का उत्पन्न होतात? अदर्शनामुळेच. सम्यक् समज कशाला म्हणतात, दु:खातही सुख शोधणे, याला, सम्यक् समज म्हणतात.

ज्या दु:खाला आपण घाबरत नाही ते समोर येतच नाही, लुटारू येत नाही आणि देव देखील येत नाही!

भगवंत काय सांगतात की जर तुला मोक्ष हवा असेल तर 'ज्ञानी पुरुषा'कडे जा आणि संसारातील सुख हवे असेल तर आई–वडील आणि गुरुंची सेवा कर. आई–वडिलांच्या सेवेने तर अपार सुख प्राप्त होते.

लोकांनी ज्यात सुख मानले त्यातच आपणही सुख मानणे ही लोकसंज्ञा झाली. आणि आत्म्यातच सुख आहे असे मानणे ही ज्ञानींची संज्ञा आहे.

एक मनुष्य भगवंताला रोज प्रार्थना करतो की हे भगवंता! 'मला सुखी कर, सुखी कर.' दुसरा मनुष्य प्रार्थना करताना म्हणतो की, 'हे भगवंता! घरातील सर्व माणसे सुखी होवोत.' म्हणजे त्यात स्वत:ही आलाच. यात खरा सुखी दुसरा मनुष्य होतो. पहिल्याची विनंती निष्फळ होते. आणि आपण तर जगत् कल्याणाची भावना करतो, त्यात स्वत:चे आत्यंतिक कल्याण येतेच.

## दु:खे उपकारी होतात

**प्रश्नकर्ता :** कुंतीने दु:ख मागितले, सुख मागितले नाही, जेणे करून भगवंताची आठवण येईल. यातील रहस्य काय?

**दादाश्री :** असे आहे की, आपण घराचे दरवाजे नेहमी बंद ठेवतो. पण एकजण गेला की त्यानंतर दुसरा कोणी तरी दरवाजा ठोठावतो. तो गेला की तिसरा ठोठावतो. असे दिवसभर चालतच राहते. जर तीन तासापर्यंत कोणी ठोठावला नाही तर दरवाजा बंद करण्याचा काही उपयोग, पण इथे तर बंद केले की ठोठावतात, बंद केले की ठोठावतात, मग बंद करण्यापेक्षा दरवाजा उघडाच ठेवा ना! तसेच एका मागून एक दु:ख येतच राहते म्हणून दु:खाला म्हणावे, 'हे दरवाजे उघडे आहेत. तुला यायचे असेल तेव्हा ये आणि जायचे असेल तेव्हा जा!'

जितके संत झालेत ते सर्व कशाचे भोक्ता होते! ते दु:खभोक्ता होते. दु:ख आणि सुख हे विकल्प आहेत. म्हणून ते विकल्प बदलून टाकतात. म्हणजे दु:खाचे नाव सुख आणि सुखाचे नाव दु:ख ठेवतात. आणि मग दरवाजे उघडे ठेवतात, ज्याला यायचे असेल त्यांनी यावे.

## पुद्‌गल सुख : उधारीचा व्यवहार

पुद्‌गल सुखाची आशा सोडा. तो उधारीचा व्यवहार आहे. पुद्‌गल सुख 'फ्री ऑफ कॉस्ट' (मोफत) येत नाही, तर ते घेऊन परत करावे लागते. उधार घेऊन किती दिवस सुखी राहता येईल? उधार पैसे केव्हा घेतात? नाक कापले गेले असते तर. हे तर इकडून तिकडून उधार घेतलेले, ते आता परत करावे लागत आहे. परत करताना ते दुःखरूपात परत करावे लागते. शारीरिक, मानसिक किंवा वाचिक अशा कुठल्याही रूपात ते परत करावे लागेल.

मुलगा 'बाबा, बाबा' म्हणतो तर ते कडू वाटले पाहिजे. ते जर गोड वाटले तर ते उधारीचे सुख घेतले असे म्हणावे लागेल, नंतर ते दुःख रूपात परत करावे लागेल. मुलगा मोठा झाला की तो म्हणेल 'तुम्हाला अक्कल नाही.' तेव्हा तुम्हाला वाटेल हे असे कसे? पूर्वी तुम्ही जे उधार घेतले होते ते तो आता परत घेत आहे. म्हणून आधीपासूनच सावध व्हा. आम्ही तर सुख उधार घेण्याचा व्यवहारच सोडून दिला होता. अहाहा, स्वतःच्या आत्म्यात अनंत सुख आहे! ते सोडून या भयंकर घाणीत का पडावे?

घरचे किंवा बाहेरचे लोक कडू बोलतात ते सहन होत नाही, म्हणून आम्ही म्हणतो की वाणी ही 'रेकॉर्ड' आहे. या काळात 'रेकॉर्ड' वाकडी वाजते. समोरच्याची वाटेल तितकी, वाटेल तशी 'रेकॉर्ड' वाजली तरी आपण 'रेकॉर्ड' या स्वरूपातच ऐकत राहिलो आणि समोरचा कंटाळून गेला की समजावे आता खरे ज्ञान पचले आहे. कषायाने कषाय कधीच जिंकले जात नाहीत. कषाय समता भावानेच जिंकता येतात.

खाण्याची किंवा दुसऱ्या कुठल्या गोष्टीची भावनाच असता कामा नये. पौद्‌गलिक सुखाची कामना, अरे, त्याचा विचारसुद्धा यायला नको. कारण तो उधारीचा व्यवहार होईल आणि तो परवडणार नाही. परत मागितले तर देता येणार नाही. पुद्‌गल स्वतः वीतराग आहे. तुम्ही जेव्हा त्याला आणाल तेव्हापासून उधारीचा व्यवहार सुरू होतो.



## [ 14 ]
# खरी समज, धर्माची!

### धर्माचे स्थान

**प्रश्नकर्ता :** धर्म कुठल्या ठिकाणी आहे?

**दादाश्री :** धर्म दोन प्रकारचे आहेत. एक लौकिक धर्म आणि दुसरा अलौकिक धर्म. लौकिक धर्म सांसारिक सुखे देतो. मिथ्यात्व सहित ज्या-ज्या क्रिया केल्या जातात त्या सर्वांना लौकिक धर्म म्हटले जाते, त्याचे फळ संसार आहे. त्यामुळे भौतिक सुखे मिळतात, पण मोक्ष मिळत नाही. जेव्हा अलौकिक धर्मात येतो, म्हणजे जेव्हा मिथ्यादर्शन सुटते, तेव्हापासून मोक्षाचा मार्ग मोकळा झाला असे म्हणतात. मिथ्यादर्शन कसे सुटेल? 'ज्ञानी पुरुष' त्याला ज्ञानात समजावतात की हे सर्व 'रॉंग बिलिफस्' आहेत आणि ते 'रॉंग बिलिफस्' फ्रेक्चर करून टाकतात आणि 'राइट बिलिफ' त्याच्या मान्यतेमध्ये कायमसाठी बसवतात. अशी त्यांची कृपा झाली की सम्यक् दर्शन होते आणि सम्यक् दर्शन झाले की त्याबरोबरच सम्यक् ज्ञान होतच राहते आणि सम्यक् चारित्र्यसुद्धा येतच राहते.

### धर्म : त्यागात की भोगात

**प्रश्नकर्ता :** धर्म त्यागात आहे की भोगात?

**दादाश्री :** धर्म त्यागातही नाही आणि भोगातही नाही, दोन्ही

विपरीत मान्यता आहेत. त्याग करणारा नंतर परत ग्रहण करतो. आपल्यात म्हण आहे ना की 'त्यागे सो आगे?' अर्थात जितका त्याग कराल त्याच्या अनेक पटीने ते परत येईल आणि ग्रहण केले तर परत त्याला ग्रहणाच्या अडचणी येतील, त्यामुळे मग त्याला परत त्याग करण्याची भावना होईल. कारण जास्त ग्रहण केले की त्याचा कंटाळा येतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग त्याग करावा की करू नये?

**दादाश्री :** त्याग किती करावा? आपल्या डोक्यावर जेवढा बोजा उचलता येईल तेवढ्या बोज्याची गरज आहे, आणि त्यापेक्षा जास्त असेल त्याचा त्याग केला पाहिजे. त्याऐवजी लोक बोजा वाढवतच राहतात. आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत असेल तर गरजेपेक्षा जास्त असलेल्या मालाचा त्याग केला पाहिजे. आर्तध्यान किंवा रौद्रध्यान होऊ देत नाही, त्याला त्याग म्हणतात.

## ...तेव्हा धर्माने रक्षण केले का?

तुमचा खिसा कापला गेला आणि पाच हजार रुपये गेले तर तुम्हाला आत उपाधी, उपाधी होते. तुम्ही फौजदाराला सांगता, 'साहेब, पाहा या इथे कापला गेला, इथे कापला गेला.' कारण 'तुम्ही चंदुलाल आहात आणि माझा खिसा कापला गेला' असे मानता. आणि हे दुसरे भाऊ आहेत ते सरळ घरी येतात, कोणाला काही दाखवत नाहीत. कारण ते 'प्रवीण भाई'च नाहीत ना! आणि खिसाही त्यांचा नाही. म्हणून त्यांना कसलाच त्रास नाही ना! याचे नाव मुक्ती. संसार स्पर्शत नाही त्याचे नाव मुक्ती. पण तुम्हाला तर त्रास होतो ना?

**प्रश्नकर्ता :** एकदम, चारीबाजूंनी त्रास होतो.

**दादाश्री :** आयुष्यभर धर्म केला. अरे, अनंत जन्मात धर्म केला, पण धर्माशी तुमचे नाते जुळले नाही. नुसता खिसा कापला गेला तरी धर्म नाहीसा होतो. त्याला धर्मच म्हणता येणार नाही. प्रत्येक क्षणी हजर असतो त्याला धर्म म्हणतात. धर्म रक्षण करतो, शांती देतो, समाधी देतो. चिंता होऊ देत नाही. चिंता वाटली त्याला धर्म म्हणत नाहीत. कसली

चिंता करता? मुलगी मोठी झाली त्याची? अहो, मुलगी मोठी झाली तर ती शरीराने मोठी झाली, त्यात तुम्हाला काय एवढे? मुलगी मोठी होणार नाही का? हे रोपटेही मोठे होते, जसे वय वाढते तसे! यांना तर मुलगी जसजशी मोठी होते तशी काळजी वाटत राहते. आणि एका व्यक्तीची मुलगी मोठी होतच नव्हती, तर म्हणतो ठेंगणी आहे! म्हणून काळजी वाटते. असे हे काळजी करणारे लोक आहेत. आता यांना काय बोलायचे? काळजी, सतत फक्त काळजीच करत राहतात! जरा हुशार मुलगी असेल तर म्हणतील, 'दीड शहाणी' आहे, आणि जर कमी हुशार असेल तर म्हणतील, 'वेडी' आहे! चारीबाजूंनी, म्हणजे यांचा काही नेमच नाही ना!

कोणी तुमचा अपमान केला तर तुमचा धर्म बुडतो का?

**प्रश्नकर्ता :** हो, बुडतो.

**दादाश्री :** रोज देवाची पूजा करत असता, तरी पण जरासा कोणी अपमान केला की लगेच धर्म बुडतो का?

**प्रश्नकर्ता :** अहो, सेवा-पूजा करत असू, माळ जपत असू तरी पण कोणी अपमान केला तर त्याक्षणी धर्म बुडतो, साहेब!

**दादाश्री :** धर्म त्याला म्हणावे की जो धर्म होऊन परिणमित होतो. धर्म होऊन परिणमित होतो असे कधी म्हणावे, तर समोरचा शिव्या देतो त्याक्षणी धर्म आपल्या मदतीला येतो. तेव्हा हे लोक तर नुसती धावाधाव, धावाधाव करीत असतात. कितीतरी मंदिरे आणि जिनालयांच्या पायऱ्या घासल्या, संगमरवरी दगडही घासले गेले, पण काहीही कल्याण झाले नाही. धर्म (मदतीसाठी) हजर होत नसेल तर त्याला धर्म म्हणताच येणार नाही. मी तुमच्याकडे (मदतीसाठी) पाच वेळा चकरा मारल्या असतील तर तुम्ही माझ्या गरजेच्या वेळी हजर असता, आणि हे तर रोज धर्म पालन करतात पण गरजेच्यावेळी (धर्म) थांबतच नाही, सरळ पळून जातो, त्याला धर्म कसे म्हणावे? रोज पुस्तके वाचत असतात, ती इतकी वाचली की पूर्ण मेंदू पुस्तक स्वरूप होऊन

गेला! मेंदूच पुस्तक बनून गेला!! भगवंताने काय सांगितले होते की आत्म्याला जाण. त्याऐवजी सतत पुस्तकांनाच जाणत राहिले. त्याचा काय उपयोग? आयुष्यभर एवढे सर्व केले तरी पण आर्तध्यान आणि रौद्रध्यान होतच राहतात! आता काय कराल? खूप फसवणूक झाली आहे. आयुष्यभर क्रोध-मान-माया-लोभ यांनी लुटले, जवळ काही राहू दिले नाही. तर आता संकटाच्या वेळी काय कराल?

अनंत जन्मांपासून धर्म केला पण काही परिणाम झाला नाही आणि अधर्म वाढत गेला. जरासे कोणी डिवचले की, 'चंदुलालला अक्कल नाही.' तर लगेच भडका उडतो. सामायिक करताना किंवा माळ जपतानाही कुणी छेडले की लगेच भडका उडतो. उडतो की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो उडतो.

**दादाश्री :** असे का होत असते शेठ? समता राहत नाही ना? जर उपाधीत (अडचणीच्या वेळी) समता राहिली तर समजावे की मोक्षाचे बिगुल वाजले.

**प्रश्नकर्ता :** समता कशी राहील?

**दादाश्री :** कशी राहील, असे का विचारता? हे पाहा, यांना समता राहते की नाही? यांना विचारा तरी? उपाधीत समता राहिलीच पाहिजे, नाही तर त्याला धर्म कसे म्हणायचे? आतापर्यंत केले त्याला खरा धर्म म्हणताच येणार नाही. धर्म तर त्याचे नाव की कोणी अपमान केला, खिसा कापला गेला तरीही हजरच असतो. तुम्हाला तर धर्म मदत करीत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** म्हणजे तुम्ही धर्माशी 'सिन्सियर' राहिले नाहीत. या कलियुगात धर्माशी कोणी 'सिन्सियर' राहत नाहीत. भावाला 'सिन्सियर' राहत नाही, पत्नीला 'सिन्सियर' राहत नाहीत, मग धर्माशी 'सिन्सियर' कसे राहतील? लोक रोज चांदीची डबी घेऊन भगवंताच्या दर्शनाला

जातात. तेव्हा मी भगवंताला विचारले, 'भगवंत! एवढे सारे लोक रोज दर्शनाला येतात तरी तुम्ही त्यांच्यावर प्रसन्न का होत नाही?' त्यावर भगवंत म्हणाले, 'हे लोक रोज येऊन दर्शन तर करतात, पण त्यावेळी त्यांना त्यांच्या चपलांचीही आठवण येत असते, की कोणी घेऊन जाईल, घेऊन जाईल, अरे! त्यावेळी दुकानाची देखील आठवण करत असतात! आता सांगा, यात माझा काय दोष आहे? मी त्यांच्यावर कसा प्रसन्न होऊ?' मग लोक मला विचारतात की आम्ही दर्शन कसे घेतले पाहिजे? तेव्हा मी त्यांना समजावतो की दर्शन करताना तुम्ही चपलांना असे सांगावे की 'दादा भगवानां'च्या आज्ञेने तुम्हाला सांगतो की 'तुम्ही लवकरात लवकर निघून जा, आणि जायचे नसेल तर थांबा.' अशा प्रकारे दर्शन करावे. दर्शन करून आल्यावर पाहिले की चपला गेल्या तर समजावे की चपला दुसऱ्यांच्या झाल्या, आणि चपला असतील तर घाला. दोन्ही बिघडवू नये. पन्नास-शंभर रुपयांसाठी काय भगवंताशी (संबंध) बिघडवाल?

**प्रश्नकर्ता :** पण हे तर रोजचेच झाले ना?

**दादाश्री :** रोज चपला जातील असे नाही. ही तर तुम्हाला वाटणारी भीती आहे.

**प्रश्नकर्ता :** जातील असे आहे!

**दादाश्री :** जास्त विचार करतो त्याच्याच चपला जातात. माझ्याप्रमाणे जे विचार करीत नाहीत त्यांच्या चपला तिथेच पडलेल्या असतात! जातच नाहीत, नियम आहे, धर्म रक्षण करतो.

**प्रश्नकर्ता :** श्रद्धा ठेवली तर धर्म रक्षण करील?

**दादाश्री :** श्रद्धा कशी राहील? जिथे दानतच खोटी आहे तिथे श्रद्धा कशी राहील? दानत साफ हवी क्षत्रियांसारखी. भगवंत क्षत्रिय होते ना? साफ दानतवाले तर चपलांना म्हणतील, 'तुम्हाला जायचे तर जा, मी तर भगवंताचे दर्शन करायला चाललो आहे.' पण तुम्हाला हेही हवे असते आणि तेही हवे असते!

## जन्माच्या आधी आणि मृत्यूनंतर...

*''जन्म पहेला चालतो ने मुआ पछी चालशे*
*अटके ना कोई दी व्यवहार रे,*
*सापेक्ष संसार रे...''* *- नवनीत*

तुम्हाला आता काय करायचे बाकी राहिले आहे? जन्मापूर्वी देखील (संसार) चालत होता आणि मृत्यूनंतरही चालत राहील. हे तर उगाचच थांबून राहिले आहेत, असे समजून की मला संसार चालवायचा आहे! असे आहे, की हा संसार चालतच राहतो आणि चालतच राहील. तुम्ही आपले खा-प्या आणि झोपा. आरामात जुहूला फिरून या. असे हाय-हाय का करता! इथे तर संपूर्ण दिवस काम काम, हाय-हाय करत राहतात, जणू कधीही चितेत जावे लागणार नाही, असे मानून करत राहतात. हो, जर पाचशे, हजार वर्षांनंतर मरायचे असेल तर आपण समजू की करू दे 'हाय-हाय!' बिचाऱ्याला अजून हजार वर्षे काढायची आहेत!' इथे तर ठावठिकाणा नाही की कधी मरण येईल, कधी (हार्ट) 'फेल' होईल, ते सांगता येत नाही! शाळेत सर्व पास होतात पण इथे मात्र फेल होतात!

## खऱ्या धर्माची समज

रोज-रोज धर्माचे करत असतात, पण संपूर्ण दिवस हाय-हाय, हाय-हाय करत राहतात! भगवंतांनी सांगितले आहे की धर्म त्याचे नाव की जो धर्म होऊन परिणमित होतो. एवढेच जर सर्व भक्तांना समजले, तर लगेच विचारात पडतील की अरे, धर्म करूनही काही परिणाम तर दिसत नाही. शंभर मण साबण घातला तरी कपडे तसेच्या तसेच. मग साबण चुकीचा आहे की साबण लावणारा चुकतो आहे, की कपडे चुकीचे आहेत? आर्तध्यान आणि रौद्रध्यान पूर्वीसारखेच होत असतील तर असे समजायला नको का काही तरी चुकते आहे?

आर्तध्यान आणि रौद्रध्यान समजते ना तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** नाही, समजत नाही, जरा समजावता का?

**दादाश्री :** रात्री अकरा वाजता पाच जण तुमच्या घरी पाहुणे म्हणून आले तर त्यावेळी तुम्हाला आत काही होते का?

**प्रश्नकर्ता :** ते तर येणारे कोण आहेत त्यावर अवलंबून आहे. आवडते पाहुणे असतील तर काही वाटणार नाही आणि नावडते पाहुणे आले तर मनात येते की हे आता कशाला इथे आलेत?

**दादाश्री :** आवडते पाहुणे पाहिल्यावर आनंद होतो ते देखील आर्तध्यान आणि नावडते पाहुणे पाहिल्यावर आत 'हे कशाला आले' असे वाटते, तेही आर्तध्यान आहे. पाहुणे आले की - वैताग येतो, पण तरी तोंडाने तर म्हणतो 'या, या!' कारण अब्रू जाईल ना! असा हा अब्रूदार, पुढचा जन्म बिघडवून अब्रू ठेवतो. त्यापेक्षा तोंडावरच सांग ना 'कशाला आला आहात?' ज्यामुळे आताचा आणि पुढचा दोन्ही जन्म बिघडणार नाहीत. हो, तोंडावर 'या, या' म्हणतो आणि हळूच पत्नीला विचारतो, तुला काय सांगत होते? कधी जाणार म्हणाले? बॅगा तर मोठमोठ्या आणल्या आहेत.' त्यावर पत्नी म्हणते, 'मला काय माहीत? मित्र तर तुमचे आहेत ना. मला काय करायचे आहे?' इथे पत्नी पतीला सांभाळून घेत नाही. 'अरे, ते आत्ताच तर आले आहेत. कधी जाणार, कधी जाणार असे तू का करतोस? थोडे दिवस, दहा-पंधरा दिवस राहू तर दे!' आता हे दुःख कधी संपेल? धर्माचा परिणाम कसा येईल? अकरा लोक आले तरी धर्म शांतपणे म्हणेल, 'या, या, स्वागत आहे' बस, आणखी काही भानगड नाही. मनोभाव पण बिघडणार नाहीत. मनोभाव बिघडले तर पाहुण्यांना चेहेऱ्यावरूनच कळेल. याला आर्तध्यान म्हणतात. आर्तध्यानाचे फळ तिर्यंचगती आहे.

रौद्रध्यान म्हणजे काय? कोणी अपमान केला तर लगेच रागाने पेटून उठतो. 'चंदुलालला अक्कल नाही' असे कोणी म्हटले की लगेच हा अकलेचा कांदा चिडून उठतो! याला रौद्रध्यान म्हणतात. राग आला की त्याला रौद्रध्यान म्हणतात. रौद्रध्यानाचे फळ नरकगती आहे. बोला, भगवंत न्यायाने बोलले आहेत की अन्यायाने? भगवंत अन्यायाने बोलणारच नाहीत ना? वीतराग भगवंत कधीच अन्याय करीत नाहीत!

आता हा अपमान किंवा नुकसान सहन का होत नाही? कारण 'धर्म समजून घेतला नाही, धर्म ऐकला नाही, धर्मावर श्रद्धा ठेवली नाही.' अजून धर्म ऐकलेलेही नाही. धर्म ऐकले असेल आणि धर्मावर श्रद्धा बसली असेल तर अशावेळी धर्म मदत करतो. इथे तर धर्म थांबतही नाही ना? फक्त तुमच्याच बाबतीत असे होते असे नाही. खरा धर्म तर त्याला म्हणतात की जो सर्व दु:खातून मुक्त करतो. दु:ख वाढवतो त्याला धर्म म्हणायचेच कसे?

## मोक्षाचा मार्ग तर...

मोक्षाचा मार्ग एकच आहे, मोक्षाचे दोन मार्ग नाहीत. जेव्हा पाहाल तेव्हा मोक्षाचा एकच मार्ग असतो. ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि तप – हे मोक्षाचे चार स्तंभ आहेत. कधीही पाहिले तर तेच असतात पण त्यासाठी मार्ग वेगवेगळे असतात. एक क्रमिक मार्ग असतो ज्यात जप-तप करून पुढे जायचे असते. जिना चढून जायचे असते. आणि दुसरा अक्रम मार्ग आहे, ज्यात जिना चढावा लागत नाही, 'लिफ्ट'ने जायचे असते. योग्य वाटेल त्या मार्गाने जावे. तुम्हाला 'लिफ्ट'ने जायचे आहे की जिना चढून?

**प्रश्नकर्ता :** तसे तर 'लिफ्ट'ने जाणेच सरळ आणि सोपे होईल ना?

**दादाश्री :** तर मग आमच्याकडे या, एका तासातच तुम्हाला रोख देऊ. मग काळजी मिटेल, उपाधी (बाहेरून येणारे दु:ख) राहणार नाही आणि समाधी अवस्था राहील! तेव्हा आपण समजू की आता मोक्षाला जाण्याची तयारी झाली आहे. मुलींची लग्ने करा, मुलांची लग्ने करा, काही हरकत नाही. फक्त आमच्या आज्ञेत राहायचे. राहाल ना आमच्या आज्ञेत?

**प्रश्नकर्ता :** का नाही? मला तर हेच हवे आहे. भौतिक सुख तर क्षणिक आहे.

**दादाश्री :** अनंत जन्मांपासून या क्षणिक सुखातच गुंतून पडला

आहात. करोडो जन्मांपासून तुम्ही असेच होता आणि आजही तसेच आहात, उलट जास्तच बिघडले आहात. जोपर्यंत आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत आहेत तोपर्यंत त्यांना भगवंताचे खरे भक्त म्हणता येणार नाही. हे लोक सरळ–साधे वाटतात, पण डिवचल्यावर लगेच फणा काढतात. त्यांना खरे भक्त म्हणत नाहीत. भगवंताच्या मूर्तीचे दर्शन केले, पण आत बसलेल्या भगवंताला ओळखले नाही. अनंत जन्मांपासून मूर्तीलाच नमस्कार करत आले ना? भगवंताला ओळखलेच नाही ना? लोक औपचारिकपणे भगवंताचे दर्शन करतात आणि जेवताना मात्र चावून चावून पाहतात की आत जायफळ घातले आहे की नाही! वेलची आहे की नाही! हे तर उलट बिघडत चालले आहे. मग आता मोक्षाला कधी जाल शेठ?

**प्रश्नकर्ता :** आता त्याचा इलाज आपणच सांगा.

**दादाश्री :** इलाज हवा तर 'ज्ञानी पुरुषांकडे' मागणी करा की 'साहेब माझी मुक्ती करा.' पण तुम्ही तर काही बोलतच नाही ना! तुम्हाला मुक्तीची इच्छाच नाही ना! मागणी तर करावी लागेल ना? आपण जवाहिऱ्याच्या दुकानात गेलो आणि नुसते बघत बसलो, काही बोललो नाही, तर दुकानदाराला कसे समजेल की आपल्याला काय पाहिजे आहे? म्हणून मोक्ष, दिव्यचक्षू जे जे काही पाहिजे असेल त्या सर्वांचे टेंडर भरून आणा. आम्ही एका तासातच सर्व काही देऊ.

## स्वभावभाव तोच स्वधर्म

**प्रश्नकर्ता :** धर्म कशाला म्हणायचे? हेच समजून घ्यायचे आहे.

**दादाश्री :** जो आपल्याला धरून ठेवतो, आपल्याला पडू देत नाही, त्याला धर्म म्हणतात. आता तर तुम्ही पडत आहात, पण ते तुमच्या लक्षातही येत नाही. ह्या कलियुगातील सर्व माणसे खाली घसरत आहेत, हळूहळू अधोगतीला जात आहेत.

धर्माचा एकच अर्थ नाही. धर्म किती प्रकारचे आहेत? एक डिग्रीपासून तीनशे साठ डिग्रीपर्यंतचे धर्म आहेत. प्रत्येक व्यक्तीच्या

वेगवेळ्या दृष्टीकोनाचे वेगवेगळे धर्म आहेत, म्हणून मतभेद आहेत. आपल्या देशात जे धर्म चालतात, ते धर्म काय करतात, तर वाईट कर्मे सोडायला लावतात आणि चांगली कर्मे करायला लावतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्यालाच धर्म म्हणतात का?

**दादाश्री :** नाही. त्याला खरा धर्म म्हणत नाहीत. सोन्याचा धर्म काय आहे? त्याला गंज लागतो का? स्वत:च्या स्वभावात राहिला तर त्याला धर्म म्हणतात. तुम्ही आत्मा आहात तर आत्मास्वरूपात राहा, तरच त्याला धर्म म्हणता येईल. आणि हा तर देहाध्यास आहे. वाईट कर्मे सोडायला लावणे आणि चांगली कर्मे करायला लावणे, ही तर भ्रांती आहे. चांगली कर्मे ही भ्रांती आहे आणि वाईट कर्मे देखील भ्रांतीच आहे, पण म्हणून काय मी चांगली कर्मे करणे सोडून द्यायला सांगत नाही. वाईटातून चांगल्याकडे वळणे ही चांगली गोष्ट आहे, पण तरीही त्यामुळे भ्रांती जात नाही. भ्रांती गेल्यानंतर खऱ्या धर्माची सुरुवात होते.

वस्तू आपल्या स्वभावात परिणमित होते, तो धर्म! म्हणजे तुम्ही आत्मा आहात. तुमचा स्वभाव काय? तर निरंतर परमानंद. परमानंदात राहिलात तर बाहेरील गोष्टींचा तुमच्यावर परिणाम होणार नाही. तोच धर्म आहे, आणि तोच मोक्षाला नेतो– मुक्ती देतो.



## [ 15 ]
# आचरणात धर्म

### धर्म आणि आचरण

**प्रश्नकर्ता :** धर्माचे आचरण होत नाही, दादा.

**दादाश्री :** भगवंताला आचरणाची किंमत नाही, हेतूची किंमत आहे. आचरणाला भगवंताने 'नो कर्म' म्हटले आहे. ते कर्म नाहीच्या बरोबर आहे. हेतू सहित आचरण असेल तर त्याची गोष्टच वेगळी आहे! एकच पैसा दिला का असेना, पण मनापासून दिला असेल तर त्याला धर्म म्हणतात. जो आपल्याला स्थैर्य देतो तो धर्म! 'ज्ञानी पुरुष' स्थैर्य प्राप्त केलेले असतात, म्हणून जो कोणी त्यांच्याबरोबर दोरी बांधून घेईल त्याची नौका स्थिर राहते.

### मनुष्यत्वाची सार्थकता

**प्रश्नकर्ता :** हा मनुष्य जन्म वाया जाऊ नये, त्यासाठी काय केले पाहिजे ?

**दादाश्री :** 'हा मनुष्य जन्म वाया जाऊ नये' असे सतत चिंतन केले तर त्यात यश मिळेल. या मनुष्यजन्माचे चिंतन केले पाहिजे, त्याऐवजी लोक लक्ष्मीचे चिंतन करतात. प्रयत्न करणे तुमच्या हाती नाही, पण भाव करणे तुमच्या हातात आहे. प्रयत्न करणे परसत्तेत आहे. भाव केल्याने फळ मिळते. खरे तर, भाव करणे सुद्धा परसत्तेतच आहे, पण तरी भाव केला तर त्याचे फळ मिळते.

## जिथे क्लेश, तिथे धर्म नाही!

क्लेश म्हणजे भयंकर संसार रोग. ज्यामुळे क्लेश उत्पन्न होणे थांबते त्याला धर्म म्हणतात. संसारात खाणे-पिणे करण्यास काही हरकत नाही, पण त्यातून जे क्लेश उत्पन्न होतात, ते व्हायला नकोत. भगवंत म्हणतात की मोक्ष मिळाला नाही तरी चालेल पण क्लेश नसतील तर संसारात राहण्यात अर्थ आहे. क्लेश तर भयंकर रोग आहे, टी.बी.पेक्षाही भयंकर. क्लेश मिटले नाहीत तर तुला धर्म कळलाच नाही, असे भगवंतांनी म्हटलेले. क्लेश असतील तर जनावर गती प्राप्त होते. म्हणून दोन गोष्टी शिकल्या पाहिजेत. क्लेश होत नसतील तर संसारात राहावे, अन्यथा मोक्षाचा मार्ग शोधावा. जिथे थोडा देखील क्लेश आहे तिथे धर्म नाही आणि जिथे धर्म आहे तिथे क्लेश नाही. क्लेश याचा अर्थ मानसिक रोग. त्याच्यामुळे तर पुढचा जन्म बिघडतो. देहाला रोग झाला तर पुढचा जन्म बिघडत नाही. तरी पण आपण त्यावर इलाज करतो. तर मग क्लेश रूपी रोगावर इलाज शोधायला नको का? ते तर लगेच शोधून काढले पाहिजे, की कशामुळे क्लेश झाला!

## अक्रम विज्ञान : नवाच उपक्रम

संपूर्ण संसार गैरसमजुतीमुळे निर्माण झाला आहे. मी जर लोकांना सांगितले की, 'दया राखा, शांती राखा, खरे बोला.' तर लोक मला म्हणतील, 'तुम्हीच दया राखा, आम्हाला जमणार नाही.' हजारो वर्षांपासून शास्त्रेसुद्धा हेच सांगत आली की 'खरे बोला, दया राखा, शांती राखा, क्रोध करू नका.' त्यावर लोक म्हणतात, 'आम्हाला लाख खरे बोलायचे आहे पण खरे बोललेच जात नाही, लाख क्रोध करायचा नाही पण क्रोध होऊनच जातो. म्हणून तुमची शास्त्रे कामाची नाहीत.' असे म्हणून लोकांनी पुराणांना-शास्त्रांना अडगळीत टाकून दिले आहे. आम्ही जगाला नवीनच 'सायन्स' देऊ इच्छितो. दया करणे, शांती राखणे, खरे बोलणे, हे सर्व 'इफेक्ट्स' (परिणाम) आहेत. लोकांना 'इफेक्ट्स'चे ज्ञान आहे, पण कोणाकडेही 'कॉजेस्'चे (कारणांचे) ज्ञानच नाही, तर अज्ञान आहे. आम्ही कॉजेस्चे स्पष्टीकरण देऊ इच्छितो. 'ओपन टु स्काय' करेल ते

ज्ञान. ज्ञान तर क्रियाकारी असले पाहिजे. ज्ञान अनुभवजन्य असेल तरच क्रियाकारी होईल. नाही तर पुस्तकी ज्ञानाने तर आपण भरकटलेले आहोतच. 'रिलेटिव्ह' धर्म कसा असला पाहिजे की जो परिणाम घडवून आणेल.

सर्व धर्मांमध्ये नैसर्गिकपणे बदल होणार आहे, आणि हा 'अक्रम मार्ग' तर असा काही सरळ मार्ग काढेल की धर्म सर्वांना अगदी सोपा वाटेल आणि लगेच त्याचे फळ मिळेल. धर्म कशाला म्हणतात? जो परिणमित होतो तो धर्म, जसे आपण खीर खाल्ली की आपली भूक मिटते, तसेच आम्ही 'स्वरूप ज्ञान' देतो त्यामुळे कधीही, कोणत्याही काळी, कोणत्याही जन्मात झाली नाही, अशी अंतरशाता होते. बाहेर कितीही अशाता असो, पण अंतरशाता निरंतर राहते. जगात बाह्य शाता असते, पण अंतरशाता कुणालाच नसते.

आपले सायन्स काय म्हणते की तू चोरी करतोस किंवा तुझ्याकडून खोटे बोलले जाते, त्याला आमची हरकत नाही, पण तू त्याचे 'अशा प्रकारे' प्रतिक्रमण कर. आम्ही चोराला असे सांगत नाही की तू चोरी करू नकोस. आम्ही त्याला सांगतो की तू चोरी करतोस त्याचे फळ हे आहे, म्हणून हे समजून घे. चोरी करतो, खोटे बोलतो, रागावतो, हे सर्व तो अनिवार्यपणे करत असतो. त्यात आम्ही जर त्याला खडसावले की असे का करतोस, तर तो जास्तच करेल, आणि मनात ठरवूनच टाकेल की 'चोरी तर करणारच, तू कोण मला विचारणारा?' म्हणून प्रेमाने समजवावे, प्रेमाने सर्व रोग बरे होतात. शुद्ध प्रेम 'ज्ञानी पुरुषां'कडून किंवा त्यांच्या 'फॉलोअर्स'कडूनच मिळेल.

क्रोधासमोर क्षमा, कपटासमोर ऋजुता, मानासमोर मृदुता यांची आवश्यकता आहे. क्रोध आला तर येऊ दे. मान झाला, लोभ वाटला तर वाटू दे, पण त्याचे प्रतिक्रमण करून त्याला बदलून टाक. त्यामुळे सर्वात मोठे धर्मध्यान होते. कुचारित्र्याचे विचार आले तरी हरकत नाही, त्यांना घाबरू नकोस, पण त्याचे प्रतिक्रमण कर. हा लिफ्टमार्ग आहे. यात खूप वेगाने पुढे जाता येते. धर्मध्यानात आल्यावर व्यवहार समकित

झाल्याची चिन्हे दिसू लागतात. कुचारित्र्याचे विचार आले तर त्यांना म्हणावे, 'या, चहा घ्या, तुम्ही आलात! आता 'ज्ञानी पुरुष' सांगतात त्याप्रमाणे मी करीन.' याला चौथ्या दर्जाचे धर्मध्यान म्हणतात.

## आज्ञा हाच धर्म!

मग कुठला धर्म पाळायचा? 'ज्ञानी पुरुषां'ची आज्ञा पाळणे हाच, आणि धर्म कुठला? तर स्वत:च्या स्वरूपात रममाण होणे हा धर्म. लौकिक धर्म अर्थात भगवंतांच्या आज्ञेत राहणे हा धर्म.

'ज्ञानी पुरुषां'ना प्रसन्न ठेवणे यासारखा उत्तम दुसरा कोणता धर्म दुनियेत नाही आणि आमचा *राजीपा* (गुरुजनांची प्रसन्नता) तुमच्याच हातात आहे. तुम्ही जसजसे आमच्या आज्ञेत राहून उंच उंच जाल तसतसा तुमच्यावरील आमचा *राजीपा* वाढत जाईल. भगवंताने म्हटले आहे की 'ज्ञानीं'ना प्रसन्न करण्यास त्यांच्या सर्व इच्छांची प्रशंसा करणे शिकलात तरीसुद्धा मोक्ष मिळेल! आमची एकच आज्ञा पाळली, तर ती आज्ञाच तुम्हाला थेट मोक्षापर्यंत पोहोचवेल, असे आहे.

## ज्ञानानुसार प्रवर्तन

एका शिंप्याला कुठून तरी असे ज्ञान फीट झाले होते की उंदराला पिंजऱ्यात पकडून बाहेर सोडले तर कावळ्याला भोजन मिळेल, दुसऱ्याचा फायदा होईल. आता या अशा ज्ञानामुळे उंदीर मारणे त्याच्या वाट्याला येते. आम्ही त्याचे हे ज्ञान बदलले, आणि श्रद्धापूर्वक त्याला ते फीट झाले की उंदीर मारणे नुकसानकारक आहे, त्यानंतर हे ज्ञान त्याच्या क्रियेत येत जाते. ज्ञानाने श्रद्धा बदलली गेली पाहिजे, समजपूर्वक बदलली गेली पाहिजे, मग आम्हाला चारित्र्य पाहायची गरज नाही. कारण जोपर्यंत पूर्वीचा 'इफेक्ट' आहे तोपर्यंत चारित्र्य बदलणार नाही. आता तो जेव्हा उंदीर मारायला जाईल तेव्हा त्याला वाटेल की मारता कामा नये. तरी पण तो पूर्वीच्या 'इफेक्ट'मुळे मारून टाकेल, पण त्याला आतून वाटत राहील की हे चुकीचे होत आहे. तरी पण हे ज्ञान शुभाशुभाचे झाले. शुद्ध ज्ञानात तर असे काहीच नसते. क्रियेत येवो अथवा न येवो पण

ज्ञान डगमगता कामा नये. श्रद्धापूर्वक ज्ञान 'एक्झॅक्ट' राहिले पाहिजे. खरे ज्ञान जाणण्याचीच गरज आहे, आणि मग त्या ज्ञानावरील श्रद्धा डगमगता कामा नये. मग क्रिया कुठल्याही होवोत, त्या लक्षात घेतल्या जात नाहीत.

**प्रश्नकर्ता :** वचनबळ असल्यामुळे 'एक्झॅकटली' राहते ना?

**दादाश्री :** वचनबळामुळे क्रियेत फेरफार होतो. वचनबळामुळे तो चुकीचे करणे थांबतो.

## सरळ गोष्टींसाठी शक्ती मागावी लागते

अज्ञानावर श्रद्धा बसली असेल तर ती क्रिया फार जास्त काळ चालते आणि थोडी श्रद्धा असेल तर ती क्रिया वेगाने नाहिशी होते. थोडे अज्ञान असेल तर ते लवकर निघून जाते. अज्ञानाचे ज्ञान जाणण्यात पुद्‌गल शक्ती खर्च होतात आणि ज्ञानाचे ज्ञान जाणण्यासाठी प्रार्थना करावी लागते की मला या शक्ती द्या. अज्ञानाचे ज्ञान जाणण्यासाठी तर पुद्‌गल शक्ती सहजच मिळत राहतात. पण ज्ञानासाठी अशा शक्ती मिळत नाहीत. असत्य, चोरी, अब्रह्मचर्य, यासाठी पुद्‌गल शक्ती सहजतेने मिळत राहतात आणि त्याविरुद्ध सत्य, ब्रह्मचर्यासाठी शक्ती मागाव्या लागतात. हे ज्ञान-दर्शनाद्वारे जाणून, श्रद्धेने शक्ती मागितल्या तर त्या मिळतात. अज्ञान खाली पाडणारे आहे आणि त्यात पुद्‌गल शक्ती मिळतच राहतात. पण ज्ञान उंच घेऊन जाणारे आहे, ते पुद्‌गल विरोधी असल्यामुळे शक्ती मागाव्या लागतात, तेव्हाच उंच जाता येते.

## प्रार्थनेमुळे शक्ती मिळतात!

**प्रश्नकर्ता :** उंच जाण्यासाठी शक्ती कशा मागाव्या, आणि कुणाकडे मागाव्या?

**दादाश्री :** स्वतःच्या शुद्धात्म्याकडे, 'ज्ञानी पुरुषां'कडे शक्ती मागू शकता, आणि ज्यांना स्वरूपज्ञान झालेले नाही त्यांनी स्वतःचे गुरु, मूर्ती, देव ज्यांना मानत असतील त्यांच्याकडे शक्ती मागाव्या. स्वतःमध्ये जे जे चुकीचे दिसेल त्याची यादी बनवावी आणि ते सुधारण्यासाठी शक्ती

मागाव्यात. श्रद्धेने, ज्ञानाने, जे जे चुकीचे आहे ते ठरवा की हे चुकीचेच आहे, मग त्याचे प्रतिक्रमण करा, 'ज्ञानीं'कडे शक्ती मागा की असे होता कामा नये, म्हणजे त्या चुका जातील. मोठ्या गाठी असतील तर सामायिकमध्ये त्यांचा विलय होऊन जाईल, आणि इतर छोटे-छोटे दोष तर प्रार्थनेमुळे नष्ट होतील. प्रार्थनेविना जे उत्पन्न झाले आहे ते प्रार्थनेमुळे नष्ट होते. हे सर्व अज्ञानातून उत्पन्न झाले आहे, पौद्‌गलिक शक्ती प्रार्थनेमुळे नष्ट होतात. घसरून पडणे सोपे आहे आणि वर चढणे कठीण आहे. कारण घसरण्यात पौद्‌गलिक शक्ती असतात.

**प्रश्नकर्ता :** प्रार्थना म्हणजे काय?

**दादाश्री :** प्र + अर्थना = प्रार्थना. प्र अर्थात विशेष अर्थाची मागणी करणे, भगवंतांकडे आणखी विशेष अर्थाची मागणी करणे.

**प्रश्नकर्ता :** जगातील लोक प्रार्थना करतात त्याचे फळ तर मिळते ना?

**दादाश्री :** प्रार्थना खरी असली पाहिजे, खरी प्रार्थना करणारा कोणी एखादाच असतो.

**प्रश्नकर्ता :** शंभरात एखादा असेल ना?

**दादाश्री :** हो असतो, एखादा शुद्ध हृदयाचा असेल त्याची प्रार्थना खरी असते! पण प्रार्थना करताना चित्त भलतीकडेच असेल तर तिला खरी प्रार्थना म्हणत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** प्रार्थना करावी तर कोणासाठी आणि कशासाठी?

**दादाश्री :** प्रार्थना म्हणजे स्वत:च स्वत:चा शोध घेतो. परमात्मा स्वत:च्या आत बसला आहे पण त्याची ओळख नसल्यामुळे मंदिरात किंवा जिनालयात जाऊन दर्शन करतात, ते परोक्ष दर्शन आहे.

## प्रार्थना : सत्याचा आग्रह

**प्रश्नकर्ता :** एक व्यक्ती केवळ सत्याच्याच मार्गाने चालते आणि दुसरी व्यक्ती तशी प्रार्थना करते, तर दोघांमध्ये खरा कोण? दोघांमधील कोणाला परमात्मा आधी प्राप्त होईल?

**दादाश्री :** जो प्रार्थना करतो त्याला.

**प्रश्नकर्ता :** 'सत्यच ईश्वर आहे' असे म्हटले जाते ना?

**दादाश्री :** हे सत्य ईश्वर नाही. हे सत्य तर बदलत जाणारे आहे. हे तुम्ही जे समजतात की 'मी चंदुभाई आहे' ते तर चुकीचेच आहे ना? हे सत्य विनाशी आहे, हे खरे सत् नाही. खरे सत् तर जे अविनाशी आहे, तेच सत् आहे, तेच सत्-चित्त आनंद स्वरूप आहे.

या जगाचे सत्य कसे आहे? तुम्ही असे म्हणाल की, 'या व्यक्तीला मी पैसे दिलेत, तो लुच्चा आहे, परत देत नाही.' तर दुसरी व्यक्ती तुम्हाला म्हणेल की, 'कटकट कशाला करता? घरी जाऊन, खाऊन-पिऊन, झोपून जा ना शांतपणे, भांडण कशाला करता?' तुम्ही त्याला म्हणाल की, 'कटकट केली पाहिजे, माझे खरे आहे.' तर तुम्ही सर्वात मोठे गुन्हेगार आहात. सत्य कसे असले पाहिजे? तर साधारण असले पाहिजे. सत्यात प्रामाणिकपणा असला पाहिजे. त्यात कुणाशी दगा-फटका होत नाही, लबाडी होत नाही, चोरी होत नाही. फक्त नैतिकताच हवी, आणखी कशाची गरजच नाही. जे या सत्याचे शेपूट धरून बसलेले, ते शेवटी समुद्रात बुडाले!

सत्याचा आग्रह करणे पॉइजन (विष) आहे, आणि असत्याचा आग्रह करणे देखील पॉइजन आहे.

**प्रश्नकर्ता :** आपण जसे सत्याचे विभाग बनविता, तसे प्रार्थनेचेही विभाग असतात ना? प्रार्थना दांभिक असते ना?

**दादाश्री :** प्रार्थना अगदी खरी असली पाहिजे, नुसती थापेबाजी चालणार नाही. पोपट आयाराम-गयाराम बोलतो, राम-राम बोलतो, ते समजून बोलतो की न समजता? त्या प्रमाणेच या प्रार्थना समजून, विचारपूर्वक, हृदयावर परिणाम करणाऱ्या असल्या पाहिजेत.



## [ 16 ]
# रिलेटिव्ह धर्म : विज्ञान

### रिलेटिव्ह धर्म, डेव्हलप होण्यासाठी

'रिलेटिव्ह' धर्म हा स्वाभाविक धर्म नाही, पण 'रियल' धर्म हा स्वाभाविक धर्म आहे, तो स्वाभाविक सुख उत्पन्न करतो. जेव्हा 'स्वत: कोण आहे' हे जाणेल, 'हे सर्व कोण चालवितो' हे जाणेल, तेव्हा मोह नष्ट होईल. नाही तर 'ही' माझी बहीण आहे किंवा मावशी आहे असे वाटते, मावशी वरील मोह पण जात नाही ना! आपण भाजले असू तर लोक चौकशी करतील पण कोणाला काही आपुलकी नसते.

जगातील सर्व 'रिलेटिव्ह' धर्म विरोधाभासवाले आहेत. 'रिलेटिव्ह' धर्म असा आहे की, हे धोतर स्वच्छ करायचे असेल तर त्याला साबणाने धुवावे लागते, पण मग साबण आपला मळ त्यावर सोडत जातो. साबणाचा मळ काढण्यासाठी टिनोपॉल घातला तर परत टिनोपॉलही आपला मळ सोडत जातो. तसेच हे लौकिक गुरु तुमच्यातील मळ काढतात आणि स्वत:तील मळ तुमच्यात सोडत जातात! सर्व 'रिलेटिव्ह' धर्म मळाने मळ काढण्याचे काम करतात!

वीतरागी ज्ञान ऐकले नाही, जाणले नाही, आणि श्रद्धा ठेवली नाही. जर तसे झाले असते तर कामच झाले असते! 'वीतरागी ज्ञान' 'वीतरागी पुरुषां'शिवाय मिळणार नाही. परोक्ष भक्तीमुळे संसार उभा

राहतो, पुण्य मिळते. त्यामुळे संसार गोड वाटतो आणि संसारात अधिकाधिक खोल उतरत जातो, त्यापेक्षा तर कडू असलेले बरे.

जे 'रिलेटिव्ह' धर्म चालले आहेत ते सांगतात की चांगले काम कर. जरी अहंकाराने केले, तरी त्याचे फळ चांगले मिळेल, पुण्य मिळेल. बाजरी पेरली असेल तर बाजरी मिळेल आणि गवत पेरले असेल तर गवत मिळेल. म्हणून तुला जे अनुकूल असेल ते पेर. वाईट विचार उपटून फेकून द्यायला हवेत. पण लोक काय करतात की चांगले बीज पेरतात आणि बोरीचेही बीज पेरतात. म्हणून तर ही सर्व बोराची झाडे उगवली आहेत! 'रिलेटिव्ह' सर्व मिक्स्चर आहे आणि 'रियल' स्वतंत्र आहे. ज्यात बदल होतो ते 'रिलेटिव्ह' आहे, 'रिलेटिव्ह' म्हणजे ज्यात भेसळ झाली आहे ते, आणि 'रियल' म्हणजे शुद्ध! 'रिलेटिव्ह'च्या कितीही 'स्लाइस' (फोडी) केल्या तरी त्यात एक तरी 'रियल'ची 'स्लाइस' मिळेल का? वीतराग पुरुषांनी सांगितले आहे की तुम्ही आता जे करत आहात त्यापुढे तर अजून खूप काही आहे. पण तरी हे सर्व मार्ग आहेत, असे करत करत पुढे जाता येईल, प्रत्येक धर्मवाले आपल्या धर्माला शेवटचे स्टेशन समजतात, पण ते त्याच्यासाठी ठीक आहे, असे मानले तरच 'डेव्हलप' होत राहील.

## मोक्षासाठी वीतराग धर्मच

ज्ञान तर अपार आहे, पण वीतरागींनी जे ज्ञान जिंकले (प्राप्त केले) आहे, त्याच्यापुढे कोणतेही ज्ञान नाही. कुठेही 'हरत' नाहीत, तेच वीतराग! कदाचित देह हरेल, मन हरेल, वाणी हरेल पण ते स्वत: हरत नाहीत. वीतराग किती समंजस असतात! वीतरागांचा धर्म तर सैद्धांतिक आहे, म्हणजे 'कॅश' (रोख) फळ मिळते! मोक्षरूपी 'कॅश' फळ मिळते! जे मोक्षदाता भगवंत आहेत, ते निष्पक्षपाती आहेत. आत जे वीतराग भगवंत आहेत, ते निष्पक्षपाती आहेत. वीतराग धर्म कशाला म्हणतात? तर जो 360 डिग्रीचा धर्म आहे, संपूर्ण धर्म आहे. खरा धर्म, रहस्यपूर्ण धर्म निष्पक्षपाती असतो. पक्षपात चुकीचा नाही, तो 'स्टँडर्ड'मध्ये ठेवतो आणि 'आउट ऑफ स्टँडर्ड'मध्ये निष्पक्षपात आहे. 'हे' तर 'सायन्स'

आहे, धर्म नाही. हिंदू धर्म, जैन धर्म, ख्रिश्चन धर्म हे सगळे धर्म आहेत. 'सायन्स' एकच असते आणि धर्म वेगवेगळे असतात.

## रिलेटिव्ह धर्माच्या मर्यादा

जगातील धर्म 'रिलेटिव्ह धर्म' आहेत, त्यांची मदत 'रिलेटिव्ह'मध्ये होते, 'रियल'कडे वळण्यात मदत करतात.

**प्रश्नकर्ता :** दादा, आपण ज्याला रिलेटिव्ह म्हणता त्याची मर्यादा काय?

**दादाश्री :** पाच इंद्रियांनी जे अनुभवास येते, जे होते, ते सर्वच रिलेटिव्हच्या मर्यादेत आहे.

**प्रश्नकर्ता :** 'रिलेटिव्ह'चा 'रियल'शी काही संबंध आहे का?

**दादाश्री :** आहे ना! 'रियल' होते म्हणूनच 'रिलेटिव्ह' उभे झाले ना! 'रियल'च्या संसर्गानेच 'रिलेटिव्ह' उत्पन्न झाले आहे, अवस्था उत्पन्न झाली आहे, आणि ही जी अवस्था आहे, ती विनाशी आहे.

**प्रश्नकर्ता :** 'रियल'ची प्राप्ती होत नाही तोपर्यंत 'रिलेटिव्ह'ची आवश्यकता आहे का?

**दादाश्री :** जोपर्यंत 'रियल' मिळत नाही तोपर्यंत सर्व 'रिलेटिव्ह'च असते. 'रियल' प्राप्त झाल्यानंतरच 'रिलेटिव्ह' वेगळे होते.

## पारिणामिक धर्माचे थर्मामीटर!

**दादाश्री :** सध्या काय करत आहात?

**प्रश्नकर्ता :** श्रीमद् राजचंद्रांच्या पुस्तकांचा अभ्यास आणि धर्माचा अभ्यास करत आहे.

**दादाश्री :** पुस्तके नुसती वाचून काही होत नाही, यासाठी तर कषायरहित व्हावे लागेल. 'चंदुभाईला अक्कल नाही' असे तुम्ही ऐकलेत तर तुम्हाला दुःख होईल की नाही? त्याचा परिणाम होईल का?

**प्रश्नकर्ता :** होईल.

**दादाश्री :** म्हणजे त्या शब्दाने तुम्ही दुखावले गेलात. जोपर्यंत शब्दाने दुखावले जाता, तोपर्यंत तुम्ही धर्माचे काहीही ज्ञान प्राप्त केले नाही, असे मानावे. दगड लागला तर ठीक आहे, त्याची मलमपट्टी, औषध-पाणी करावे लागते. पण शब्दाने जी जखम होते, ते धर्माचे फळ नव्हे! शब्दाने दुखावले न जाणे हे धर्माचे फळ आहे. ताप किती चढला आणि किती उतरला हे दाखविणारे आपल्याकडे काही तरी असले पाहिजे ना?

## मोक्ष मार्गात भावना मुख्य!

तीन गोष्टींची मोक्षमार्गात गरज आहे :

1. आत्मा प्राप्त करण्याची तीव्र इच्छा.

2. 'ज्ञानी पुरुष' प्राप्त करण्याची तीव्र इच्छा.

3. 'ज्ञानी पुरुष' भेटत नाहीत तोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' भेटावेत अशी भावना करीत राहणे.

प्रथम 'ज्ञानी पुरुषां'साठी भावना केली पाहिजे, त्यांची भेट झाली की लाभ होतो. बस, हाच मुख्य मार्ग आहे, बाकीचे सर्व व्यवहार धर्म आहेत. आणि व्यवहार धर्मात निश्चय धर्म असेल तर ही तीनच वाक्ये आहेत. एवढे समजले तरी प्रश्न सुटेल?

'संपूर्ण ब्रह्मांडातील जीवमात्रांच्या 'रियल' स्वरूपाला अत्यंत भक्तीपूर्वक नमस्कार करतो. 'रियल' स्वरूप हे भगवत् स्वरूप आहे म्हणून संपूर्ण जगाचे भगवत् स्वरूपात दर्शन करीत आहे.'

हे वाक्य जरी नीट समजले तरी धर्म प्राप्त केला असे म्हटले जाईल.

हे सारे धर्म 'रिलेटिव्ह' धर्म आहेत. 'रिलेटिव्ह' धर्म म्हणजे भौतिक दु:खे दूर करून भौतिक सुखे देणारे धर्म, ते मोक्ष देत नाहीत. 'रिलेटिव्ह' म्हणजे व्ह्यू पॉइंट! एकेका व्ह्यू पॉइंटची लाखो माणसे असतात!

## धर्माधर्म आत्मा

अधर्माला धक्के मारत राहतो तो धर्म, त्याला धर्माधर्म म्हणतात. जिथे अधर्म असेल तिथे धर्म असतोच. कारण अधर्म काढून टाकण्यासाठीच धर्म आहे. आत्म्याच्या तीन अवस्था आहेत.

1. धर्माधर्म आत्मा (मूढात्मा)
2. ज्ञानघन आत्मा (अंतरात्मा)
3. विज्ञानघन आत्मा (परमात्मा)

## ज्ञानघन आत्मा

सिद्धांत कधी म्हणायचे? धर्माधर्म पदातून पुढे गेल्यावर 'ज्ञानी पुरुषां'च्या कृपेला पात्र झाल्यावर, ज्ञानघन आत्म्यात येतो. आत्मा ज्ञानघन आहे आणि अविनाशी आहे. ज्ञानघन म्हणजे काय की 'व्हॉट इज रियल ॲन्ड व्हॉट इज रिलेटिव्ह?' म्हणजेच शाश्वत व अशाश्वत गोष्टींची ओळख होते तेव्हा 'थियरी ऑफ रियालिटी'त येतो आणि मोक्ष होतो. तेव्हा शुद्धात्म्याचे लक्ष्य बसते, अलख-निरंजनाचे लक्ष्य बसते आणि तेव्हा काम होते. हा संसार 'रिलेटिव्ह' आहे, आणि 'आपण' रियल आहोत. 'आपण' 'रियल'च्या पक्षात राहावे आणि 'रिलेटिव्ह'चा निकाल करावा. या चिकटलेल्या भूताचा निकाल तर करावाच लागेल ना? हे तर 'सायन्स' आहे. 'सायन्स'मध्ये कोणाचे मतभेद होत नाहीत. मतभेद धर्माधर्ममध्ये होतात. जेवढे धर्म आहेत त्या सर्वात मतभेद असतात, विकल्प असतात. विकल्प कधीपर्यंत म्हणायचे? तर धर्माधर्म आत्मा आहे तोपर्यंत. अधर्माला धक्के मारत राहतो तो धर्म. अहो, अधर्म पटत नसेल तर राग-द्वेष केल्याशिवाय बसा ना, पण कसे बसतील? कारण अधर्माबद्दल द्वेष आणि धर्माबद्दल राग (आसक्ती, मोह) आहे! धर्माधर्म आत्मा ही मिथ्यात्व दशा आहे. 'रिलेटिव्ह' धर्म पाळला तर चांगले म्हणायचे, पुढे चांगले खायला-प्यायला मिळेल आणि गाडी चालेल. परंतु ही सर्व शेगडीची सुखे आहेत, शेगडी काय गळ्यात बांधायची असते? मोक्षाला जाण्यासाठी अधर्माला किंवा कशालाही धक्का मारावा लागत नाही. मोक्षाला जाण्यासाठी तर अधर्म आणि धर्म दोन्हींचा निकाल करून टाकावा लागतो.

धर्माधर्म हा देहाचा, मनाचा, बुद्धीचा, प्रकृतीचा स्वभाव आहे; आणि आत्म्याचा वीतराग स्वभाव आहे. जर तुम्हाला वीतराग स्वभावात राहायचे असेल तर धर्माबद्दल प्रेम बाळगू नका आणि अधर्माशी कटकट करू नका. 'ऑल दिस रिलेटिव्हस् आर टेम्पररी ॲन्ड रियल इज पर्मनन्ट.'

'ज्ञानी पुरुष' ज्ञानघन आत्मा देऊ शकतात. तो तुम्हाला धर्म-अधर्म यातून बाहेर काढतो. धर्माधर्म आत्मा आहे तोपर्यंत भटकणे आहे. धर्माचे फळ भौतिक सुख आणि अधर्माचे फळ भौतिक दु:ख हे आहे. धर्मामुळे संसार प्राप्त होतो. 'थियरी ऑफ रियालिटी'त आला की ज्ञानघन आत्मा प्राप्त होतो. त्याच्या पुढे काय आहे? तर 'थियरी ऑफ ॲब्सॉल्यूटिजम!' तो विज्ञानघन आत्मा आहे.

## विज्ञानघन आत्मा

ज्ञान म्हणजे आत्मा आणि विज्ञान म्हणजे परमात्मा. हे तर 'सायन्स' आहे. आत्मा-परमात्म्याचे 'सायन्स' म्हणजेच सिद्धांत! त्यात कधीही, कुठेही अंशमात्र देखील 'बदल' होत नाही आणि तो थेट आरपार घेऊन जातो. ज्ञानघन आत्म्यात आल्यानंतर अविनाशी पद प्राप्त केल्यानंतर, विज्ञानघन जाणून घेतले पाहिजे. विज्ञानघन म्हणजे सर्वात 'मीच आहे', असे दिसते तो विज्ञानघन आत्मा आहे - बांधलेला असूनही मुक्त राहतो! 'ज्ञानी पुरुष' हे विज्ञानघन आत्मा असतात! 'थियरी ऑफ ॲब्सॉल्यूटिजम'च नाही तर स्वत: 'थियरम ऑफ ॲब्सॉल्यूटिजम'मध्ये असतात. संपूर्ण जगाचे पुण्य जागे झाले आहे आणि हे 'अक्रम विज्ञान' निघाले, विज्ञानघन आत्मा निघाला!!

संपूर्ण 'जग' सायन्सच्या रूपातच आहे. तरीही आज लोक सायन्स समजत नाहीत, म्हणून धर्माच्या मागे लागले आहेत. परंतु जर सायन्स समजून घेतले की ह्या इतक्या 'वस्तू' आहेत आणि हे कसे चालते, तर तो मुक्त होईल. हेच अत्यंत गुह्य कोडे आहे.

## जिथे गच्छ-मत तिथे रिलेटिव्ह धर्म

जैन धर्म, वैष्णव धर्म, मुस्लिम धर्म, पारसी धर्म, ख्रिस्ती धर्म हे

सर्व ‘रिलेटिव्ह’ धर्म आहेत. त्या धर्माचे आणि ‘ह्या’ धर्माचे काही देणेघेणे नाही. ही ‘रियल’ वस्तू आहे. ‘रिलेटिव्ह’ धर्म म्हणजे जो स्टेप बाय स्टेप - पायरी-पायरीने पुढे नेतो. त्यातही रिलेटिव्ह धर्म खरे धर्म नाहीत. जिथे गच्छ (संप्रदायाचा एक वर्ग)-मत आहे, तिथे एकही धर्म खरा नसतो. गच्छ आणि मत असेल तिथे मोक्षाचा मार्गच नसतो. पक्ष आणि मोक्ष दोन्ही विरोधाभासी आहेत. जिथे गच्छ-मत आहेत, तिथे संसारीपेक्षाही अधिक बंधने आहेत. मोक्ष तर वीतराग धर्मामुळेच मिळतो. संप्रदाय हा एकांतिक असतो. वीतराग धर्म हा एकांतिक नसतो तर अनेकांत असतो. वीतराग धर्म संप्रदायाच्या बाहेर आहे. वीतराग म्हणजे मतभेदरहित. आपला हा अनेकांत मार्ग आहे. येथे पारशी आहेत, जैन आहेत, मुस्लिम आहेत, वैष्णव आहेत. इथे सर्वांना पटेल अशाच गोष्टी असतात. येथे स्याद्‌वाद वाणी आहे. एकांतिक धर्म असेल तिथे एकाच प्रकारचे लोक, एकाच मताची सर्व माणसे येतात. दुसरा कोणी येत नाही. वीतराग वाणीने सर्व दुःखांचा क्षय होतो. मत आणि गच्छ आहेत तोपर्यंत मोक्षमार्गच काय पण धर्म देखील प्राप्त केला नाही, असे म्हटले जाईल. ‘प्राप्त केला’ असे म्हटले जाणार नाही!

**प्रश्नकर्ता :** ‘प्राप्त केला’ असे केव्हा म्हटले जाईल?

**दादाश्री :** क्लेश गेले, चिंता गेली की ‘प्राप्त केला’ असे म्हटेल जाईल. शिव्या दिल्या किंवा मारले तरी देखील क्लेश-चिंता होत नाहीत, गाडीत बसविले तरी क्लेश नाही आणि लगेच उतरवून दिले तरी क्लेश नाही, तर त्याने ‘प्राप्त केला’ म्हटले जाईल! नाही तर प्राप्त केला असे कसे म्हणता येईल?

## धर्मसार म्हणजे...

जगात दोन प्रकारचे सार आहेत, धर्मसार आणि समयसार.

धर्म कशाला म्हणतात? धर्माचे सार प्राप्त झाले तर धर्म झाला असे म्हणतात. धर्मसार कशाला म्हणातात? तर आर्तध्यान आणि रौद्रध्यान न होणे याला. खातो-पितो, हिंडतो-फिरतो, व्यापार करतो, सर्व काही

करतो पण रौद्रध्यान आणि आर्तध्यान होत नाही, त्याला धर्मसार म्हटले आहे, आणि मर्माचे सार म्हणजे मुक्ती. या धर्माचे जे मर्म आहे, त्याचे सार निघाले तर त्यालाच मुक्ती म्हणतात. धर्माच्या सारामुळे मुक्ती मिळत नाही, पण धर्मसारातून मर्म उत्पन्न होईल. आणि मर्मसारामुळे मुक्ती मिळेल.

सर्व धर्माचे सार काय आहे? आर्तध्यान आणि रौद्रध्यान गेले का? नसेल गेले तर तू धर्मात नाहीस. कमी झालेत का? तर म्हणतो हो! कमी झाले असेल अशा लोकांसाठी तर आपण मानू की ते धर्मात आहेत पण ज्यांचे कमी झाले नाही, जास्त झालेत, ते धर्मात आहेत असे स्वीकारले जात नाही.

धर्मसार कशाला म्हणतात? तुम्हाला कोणी डिवचले तरी त्याचा दोष न दिसणे त्याला. जगाचे सार काय आहे? तर विषयसुख. धर्माचे सार काय? तर आर्तध्यान आणि रौद्रध्यान न होणे. धर्मसार हे जगातील मुख्य सार आहे. धर्मसार प्राप्त झाले नसेल तर तो धर्मच चुकीचा आहे. मग जैन असो, वैष्णव असो किंवा आणखी कोणता असो, त्यातून ग्रहण केलेल्या सर्व गोष्टी चुकीच्या आहेत!

स्वाभाविक परिणती, स्वपरिणती उत्पन्न झाली म्हणजे समयसार उत्पन्न झाले.

## धर्म म्हणजे काय? विज्ञान म्हणजे काय?

धर्म आणि विज्ञान यात फरक आहे. विज्ञान सिद्धांतिक असते आणि सर्व धर्म 'रिलेटिव्ह' असतात, त्याचे फळ देखील 'रिलेटिव्ह' असते आणि त्यांच्या क्रियाही 'रिलेटिव्ह' असतात. 'मी चंदुभाई आहे' असे मानून तुम्ही जे करता तो धर्म आहे आणि 'जसे आहे तसे' यथार्थपणे जाणून घेणे, याला विज्ञान म्हणतात. नि:शंक झाल्यानंतर, स्वत:चे स्वरूप जाणल्यानंतर 'जसे आहे तसे' जाणणे, याला विज्ञान म्हणतात. विज्ञान अविरोधाभासी असते, 'जसे आहे तसे' 'फॅक्ट'च सांगते.

**प्रश्नकर्ता :** हे जरा सविस्तर समजवा.

**दादाश्री :** असे आहे की, 'तुम्ही चंदुभाई आहात' या भूमिकेतून तुम्ही कोणाला शिव्या दिल्यात तर तो अधर्म म्हटला जाईल, आणि कोणाला चांगले-चांगले, खाऊ-पिऊ घातले, कोणाच्या मनाला शांती दिली, त्याला धर्म म्हटले जाईल. आणि कोणाला वाईट वाटेल असे केले, कोणाचे मन दुखावले तर त्याला अधर्म म्हटले जाईल. 'रिलेटिव्ह' वस्तूमधून 'रिलेटिव्ह' उत्पन्न होते, आणि 'रियल' वस्तूमधून 'रिलेटिव्ह' उत्पन्न होत नाही. 'रियल' मधून सर्व 'रियल'च उत्पन्न होते, फक्त 'रियल'ला 'रियलाइज' करायचे अजून बाकी आहे. आता तर तुमच्या भ्रामक मान्यतेमुळे तुम्हाला वाटते की 'हे सर्व माझ्या शक्तीने चालते, किंवा भगवंताने केले, किंवा माझे ग्रह खराब आहेत, वगैरे.' खरे तर कर्ता दुसराच कोणी आहे.



## [ 17 ]

# भगवंताचे स्वरूप, ज्ञान दृष्टीने

## ईश्वराचा अंश की सर्वांश?

**दादाश्री :** तुम्ही कोण आहात?

**प्रश्नकर्ता :** मी ईश्वराचा अंश आहे.

**दादाश्री :** या अंशाबद्दलच्या गोष्टी समजावून लोकांना चुकीच्या रस्त्याने चालविले आहे. भगवंताचा अंश कसा असू शकेल? भगवंताचे तुकडे कसे करू शकतो? आत्मा असंयोगी आहे. संयोगी वस्तू असेल तर त्याचे तुकडे करता येतील. आत्मा स्वाभाविक वस्तू आहे, स्वाभाविकचे तुकडे होत नाहीत. खरे तर तुम्ही सर्वांशच आहात पण आवृत (आवरणवाले) आहात. 'ईश्वराचा मी अंश आहे' म्हणजे त्यांना काय म्हणायचे आहे की मला अंशज्ञान प्रकट झाले आहे, आवरण अंशतः उघडले आहे. हे सूर्यनारायण तर पूर्ण आहेत, पण जेवढे आवरण दूर होते तेवढ्या भागात प्रकाश होतो, पण सूर्यनारायण तर सर्वांशच आहेत. तसेच तुम्ही स्वतःसुद्धा सर्वांशच आहात, फक्त आवृत आहात. सुरुवातीला एकेंद्रिय जीव असतो, त्याचे थोडे आवरण दूर झाले आहे. त्याला कुऱ्हाडीने मारले तर दुःख होते. पण चहा पाजा किंवा शिव्या द्या तर त्याला काही होत नाही. मग दोन इंद्रिय असलेले शंख-शिंपले, मग तीन इंद्रियवाले कीटक-फुलपाखरे, मग चार इंद्रिय आणि मग पाच इंद्रिये होतात. पंचेंद्रियवाल्यांचे पंचेंद्रियांएवढे आवरण उघडले आहे. पण

भगवंत तर प्रत्येकात सर्वांश रूपातच आहे, पण आवरणसहित आहे. संपूर्ण निरावरण झाले तर तुम्ही स्वत: परमात्माच आहात. ज्याचे विभाजन होऊ शकते त्याचे अंश असतात. आत्मा तर अविभाज्य आहे, त्याचे अनंत प्रदेश अविभाज्य रूपात आहे.

जागृत झाल्याशिवाय स्वत:चे भान प्रकट होत नाही. संपूर्ण जागृती असेल तर स्वत:चे भान प्रकट होते आणि भान प्रकट झाले की आपण स्वत: सर्वांश रूपाने ईश्वर आहोत, हे स्वत:लाच कळते, अनुभवास येते आणि त्यानंतर ज्या क्रिया होतात त्यात कधीही दु:ख होत नाही.

## ईश्वराची सर्वव्यापकता

**दादाश्री :** ईश्वर कुठे राहत असेल?

**प्रश्नकर्ता :** ईश्वर तर सर्वव्यापी आहे. कणाकणात सर्वत्र ईश्वरच आहे.

**दादाश्री :** तर मग ईश्वराला कुठे शोधायची गरजच उरली नाही ना? जर सगळीकडे ईश्वर आहे तर मग शौचाला कुठे जावे? जर सगळीकडे ईश्वर असेल तर मग जड आणि चेतन वेगवेगळे असे काही राहिलेच नाही ना? परंतु असे नाही. जड पण आहे आणि चेतन पण आहे. सगळे गव्हाचे दाणे असतील तर निवडायचे काय? गव्हामधील गहू ओळखले की खडे वेगळे करता येतील आणि गव्हामधले खडे जरी ओळखले तरी काम होईल. तसेच आत्म्याला जाणले तर अनात्म्याला ओळखता येईल आणि अनात्म्याला जाणले तरी आत्म्याला ओळखता येईल. पण हे लोक म्हणतात की सगळीकडे ईश्वर आहे, तर मग त्याला शोधायची गरजच नाही ना?

## संकल्पी चेतन

हे लोक म्हणतात की कणाकणात ईश्वर आहे, याच्यात आहे, त्याच्यात आहे. असे म्हणणारे काय सांगतात आणि ऐकणारे काय समजतात यात काही फरक असेल की नाही?

**प्रश्नकर्ता :** फरक तर असेलच ना?

**दादाश्री :** ते असे कोणत्या अपेक्षेने म्हणतात ते मी तुम्हाला समजावतो. या जगाचे दोन विभाग आहेत, आत्मा आणि अनात्मा. या टिपॉयमध्ये चेतन नाही, पण ही 'चंदुभाई'च्या मालकीची वस्तू आहे, म्हणून ह्या वस्तूला तितका चेतनभाव प्राप्त झाला आहे. ते संकल्पी चेतन आहे. आणि जर तुम्ही ही वस्तू त्यांना विचारल्याशिवाय घेतली तर त्याचा दोष तुम्हाला लागेल, आणि तुम्ही जर ती वस्तू त्याची किंमत देऊन विकत घेतली आणि मग जरी तुम्ही ती तोडली, त्याचा अगदी चुरा केला, तरी देखील तुम्हाला त्याचा दोष लागणार नाही. ज्यात ज्ञान आहे, दर्शन आहे ते चेतन तत्त्व.



# [ 18 ]
# ज्ञाता पदाची ओळख

## तुम्ही आत्मा? आत्म्याला न ओळखताच?

**दादाश्री :** काय नाव तुमचे?

**प्रश्नकर्ता :** चंदुलाल.

**दादाश्री :** खरोखरच 'तुम्ही चंदुलाल आहात' हे नक्की आहे का? की त्यात काही शंका आहे?

**प्रश्नकर्ता :** ते तर शरीराचे नाव आहे.

**दादाश्री :** मग तुम्ही कोण आहात?

**प्रश्नकर्ता :** आत्मा.

**दादाश्री :** आत्मा म्हणजे काय? हा देह म्हणजे आत्मा की या बांगड्या म्हणजे आत्मा, की हा मेंदू म्हणजे आत्मा? आत्मा कशाला म्हणणार? त्याला ओळखावे तर लागेल ना? आत्म्याचे ज्ञान तर जाणावे लागेल ना?

**प्रश्नकर्ता :** अंतरात्मा.

**दादाश्री :** हो. अंतरात्मा तर आहे, पण त्याला ओळखावे लागेल ना की त्याचे काय गुणधर्म आहेत? तो खातो-पितो की खात-पीत नाही? किंवा कोणी जाळले तर जळतो की नाही?

## आत्म्याची चूक?

आत्म्याचा गुण कोणता? चिंता करणे हा त्याचा गुण आहे की कषाय करणे हा त्याचा गुण आहे?

**प्रश्नकर्ता :** तो आत्म्याचा गुण नाही. चुकून कषाय होत असतात.

**दादाश्री :** आत्मा चुकत असेल तर त्याला आत्मा म्हणायचेच कशाला? आत्मा तर परमात्माच आहे. त्याची चूक होईलच कशी? आणि आत्म्याची चूक दाखविणारे आपण त्याचे *उपरी* की 'भाऊ, आत्मा चुकला?' आत्मा चुकला या वाक्याचा स्पष्ट अर्थ होतो की आत्मा चुकला आणि आम्ही मात्र शुद्ध आहोत, चूक नसलेले! (?) आत्मा स्वत:च परमात्मा आहे. स्वत: वीतराग आहे. पण स्वरूपाचे भान झाले नाही म्हणून स्वत:ला 'चंदुलाल' समजतो. 'मी चंदुलाल आहे' हा आरोपित भाव आहे, कल्पित भाव आहे, 'रिलेटिव्ह' भाव आहे. तर मग 'रियल'मध्ये आपण कोण आहात? रिलेटिव्हमध्ये खूप सारे विकल्प असतात, 'मी यांची मुलगी आहे, मावशी आहे, काकी आहे' असे खूप विकल्प आहेत. याउलट 'रियल'मध्ये कुठलेही विकल्प नाहीत. 'रियल'ला 'रियलाइज' केले तर आपल्याला कळेल की स्वरूपाचे भान झाले आहे, म्हणजे आता मोक्षाला जाण्याची तयारी झाली. पण 'रियल'चे भान कधी झालेच नाही. आत्म्याचे भान होणे, याला समकित किंवा सम्यक् दर्शन म्हणतात. समकित कधी झालेच नाही, जर झाले असते तर इथे बसून राहिलो नसतो. समकित झाल्याशिवाय क्षणभरही अंतरशांती होत नाही, मूर्च्छेतच असतो. लग्न जमले की मूर्च्छित होतो आणि लग्न झाल्यानंतर परत जसाच्या तसाच, याला मोहनिद्रा म्हणतात.

## स्वाध्याय की पराध्याय?

**दादाश्री :** काय वाचताय सध्या?

**प्रश्नकर्ता :** जैन स्वाध्याय, सूत्र, व्याख्यान वगैरे सर्व करतो.

**दादाश्री :** हा जो स्वाध्याय करतात तो पराध्याय आहे. एकदा

स्वरूपाचा स्वाध्याय केला ना, की सर्व उलगडा होईल. जगात जे जे चालते ते परावलंबन आहे, ते अवलंबन खरेही असू शकते. परंतु स्वावलंबनामुळे तर मुक्ती मिळते आणि परावलंबनामुळे नुसतीच भटकंती होते.

## शेवटी तर अहंकाराचा विलय करायचा आहे

शुभाशुभ मार्ग ग्रहण करणे हा मनुष्यांचा स्वभाव आहे आणि त्यालाच धर्म समजतात. सर्व धर्मांमध्ये शुभाशुभच आहे. परंतु जैन धर्मात जर शुभाशुभाची चर्चा असेल तर तो खालच्या दर्जाचा मानला जाईल. त्यात शुभाशुभाच्या चर्चा असताच कामा नयेत. त्यात कथानुयोग, म्हणजे जे उत्तम पुरुष होऊन गेले, उत्तम श्रेष्ठी, उत्तम ज्ञानी होऊन गेले त्यांचे वर्णन ऐकतात. त्यामुळे मलाही असे व्हायचे आहे असा भाव जागृत होतो. जैन धर्माचे सारच हे आहे, पण आज तर ते शुभाशुभातच अडकले आहेत! जैन धर्मात चार प्रकारचे अनुयोग आहेत – कथानुयोग, चरणानुयोग, करणानुयोग आणि द्रव्यानुयोग आणि वेदांतातही चार योग आहेत. भगवंतांनी सांगितले आहे की जर तू जैन असशील तर या चार अनुयोगांचे वाचन कर, आणि त्या वेदांतात चार योगांचे वाचन कर, तर आत्म्याची प्राप्ती होईल. शुभाशुभाने अहंकार वाढतो, पण कथानुयोगाने अहंकार वाढत नाही. वस्तुपाल-तेजपाल यांच्या कथा ऐकून असे वाटते की आपणही त्यांच्यासारखे व्हावे. पण इथे तर त्यांचा अहंकार वाढला आहे. जैनांमध्ये अहंकार किती असला पाहिजे? घर चालविण्यापुरता आणि व्यापारापुरता, पण इथे तर सर्व गोंधळ माजवला आहे.

## 'ज्ञाता'लाच 'ज्ञेय' बनविले

"अनादि काळापासून लोक 'ज्ञेया'लाच 'ज्ञाता' समजत आले"

– नवनीत

अनादिकाळापासून लोकांना धर्म कशात आहे असे वाटते? ज्ञेयालाच ज्ञाता मानून धर्म करतात. 'आचार्य' हे 'ज्ञेय' आहे आणि 'स्वतः' 'ज्ञाता' आहे, पण भ्रांतीमुळे जे ज्ञेय आहे त्यालाच स्वतः आहे

असे मानतात. 'आचार्य'लाच स्वत: आहे असे मानतात. 'हे व्याख्यान मी दिले, शास्त्रांचा अभ्यास मी केला, तप मी केले, त्याग मी केला.' पण करणारा जाणत नाही, जाणणारा करत नाही. करणारा आणि जाणणारा यांचा मिलाफ कधी झालाच नाही, होत नाही आणि होणारही नाही. हे तर म्हणतात 'मीच आचार्य आहे आणि मीच व्याख्यान दिले.' तेव्हा आम्ही समजून गेलो की ते कोणत्या स्टेशनवर बसले आहेत! माटुंगा स्टेशनवर बसले आहेत आणि म्हणतात पुढील स्टेशन कलकत्ता आहे. नाही, पुढचे स्टेशन तर माहीमच्या खाडीचे आले! अनंत जन्म भटकलात तरी कलकत्ता येणार नाही! ज्ञाता हा ज्ञाता आहे आणि ज्ञेय हे ज्ञेय आहे. 'चंदुभाई' हे ज्ञेय आहे. 'याचा भाऊ' हे ज्ञेय आहे, 'या धंद्याचा मालक' हे ज्ञेय आहे. 'या घराचा मालक' हे ज्ञेय आहे आणि 'आपण' स्वत: ज्ञाता आहोत. आपण ज्ञाता आणि हे सर्व ज्ञेय, असे पाहत राहिलो तर मग समाधी दशा राहते. 'आपला' धर्म काय आहे? तर काय घडले ते पाहणे आणि ज्ञाता-दृष्टा-परमानंदी राहणे! धर्म कशाला म्हणतात? सोने सोन्याच्या धर्मात असेल, त्याला. सोने जर पितळाच्या धर्मात असेल तर त्याला स्वधर्म म्हणत नाहीत, तर परधर्म म्हणतात. हा तर 'चंदुलाल' बनून बसला आहे, आणि देहाच्या धर्मालाच स्वत:चा धर्म मानतो, अंत:करणाच्या धर्माला स्वत:चा धर्म मानतो. परंतु तो परधर्म आहे. परधर्माने कधीही मोक्ष मिळणार नाही, स्वधर्मानेच मोक्ष आहे. सोने सदैव आपल्या धर्मातच असते. पण हे लोक तर 'चंदुलाल' असल्याचा आरोप करतात, इतकेच नव्हे तर म्हणतात, (मी) 'याचा सासरा, याचा मुलगा, याचा बाप, कोर्टात गेला तर याचा वकील, दुकानात असला तर शेठ' यालाच म्हणतात भ्रांती. 'स्वत: शुद्धात्माच आहे.' पण या आरोपांमुळे लक्षात येत नाही.

## अज्ञानाची निवृत्ती विज्ञानामुळे

मोक्षधर्म म्हणजे अज्ञानापासून निवृत्ती होणे. (आम्ही) 'या' मोक्ष मार्गात अज्ञानापासून निवृत्ती करवून देतो, म्हणूनच ज्ञानामध्ये प्रवृत्ती होते. अज्ञान निवृत्त झाले की विज्ञान उत्पन्न होते. परंतु 'ज्ञानी पुरुषा'शिवाय

कोणाचेच अज्ञान निवृत्त होत नाही, कोणाचा देहाध्यास सुटत नाही. देहाध्यासाची निवृत्ती हाच मोक्ष आहे. एका अंशाने जरी ज्ञानाची प्रवृत्ती झाली तरी ती सर्वांशाने होईल. एक अंश जरी 'सायन्स' झाले तरी ते सर्वांशाने होईल. कारण ज्ञान हे 'सायन्स' आहे, अज्ञान 'सायन्स' नाही. एक अंश विज्ञान कधी उत्पन्न होते? तर 'या' मार्गाचा माहितगार असेल तर त्याला विचारावे लागते, तरच मार्ग सापडेल. तसेच 'या' माहितगार म्हणजेच 'ज्ञानी पुरुषा'ला विचारले तरी मार्ग प्राप्ती होईल. 'हा' धर्म नाही तर 'सायन्स' आहे. हा तर 'रियल' धर्म आहे. तो नेहमीच प्रकट झालेला नसतो. हा तर 'चौदालोकां'चा नाथ आमच्यात प्रकट झाला आहे. हा देह तर बुडबुडा आहे, तो कधी फुटेल सांगता येत नाही. तो आहे तोवर तुम्ही (मोक्षाचे) काम उरकून घ्या. वीतरागांमध्ये जसा प्रकाश झाला होता तसाच हा प्रकाश आहे. या 'ज्ञानी पुरुषां'जवळ संपूर्ण समाधान होईल असे आहे, म्हणून तुमचे काम उरकून घ्या. आम्ही तुम्हाला इतके सांगून मोकळे होतो. आम्ही वीतराग आहोत त्यामुळे नंतर तुम्हाला पत्र पाठवून या असे म्हणणार नाही.

बंधनातून मुक्त करतो तो धर्म. खरे स्वातंत्र्य देतो त्याला धर्म म्हणतात.



# [ 19 ]
# यथार्थ भक्तीमार्ग

## श्रद्धाच फळाला येते

असे आहे, की देव तुमच्या 'बिलीफ'च्या (श्रद्धेच्या) आधीन असतात. मूर्तीचे दर्शन घ्याल पण बिलीफ नसेल तर काय फायदा? बिलीफ अन्अवकाशपणे (स्थिर आणि सतत) असेल तर देवाची रात्रंदिवस आठवण येत राहते. म्हणून मूर्तीवर श्रद्धा ठेवा. मूर्ती भगवंत नाही, तुमची श्रद्धा भगवंत आहे. तरी देखील भगवंताचे दर्शन कराल तर भावपूर्वक करा. कष्ट करून दर्शनाला जाता पण योग्य रीतीने, भावपूर्ण दर्शन केले नाही तर सर्व कष्ट वाया जातील. देवाच्या मंदिरात किंवा जिनालयात जाऊन खरे दर्शन करण्याची इच्छा असेल तर मी तुम्हाला दर्शन करण्याची योग्य पद्धत शिकवितो. बोला, आहे का कुणाची इच्छा?

**प्रश्नकर्ता :** हो, आहे. शिकवा दादा. उद्यापासूनच त्यानुसार दर्शनाला जाईन.

**दादाश्री :** मग भगवंताच्या मंदिरात जाऊन म्हणावे की 'हे वीतराग भगवंत! तुम्ही माझ्या आतच विराजमान आहात, पण मला अजून त्यांची ओळख झाली नाही, म्हणून मी तुमचे दर्शन घेत आहे. मला हे 'ज्ञानी पुरुष' दादा भगवान यांनी शिकविले आहे, त्याप्रमाणे आपले दर्शन करतो.

तर मला माझ्या 'स्वत:'ची ओळख व्हावी अशी कृपा आपण करावी.' जेथे जाल तेथे यानुसार दर्शन करा. ही तर वेगवेगळी नावे दिलेली आहेत. सर्व भगवंत 'रिलेटिव्हली' वेगवेगळे आहेत पण 'रियली' एकच आहेत.

दुकान तिथे लांब, टॉवर जवळ आहे तरी इथे दुकानाचा विचार करत बसतो. अरे, ज्या जागी आहेस त्या जागेचा विचार कर ना! रस्त्यातही दुकानाचाच विचार करत करत चालतो. मंदिरात जाताना कोणी धर्माचा विचार करीतच नाही. तिथे तर दुकानाचा विचार करतात. कित्येकांना तर रोज मंदिरात जाण्याची सवयच लागलेली असते. अरे, सवय लागली आहे म्हणून तू भगवंतांचे दर्शन करतोस? भगवंतांचे दर्शन तर रोज नवे-नवेच वाटले पाहिजे. आणि दर्शनाला जाताना उल्हसित, अगदी फ्रेश वाटले पाहिजे. ही तर रोज पूजेची डबी घेऊन दर्शनाला जाण्याची सवय जडली आहे.

धर्म कसा करील? दिवसभर कर्म करील की धर्म करील? त्यासाठी तर तास-दोन-तास काम केले की (संसाराची) गाडी वेगाने चालेल, असे ज्याचे पुण्य असेल तोच धर्म प्राप्त करू शकतो आणि धर्म पालन करू शकतो.

## भक्तीने ईश्वराची प्राप्ती

**प्रश्नकर्ता :** कोणी भक्ती केली तर त्याला ईश्वर प्राप्त होतो का?

**दादाश्री :** या पाच इंद्रियांद्वारे ईश्वर प्राप्तीसाठी काही करता येत नाही, जी होत असते ती परोक्ष भक्ती आहे.

**प्रश्नकर्ता :** ती काल्पनिक भक्ती आहे ना?

**दादाश्री :** ती काल्पनिक भक्तीच आहे. जर निर्विकल्प भक्ती केली तरच काम होईल. मनाने विकल्प भक्ती होते.

**प्रश्नकर्ता :** मला सर्वात जास्त भक्तीची आवड आहे.

**दादाश्री :** भक्ती ही तुमची ग्रंथी आहे. भक्तीचा विचार येणे, दर्शन घेण्याचा विचार येणे ही ग्रंथी आहे. परंतु कधी ना कधी निर्ग्रंथ व्हायचेच आहे. तुम्हाला समजले की परवा डाकोर (गुजरातमधील एक गाव)ला दर्शनासाठी जायचे आहे, तर मग तुम्हाला तिथे जायची गाठ फुटते. पण यात काही गैर नाही. खराब विचार येण्यापेक्षा तर हे बरे आहे. भक्ती म्हणजे काय? तर एकदा भक्तीचा रंग लागला की दुसरे सांसारिक रोग लागणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** भक्तीमार्गाचे वाचन केले तर असे वाटते की हे केले पाहिजे. योग, कर्म, ज्ञान याबद्दल वाचले तरी असे वाटते की ते केले पाहिजे. असे का होते?

**दादाश्री :** सारे जग स्वच्छंद नावाच्या रोगाने ग्रस्त आहे. प्रत्येक जण स्वत:च्या मापाने सर्व काही मोजत असतो.

**प्रश्नकर्ता :** आपण ज्ञान द्याल, पण त्यासाठी आमचा काही पाया तर असला पाहिजे ना?

**दादाश्री :** हे सगळे बिनपायाचेच होते. पाया असलेला कोणीच नव्हता, ज्या समजुतीमुळे ठोकर खावी लागते, त्याला अंधकारच म्हणायचे ना? उजेडात ठोकर लागत नाही. विषम परिस्थितीतही समता राहणे यालाच ज्ञान म्हणतात, समतेत तर सर्वांनाच समता राहू शकते. 'मी हे केले, ते केले, मी भक्ती केली.' हा सर्व 'इगोइजम' (अहंकार) आहे. ज्ञान 'आउट ऑफ इगोइजम' आहे.

रणछोडजी (श्रीकृष्ण) खोटे नाहीत, तुझी भक्ती खोटी आहे. तरीही ती परोक्ष भक्ती आहे, 'सेकंडरी' भक्ती आहे. परोक्ष भक्तीचे फळ अपराभक्ती आणि अपरोक्ष भक्तीचे फळ पराभक्ती आहे. पराभक्तीमुळे मोक्ष मिळतो.

हे भक्त झांजांच्या तालातच धुंद झालेले असतात. भगवंताच्या तालात धुंद झालेला एखादाच असतो. फक्त भगवंताच्या नावाखाली करतात, त्यामुळे किती तरी होत असते!

## भक्ती : परोक्ष आणि प्रत्यक्ष

**प्रश्नकर्ता :** भक्तीमार्गात भौतिक समस्या आड येतात ना?

**दादाश्री :** भक्तीमार्गात दोन प्रकार आहेत. एक परोक्ष भक्ती, त्यामुळे संसारफळ मिळते आणि हळूहळू उर्ध्वगती होत राहते. आणि दुसरी प्रत्यक्ष भक्ती, म्हणजे ज्यांच्यात भगवंत प्रकट झाले आहेत त्यांची प्रत्यक्ष भक्ती, त्याने आपली सुटका होते. परोक्ष भक्तीत तर खूप अडचणी येतात. स्वत:चेच विचार स्वत:च्या आड येतात. भक्तीमार्ग चांगला आहे पण भक्तीचे असे आहे की, कधी संयोग बदलले तर भक्ती निघून जाते, पण ज्ञान मात्र सतत सोबतच राहते.

**प्रश्नकर्ता :** भक्तीमार्गात जोखीम कोणावर असते? भगवंतावर?

**दादाश्री :** हो.

नरसिंह मेहता देखील म्हणत, 'हे भगवंता मला सोडव.' सर्व भक्तांमध्ये आर्तता तर असतेच. म्हणूनच आर्ततेने ते म्हणतात की 'हे भगवंता, मला दु:खातून मुक्त कर.' तरीही अशी भक्ती चांगली आहे, भगवंतावरच सर्व काही ओवाळून टाकतात. सर्वात उत्तम भक्ती कुणाची? तर खऱ्या भक्तांची. ते खऱ्या (प्रत्यक्ष) भगवंताची भक्ती करीत नाहीत, तर परोक्ष भगवंताची भक्ती करतात, तरीही ती खरी भक्ती आहे, अशी भक्ती प्रत्यक्ष भगवंताची प्राप्ती करून देते. पण खरा भक्त कोणाला म्हणावे? तर जो एकही संकल्प-विकल्प धरत नाही त्याला. तो काय म्हणतो की संकल्प-विकल्प भगवंत करतो, अर्थात सर्व काही भगवंतावर सोडून देतो. परंतु हा तर मुलाचे लग्न करतो तर मी लग्न करून दिले म्हणतो, मुलगा झाला की पेढे वाटतो आणि मुलगा वारला तर म्हणतो भगवंताने मारला! खरा भक्त तर सर्व काही भगवंतावरच सोडतो. तो काय म्हणतो, 'भगवंता मला काय? तुझीच अब्रू जात आहे.' अशी भक्ती लाभणे कठीण आहे.

एक 'रिलेटिव्ह'ला 'रियलाइज' करतो तर दुसरा 'रियल'ला 'रियलाइज' करतो. भक्तांना साक्षात्कार होतो, ते काय आहे? तर त्यांना

आत मुरलीधर कृष्ण दिसतो, अशी सिद्धी प्राप्त केलेली असते. पण ते जर मला भेटले तर मी त्यांना म्हणेन, 'तो तर दृश्य आहे आणि तू दृष्टा आहेस. तुला जो मुरलीधर कृष्ण दिसतो तो खरा कृष्ण नाही. तो तर दृश्य आहे आणि खरा कृष्ण तर त्या दृश्याला पाहतो तो आहे, आणि तो तू 'स्वत:च' आहेस. ही तर दृष्टी दृश्यावर पडली आहे. ती जर दृष्टावर पडली तर काम होईल.' भक्तांनीसुद्धा हे ध्येय प्राप्त केलेले नसते. त्यांनाही याची गरज आहे. ध्येय असेल तर स्वतः ध्याता होतो, पण ध्येयाचे स्वरूप जाणण्यासाठी गुरु पाहिजे.

नरसिंह मेहता काय गातात?

*'जहां लगी आत्मा तत्त्व चिह्न्यो नहीं,*
*त्यहां लगी साधना सर्व जूठी.'*

(जोपर्यंत आत्मतत्त्व प्राप्त केले नाही तोपर्यंत सर्व साधना खोटी आहे.)

## भक्ती : स्थूलापासून सूक्ष्मतम!

**प्रश्नकर्ता :** सर्व धर्माच्या शास्त्रांमध्ये नामाचे फार महत्त्व सांगितले आहे, नामाचा जप करावा लागतो, त्याचे काय महत्त्व आहे?

**दादाश्री :** ते सर्व एकाग्रतेसाठी आहे. 'नाम' स्थूल आहे, स्थूल भक्ती आहे. त्यानंतर 'स्थापना' ही सूक्ष्म भक्ती आहे, मग 'द्रव्य' ही सूक्ष्मतर भक्ती आहे आणि शेवटी 'भाव' सूक्ष्मतम आहे. अशा चार प्रकारच्या भक्ती आहेत. जेव्हा फक्त 'महावीर, महावीर' असे बोलता ती स्थूल भक्ती झाली, आणि जर स्थापना म्हणजे फोटो ठेऊन 'महावीर, महावीर' म्हटले तर ती सूक्ष्म भक्ती झाली. इथे माझा फोटो ठेऊन भक्ती केली त्यापेक्षा मी प्रत्यक्ष हजर असेल आणि माझ्या हजेरीत भक्ती केली तर ती सूक्ष्मतर भक्ती झाली. आणि मग फक्त माझ्या आज्ञेचे पालन केले तर ती सूक्ष्मतम भक्ती म्हटली जाईल. माझे म्हणणे असे आहे की, आमची आज्ञा जर त्याच्या भावात आली तर ती भावभक्ती झाली. अशी भक्ती त्वरीत फळ देणारी आहे. बाकी तीन प्रकारच्या

भक्ती भौतिक फळ देणाऱ्या आहेत. फक्त 'ही' (भावभक्ती)च 'रियली कॅश' आहे, म्हणूनच आम्ही म्हणत असतो की, 'दीस इज कॅश बँक इन दी वर्ल्ड.' (या जगात फक्त हीच रोकड बँक आहे.) आम्ही ह्याला 'कॅश बँक' का म्हणतो, तर सध्या इथे उच्चत्तम भावभक्ती होत आहे.

नामभक्ती पण चुकीची नाही. नामाचा तसा काही नियम नाही. नामात कोणी 'राम' बोलले तरी चालेल आणि कोणी 'कडुलिंब' बोलले तरी चालेल. फक्त बोलले पाहिजे. आणि जे बोलले जाते त्यावर आत उपयोग असला पाहिजे, जेणेकरून उपयोग दुसरीकडे जाणार नाही. आत्म्याकडे क्षणभरही दुर्लक्ष करता कामा नये. म्हणून त्यासाठी काही ना काही उपयोग राखावा. त्यामुळे नामस्मरण करतात ते चुकीचे नाही. या जगात कुठलीही गोष्ट चुकीची नाही. परंतु नाम, स्थापना आणि द्रव्य, या तीनही गोष्टी म्हणजे व्यवहार आहे, आणि भावच फक्त निश्चय आहे. व्यवहारात तर अनंत जन्मांपासून तेच तेच करत आले आहेत आणि भटक, भटक, भटक, भटकच करत राहिले आहेत! आचार्य झाले, साधू झाले, साध्वीजी झाल्या, असेच भटकत राहिले आहेत, पण मार्ग मिळाला नाही.

## मोक्ष : ज्ञानाद्वारे की भक्तीद्वारे?

**प्रश्नकर्ता :** भक्ती मार्गाने मोक्ष मिळतो की ज्ञान मार्गाने?

**दादाश्री :** भक्ती मार्गाबद्दल तुमची समजूत काय आहे? ज्ञान मार्ग सुरू झाल्यानंतर भक्ती येते. कोणी स्टेशनचा रस्ता दाखवला तर तुम्ही जाणार ना? रस्त्याचे ज्ञान झाल्यानंतर त्या रस्त्यावर चालणे ही भक्ती आहे.

भक्ती या शब्दाचा खरा अर्थ काय आहे? या शब्दात आश्रय अभिप्रेत आहे. ह्या सर्वांना ज्ञान दिले आहे, ते सर्व भक्ती मार्गातही आहेत. ज्याचा आश्रय घेतला त्याची भक्ती करावी.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अक्रम मार्गात भक्ती मार्गही आहे?

**दादाश्री :** 'ही' पराभक्ती आहे. अक्रम मार्गात आत्मा प्राप्त

केल्यावर जे भक्ती करतात, ते स्वतः स्वतःचीच भक्ती करत असतात. हा जो फुलांचा हार बनवितात, तेसुद्धा स्वतःचीच भक्ती करत आहेत. मग तो हार भले आम्हाला घालोत! 'ज्ञानी पुरुषां'ची भक्ती ही स्वतःच्या आत्म्याचीच भक्ती आहे. जोपर्यंत तुमचा आत्मा संपूर्णपणे व्यक्त होत नाही, तोपर्यंत 'ज्ञानी पुरुष'च तुमचा आत्मा आहेत. 'ज्ञानी पुरुष' शल्यरहित असतात. स्वतः प्रसन्नचित्त असल्या कारणाने, समोरच्यालाही त्या प्रसन्नचित्ताच्या दर्शनानेच आनंद होतो. 'ज्ञानीं'च्या फक्त दर्शनानेच अनेक जन्मांची पापे भस्मीभूत होतात!

## पराभक्ती : अपराभक्ती

सारे जग ज्या भक्तीचा शोध घेत आहे, ती अपराभक्ती आहे. ज्या भक्तीत बुद्धीचा थोडाही प्रवेश होत नाही, तीच मोक्षाची भक्ती म्हणायची. भक्ती मोक्षाची असायला हवी. बुद्धीचा प्रवेश झाला की ती अपराभक्ती झाली. बुद्धी बाहेर पडली की ती पराभक्ती झाली. 'इथे' दिवसभर जी चालते ती पराभक्ती आहे. पराभक्तीचे फळ मोक्ष आहे. हा आपला मार्ग तर मोक्षमार्ग आहे. जिथे मोक्षमार्ग नाही, तो संसार मार्ग आहे. भक्तीत जर बुद्धी आली तर ती 'इमोशनल' करते, 'मी' पणाचे भान करविते, 'रिलेटिव्ह' स्वरूपाचे भान करविते, 'मी चंदुलाल आहे, मी लोखंडाचा मोठा व्यापारी आहे' असे भान करविते. बुद्धी पराभक्ती होऊ देत नाही. इथे तर ज्ञान दिल्यानंतर मग पराभक्तीच होत असते. पराभक्ती कशाला म्हणतात तर, जी आत्म्याकरिता केली जाते, शुद्धात्म्याकरिता, आत्महेतूसाठी केली जाते तिला. आत्महेतूसाठी जागा राहतो त्याला निद्रा म्हणतात, आत्महेतूसाठी खातो तो उपवास आणि आत्महेतूसाठी भक्ती करतो ती पराभक्ती होय.



[ 20 ]

# गुरु आणि ज्ञानी

## यथार्थ गुरु

**प्रश्नकर्ता :** माझे आधीचे गुरु आहेत, तर इथे आपण्यास गुरु करू शकतो का?

**दादाश्री :** दोन गुरु तर असावेतच. संसारातील गुरु शुभाशुभाचे शिकवतात. आणि इथे तर शुभाशुभापासून सोडवतात. खरे तर हे गुरुपद नव्हेच. इथे कुठलीच गोष्ट बाधक नसते तर साधकच असते. तरी पण संसारात गुरु हवेतच. त्यांचे आशीर्वाद भौतिक सुखांसाठी खूप कामाचे असतात. आणि हे तर अलौकिक आहे! संसारी गुरुंना लौकिक गुरु म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** लौकिक गुरु म्हणजे काय?

**दादाश्री :** चांगले शिकवितात ते लौकिक गुरु. या जन्मात संसाराचे सिंचन कशाच्या आधारावर होते? तर ज्या योजना (पूर्वकर्मानुसार) आधीच तयार झालेल्या असतात त्यांच्या आधारावर. चांगले आई-वडील मिळतात. घडविण्यासाठी चांगली साधने मिळतात. सर्व काही सोबत घेऊनच आलेला असतो. 'ज्ञानीं'ची कृपा तर नि:शब्द असते, ते तोंडाने बोलत नाहीत की धनवान हो किंवा पुत्रवान हो. पण 'ज्ञानीं'च्या कृपेने मोक्ष मिळतो!

**प्रश्नकर्ता :** प्रत्येकाला मोक्ष मिळणारच आहे, तर मग 'ज्ञानीं'ची काय गरज?

**दादाश्री :** सेंट्रल स्टेशन तर येणारच आहे, पण स्टेशन आल्यावरच तसे म्हणता येईल. प्रत्येक जीव अनादि काळापासून आहे, पण 'ज्ञानी' भेटले आणि ज्ञान प्राप्त झाले की त्यानंतरच तो सादि-सांत (स-आदि, स-अंत) यामध्ये येतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग मोक्षमार्गात गुरुची गरज आहे का?

**दादाश्री :** हो आहे, काही लोक म्हणतात की गुरुची गरज नाही! हे तर लाइट घालवून टाकण्यासारखेच झाले. गुरु तर प्रकाश आहेत, पण गुरुंना ओळखता आले पाहिजे ना? हे लोक तर अंधारालाच प्रकाश मानतात, तर काम कसे होईल?

हे सर्व आचार्य महाराज वगैरे आहेत ना, त्यांना गुरु म्हणतात. आणि 'सद्‌गुरु' कोण? तर ज्यांना सत् प्राप्त झाले आहे ते. ज्यांना सत् प्राप्त झाले आहे, ते तर आपण काही चुकीचे केले तरी रागावत नाहीत, आणि 'ज्ञानी पुरुष' तर स्व-पुरुषार्थासहित असतात. 'ज्ञानी पुरुष' तर जगातील आश्चर्य आहेत!

**प्रश्नकर्ता :** ज्ञानींना ओळखायचे कसे?

**दादाश्री :** 'ज्ञानीं'ना म्हणावे की, 'साहेब, माझी सुटका करा.' त्यावर जर ते म्हणाले की, 'हे एवढे करून ये.' तर तुम्ही म्हणा की, 'साहेब इतके दिवस हेच तर करत आलो आहे, पण तरी काहीही निष्पन्न झाले नाही.' एखाद्या लहान मुलाला (कामासाठी) कुठे पाठविले तर काय तो करू शकेल? त्यासाठी तर मोठा माणूसच लागेल. तसेच 'ज्ञानी पुरुष' भेटले की त्यांच्याकडे सरळ मागूनच घ्यावे. संसारातून मुक्त करतात ते खरे गुरु! बाकी, दुसरे तर खूप गुरु असतात, ते काय कामाचे? खरेतर इथून स्टेशनला जायचे असेल तरी रस्ता दाखविणारा कोणी गुरु करावा लागतो.

## लौकिक गुरु

लौकिक गुरु जरी ज्ञानी नसतील, तरी पण ते 'कोण आहेत' माहीत आहे का? ते रेल्वेच्या 'पॉइंटमेन'सारखे असतात. गाडी दिल्लीची असेल

तर तसा पॉइंट जुळवून देतात आणि गाडी दिल्लीच्या रुळावर वळवतात. परंतु सध्या तर दिल्लीऐवजी सुरतकडे वळवतात, त्यामुळे मग सर्व गाड्या समोरासमोर येऊन धडकतात! अहो, 'पॉइंटमेन'चा पगार घेता तर एवढे तरी काम करा! हे तर वाद-विवादात दुसऱ्याला हरवून जगत्‌गुरु होऊन बसले आहेत. गुरु हे गुणवाचक नाव आहे की नामवाचक? याचा निवाडा करावा लागेल ना? जर गुणवाचक असेल तर दुसरे काही प्रश्न उभे राहतील आणि नामवाचक असेल तर मग हरकत नाही. भगवंत काय म्हणाले आहेत, 'आम्ही या सर्व जगाचे शिष्य आहोत.' सर्व जगाचा गुरु कोणी होऊ शकत नाही. या सर्वांनी तर सगळा व्यापार मांडून ठेवला आहे, कुठेही धर्म निष्ठा राहिलीच नाही. इथे तर खाणे-पिणे आणि मान-पानाचीच निष्ठा आहे. हे जे आम्हाला कठोर बोलावे लागते, ते काय आम्हाला चांगले वाटत असेल? तरी पण तुम्ही सावध राहावे यासाठी सांगत असतो. सत्य कोण बोलू शकतो की ज्याला काहीच नको असते. यांच्यातील काही पुरुष खरे असतीलही, पण ते फार कमी, शेकडा दोन-तीन टक्केच असतील. सरळ चालायला लावणारा कोण असतो, की जो स्वत: शंभर टक्के सरळ चालत असेल, तोच दुसऱ्यांना सरळ चालायला लावू शकतो. स्वत: चुकीचे वागत असेल तर तो दुसऱ्यांना कसा काय उपदेश देऊ शकेल? मी ज्यात शंभर टक्के 'करेक्ट' असेन त्याचाच उपदेश तुम्हाला दिला, तरच वचनबळ निर्माण होईल.

## रिलेटिव्ह धर्म, तर सहप्रवाशासारखे

हे 'रिलेटिव्ह' धर्म प्रवासातील सोबत्यासारखे असतात. प्रवासात चांगल्या आणि बळकट माणसाची सोबत मिळाली तर बरे असते, नाही तर एखादा लुटारू लुटून घेईल. सोबत म्हणजे ज्याची 'बिगीनिंग' असते आणि ज्याचा 'एन्ड' असतो. ज्याची बिगीनिंग नसेल आणि एन्ड पण नसेल अशी सोबत काय कामाची? सोबत म्हणजे नैसर्गिकपणे समविचारी माणसांचे एकत्र येणे. आपले तर हे सायन्स आहे, आणि 'फ्रॉम झीरो टू हंड्रेड'पर्यंतचे (शून्यापासून शंभरपर्यंतचे) आहे. हे तर शेवटपर्यंतचे आहे आणि पुढील-मागील 'रिलेशनसहित' आहे.

धर्म म्हणजे तर जो आरपार घेऊन जातो तो. पण तसा तर कधी उत्पन्न होतच नाही ना? झाले तर काम होऊनच जाईल. पण तरीही काहीच मिळाले नसेल त्यापेक्षा तर रिलेटिव्ह धर्माची साथ चांगली म्हणायची!

## धर्मात व्यापार शोभतच नाही ना!

सर्व जगाचा जो शिष्य होतो, तोच गुरु होण्यालायक आहे. क्षणभरही 'हा माझा शिष्य आहे' असे वाटत नसेल तर शिष्य करा. आम्ही पाच हजार लोकांना ज्ञान दिले आहे, पण आम्हाला क्षणभरही कधी असे वाटत नाही की हे 'माझे शिष्य आहेत.'

भगवंत म्हणतात की इतर सर्व काही वाकडे केलेत तरी चालेल, पण गुरु मात्र सरळ निवडा. अनंत जन्मांपासून वाकडे गुरु मिळत आले, म्हणूनच भटकंती झाली आहे. हिंदुस्तान देशात धर्माबरोबर व्यापार घेऊन बसले आहेत. ते चांगले नाही. व्यापारात धर्म असला पाहिजे, धर्मात व्यापार करू नये. भले ते 'ज्ञानी' नसू देत पण 'त्यांना' पाहून तुझे मन शांत होत असेल तर तिथे बस, पण धर्माच्या व्यापाऱ्याजवळ बसू नकोस. आणि जर शुद्ध व्यक्ती भेटत नसेल, तर भीमाने केले तसे करावे. भीमाला शुद्ध व्यक्ती मिळाली नाही, म्हणून त्याने एक लोटा घेतला, त्याला रंग दिला आणि त्यावर लिहिले, 'नमो नेमिनाथाय' आणि त्याचे दर्शन करीत राहिले! तरी पण जे होत आहे त्यात कुणाचा दोष नाही. हा काळच विचित्र आहे, यात असेच असते. ते तरी काय करतील बिचारे? तेसुद्धा तिथे अडकले आहेत!

**प्रश्नकर्ता :** साधू आसनावर बसले असतील आणि कुणी जाऊन त्यांना नमस्कार केला, तर असे म्हणतात का की, त्यांना गुरु केले?

**दादाश्री :** नाही, त्यांच्याशी बोलले पाहिजे, त्यांच्याशी सौदा केला पाहिजे. हा तर सर्व व्यापार आहे, म्हणून 'कॉन्ट्रॅक्ट' केले पाहिजे की आजपासून माझ्या हृदयात मी आपली स्थापना गुरु म्हणून करत आहे. स्थापना केल्यानंतर मंडन केले असे म्हटले जाते, आणि मंडन केल्यानंतर खंडन करणे, मोठा गुन्हा आहे, अन्यथा मंडन करूच नका. भगवंतांच्या

भाषेत सांगायचे तर मंडन करू नका आणि जर केलेच तर मग खंडन करू नका.

साऱ्या जगात गुरु करणे कोणाला जमले असेल तर ते या खोजा लोकांना! जर तुमच्या गुरुंनी विवाह केला, अरे, विवाह नाही पण कोणाची छेड जरी काढली असेल, तर तुम्ही सर्व त्यांना माराल. आणि या खोजा लोकांच्या गुरुने तर विवाह केला एका युरोपियन लेडीशी! आणि त्या सर्वांनी उत्सव साजरा केला, आपल्या गुरुंनी एका युरेपियन लेडीशी विवाह केला त्याबद्दल! यांना म्हणतात शिष्य. गुरुंच्या उणीवा पाहायच्या नसतात. सर्वांमधील उणीवा पाहा पण गुरुंमधील उणीवा पाहू नये, अन्यथा गुरु करूच नका. धर्माबद्दलच्या चुका संपवतो त्याला तर भगवंत म्हणतात. कोणाचीही चूक काढता कामा नये, ती तर फार मोठी जोखिमदारी आहे.

म्हणून सहजानंद स्वामींनी काय शोध लावला होता तो तुम्हाला माहीत आहे का? गुरु हा पाचवा घाती आहे. त्यांचा थोडाही दोष पाहिला तरी मार खावा लागेल. आणि काही दोष दिसला तरी 'नाही, असे नाही', असे म्हणून डोळे बंद करून घ्या. नाही तर त्यामुळे सर्व जीव अधोगतीला जातील. यातून फक्त आगाखान संप्रदायाचे लोक वाचले आहेत. पाहा, त्यांनी कधी आवाज उठवला आहे का? आणि आपले लोक जर त्यांचे शिष्य झाले तर सर्व प्रकारचे न्याय लावतील!

मी गुरुंची आराधना करा असे म्हणत नाही, पण त्यांची विराधना मात्र करू नका. आणि जर आराधना केली तर कामच होऊन जाईल. पण आराधना करण्याइतकी शक्ती लोकांमध्ये नसते. मी काय म्हणतो की एखाद्या वेड्याला गुरु करा, एकदम ठार वेड्याला गुरु करा, पण आयुष्यभर त्याच्याशी 'सिन्सियर' राहिलात तर तुमचे कल्याण होईल. पूर्ण वेड्या गुरुंशी 'सिन्सियर' राहिलात तर तुमचे सर्व कषाय नाहीसे होतील! पण इतके समजायला हवे ना? तिथपर्यंत मती पोहोचली पाहिजे ना? म्हणूनच तुमच्यासाठी 'दगडा'चे देव बसवले कारण ही प्रजा अशी आहे म्हणून दगडाचे देव बसवा, मग निदान दोष तरी काढणार नाहीत.

पण नाही, 'दगडाच्या देवातही दोष काढतात, की हा श्रृंगार चांगला नाही!' ही प्रजा तर फार विचारशील! फार विचारशील आहे, ती गुरुंचेही दोष पाहणार अशी आहे. स्वत:चे दोष पाहणे राहिले बाजूला, पण गुरुंचेही दोष पाहतात! त्यांचा 'ॲलर्टनेस' इतका जास्त आहे!!

आम्ही गॅरंटी देतो की एखादा वेडा गुरु केला आणि जर संपूर्ण आयुष्य त्याला निभावून घेतले तर तीन जन्मात मोक्ष होईल असे आहे. पण त्यासाठी गुरु जिंवत असले पाहिजेत. पण तेच तर या लोकांना जमले नाही, म्हणून मूर्ती ठेवण्यात आली.

**प्रश्नकर्ता :** गुरु जी आज्ञा करतील, त्या आज्ञेतच राहिले पाहिजे ना?

**दादाश्री :** हो, वेड्यासारखी आज्ञा केली तरी आज्ञेतच राहिले पाहिजे. तुम्हाला मोक्ष मिळवायचा असेल तर गुरु करा पण शेवटपर्यंत गुरुंशी 'सिन्सियर' राहा. शिष्य कोणाला म्हणतात, तर जो गुरुच्या सुखातच स्वत:चे सुख मानतो त्याला. गुरुंना कशात आनंद मिळतो ते पाहतो त्याला. आणि जर आयुष्यभर गुरुंना निभावून घेतले तर सर्व कषाय नाहीसे होतील. तुमचे कषाय धुण्याचे साधन वेडा गुरु हे आहे, किंवा मग 'ज्ञानी पुरुष' ते धुऊन देतात. मधले सगळे तर भटकवत ठेवतात. 'मुक्त पुरुषां'च्या आज्ञेत राहणे. त्याला धर्म म्हणतात.

आपण ज्यांना एकदा गुरु म्हणून स्थापन करून नमस्कार केले की मग गुरु कसेही असोत, चक्रम असोत किंवा वेडे असोत, तरी पण एकदा नमस्कार केल्यावर त्यांची निंदा करता कामा नये. गुरुंचे कारस्थान जरी बाहेर आले तरी आपण त्यांची निंदा करू नये. गुरुंनी काही चुकीचे केले तर त्याची जबाबदारी गुरुंची आहे, इतर कुणाची नाही. हे खोजा संप्रदायातील लोक गुरुंची निंदा करीत नाहीत. हा त्यांचा किती समजुतदारपणा आहे. त्यांच्या या समजुतदारपणाचा स्वीकार केला पाहिजे. वीतराग काय सांगतात की, कोणत्याही माणसात समजुतदारपणा असेल तर त्या गुणाचा स्वीकार केला पाहिजे. पण हिंदू तर फार डेवलप्ड झालेले आहेत, म्हणून लगेच निंदा करतात की, असे कसे चालेल? म्हणजे हे लोक तर गुरुंचेही न्यायाधीश! निंदा करायला लावण्याऱ्या या

बुद्धीला दूर करा ना! या लोकांना पूर्व विराधक जीव का म्हटले आहे, तर जो कचरा राहून गेला होता, तोच आता या काळात आला आहे. चौथ्या आऱ्याचे, (कालचक्राचा बारावा हिस्सा) सत्‌युग, त्रेतायुग आणि द्वापार युगातील जे 'रबिश मटिरिअल' (कचरा) आहे, तेच आजचे जीव आहेत, ते विराधना करणारेच असतात. जे खायला देतात त्यांचीच विराधना करतात, गुरु शिकवितात, त्यांचीही विराधना करतात. आई-वडील खायला देतात, तरी पण त्यांच्याबद्दल वाईट बोलतात. शेजाऱ्यांना जाऊन सांगतात की, 'माझे पप्पा, मम्मीशी भांडतात, नालायक आहेत!' मग शेजारी त्यांना चिथावणी देतात. स्वतःच स्वतःच्या घरच्या गोष्टी बाहेर जाऊन सांगतात! 'सिन्सियारिटी' राहिलीच नाही या काळात.

## 'ज्ञानी पुरुषां'चा सिद्धांत कसा

ज्यांना पूज्य मानले ते मग कितीही वाईट वागले, तरी तू तुझी दृष्टी बदलू नकोस. माझा तर पहिल्यापासूनच असा सिद्धांत आहे की ज्या रोपाला पाणी घालून मी वाढवले असेल, आणि नंतर जर मला तिथून रेल्वे लाईन टाकायची असेल तरी ती मी दुसऱ्या बाजूने वळवेन, पण मी वाढवलेले रोप उपटून टाकणार नाही! सिद्धांत असला पाहिजे. एकदा मंडन (स्थापना) केल्यानंतर कधीच खंडन करता कामा नये. खंडनाची गोष्ट तर सोडा पण तुमची भेट झाल्यापासून तुमच्याबद्दल माझा जो अभिप्राय बनला आहे तो क्षणभरही बदलत नाही! आज मी ठरविले की हा माणूस चांगला आहे, मग त्या माणसाने माझ्या पाकीटातले पैसे घेतले असेल, आणि कोणी येऊन मला सांगितले की मी स्वतः याला चोरी करताना पाहिले आहे, तरी देखील मी म्हणणार की तो चोर नाही. कारण आमची समज वेगळी आहे. ती व्यक्ती नेहमीसाठी कशी आहे ते आम्ही पाहिलेले आहे, मग संयोगवश ती व्यक्ती काहीही करो, त्याची नोंद (आत्यंतिक राग किंवा द्वेष करून फार काळ लक्षात ठेवणे) आम्ही घेत नाही. सर्व जग संयोगवश झालेल्या गोष्टीच लक्षात ठेवते. मुळात पूर्वविराधक जीव असल्यामुळे त्यांना विराधना करण्याचे विचार येतातच. पण त्यात आम्ही त्यांना दोषी मानत नाही. आम्ही असे सांगतो की, विराधनेचे विचार तर तुम्हाला येतीलच पण विराधनेमध्ये 'आपण' एकाकार होऊ नये, तद्रूप होऊ नये.

प्रत्येक चूक संपवल्यानंतरच मोक्षाला जाऊ शकू. चूक संपवल्याशिवाय मोक्षाला जाता येणार नाही.

कसेही संयोग आले तरी, स्थिरतेचा भंग झाला नाही, ध्येयात बदल झाला नाही, तर धर्म प्राप्त झाला असे म्हणता येईल. लोक तर अब्रू राखण्यासाठी चांगले वागतात, किंवा मग चुकीच्या मार्गाने नेणारे संयोगच आले नाहीत म्हणून चांगले वागतात! आपल्या सर्वांचे ध्येय 'शुद्धात्मा' आणि मोक्ष हे आहे, त्यामुळे दुसरे काही स्पर्शतच नाही. पर-परिणती स्पर्शतच नाही. तुम्ही तर सध्या दिवसभर पर-परिणतीत असता आणि तरी मोक्ष शोधत आहात? मोक्ष मिळवायचा असेल तर ते एकच ध्येय असले पाहिजे.

## धर्माचे मर्म

धर्म तर बाहेरच्या जगातही आहे. एवढे सारे लोक धर्मासाठी जातात, देवळात जातात, उपाश्रयात जातात, त्या सर्व ठिकाणी धर्म आहे, पण मर्म राहिले नाही, तिथे मर्मासारखे काहीच नसते. एखादा मोठा हापूसचा आंबा असेल पण कापल्यावर त्यात फक्त कोय आणि साल ह्या दोनच वस्तू मिळाल्या तर त्यात काय मर्म राहिले? त्याचप्रमाणे धर्म राहिला आहे, पण धर्माचे मर्म राहिले नाही. धर्म म्हणजे सत्याचा शोध आरोपित भाव ठेऊन करणे, आणि 'हे' तर सायन्स आहे! जो आध्यात्मिकतेची साधने प्राप्त करवितो, तो धर्म.

## ...त्याची जाणीव होणे, ही देखील मोठी जागृती

गुरुंचीच विराधना, म्हणजे ज्यांच्याकडून थोडेफार प्राप्त केले होते, एक आणा-दोन आणा इतके, त्यांची स्वत:च विराधना करतात. अर्थात ज्याच्यामुळे मंडन होणार होते त्याचेच खंडन करतात, त्यांना पूर्वविराधक जीव म्हणतात. या काळात पूर्वविराधक जीव आहेत. मी सुद्धा त्यातलाच होतो. मला असे भान झाले की 'मी पूर्वविराधक आहे.' याचे भान झाल्यानंतर मला हे ज्ञान झाले.

## गुरुंना ओळखणे...

**प्रश्नकर्ता :** समज नसल्यामुळे गुरुंना ओळखल्याशिवाय गुरु केले आणि नंतर समजले की हे गुरु योग्य नाहीत, तर काय करावे?

**दादाश्री :** गुरुंना ओळखावे लागत नाही, गुरुंच्या प्रती आपला भाव उत्पन्न होत असतो, म्हणूनच आपण त्यांना गुरु करतो. गुरुंना ओळखणे हे तर कोणालाच जमत नाही. तसा रत्नपारखीपणाच नाही ना कोणाकडे? काच घेऊन येतील असे हे लोक आहेत. यांना हिऱ्याची पारख तर करता येते पण माणसाची पारख कशी करायची? हे काय होते की भाव निर्माण होतो आणि कुणाला तरी गुरु करून टाकतात, 'साहेब आजपासून तुम्ही माझे गुरु.'

**प्रश्नकर्ता :** हो, पण त्यांना गुरु केले म्हणून शेवटपर्यंत त्यांच्याबरोबर राहिले पाहिजे?

**दादाश्री :** गुरु केल्यावर त्यांचे उदयकर्म बदलले आणि त्यांना वेड लागले तर काय त्यांचे गुरुपद निघून गेले? उदयकर्मानुसार ते वेडेपणा करतात, पण जो शिष्य त्यांचे गुरुपद सांभाळतो, त्याला भगवंताने आराधक पद मानले आहे. ज्याची आराधना केली त्याची विराधना करू नये.

**प्रश्नकर्ता :** असेही म्हणतात ना की गुरुशिवाय ज्ञान कसे मिळेल?

**दादाश्री :** गुरु तर रस्ता दाखवतात, मार्ग दाखवतात आणि 'ज्ञानी पुरुष' ज्ञान देतात. 'ज्ञानी पुरुष' म्हणजे ज्यांना आणखी काहीच जाणण्याचे शिल्लक राहिले नाही, स्वतः तद्स्वरूपात बसले आहेत ते. म्हणजेच ज्ञानी पुरुष तुम्हाला सर्व काही देतात आणि गुरु तुम्हाला संसारात मार्गदर्शन करतात, त्यांनी सांगितल्याप्रमाणे वागलो तर संसारात सुखी होता येते. पण तिथे ही दुःखे, ही उपाधी जात नाहीत ना? ही उपाधी तर कायमची चिकटूनच असते. हे सगळे जण गुरुंची भक्ती करतात, त्यामुळे फार फार तर थोडेसे सांसारिक सुख मिळते, पण उपाधी जात नाही. आधी, व्याधी आणि उपाधीतही समाधी प्राप्त करवून देतात ते 'ज्ञानी पुरुष.'



# [ 21 ]
# तपश्चर्येचा हेतू

## तप, त्याग आणि उपवास

**प्रश्नकर्ता :** व्रत, तप, नियम आवश्यक आहेत की अनावश्यक?

**दादाश्री :** असे आहे की, केमिस्टकडे जेवढी औषधे असतात ती सर्व गरजेची असतात, पण ती लोकांसाठी गरजेची आहेत, तुम्हाला जे औषध गरजेचे आहे तेच तुम्ही घ्यावे. तसेच व्रत, तप, नियम या सर्वांची गरज आहे. या जगात काहीही चुकीचे नाही. चोरी करतात तेही चुकीचे नाही, इन्कमटॅक्स वसूल करतात तेही चुकीचे नाही. आपला खिसा कापला जातो तो तर निसर्गाचा टॅक्स आहे. चोर लोकच तर त्या टॅक्सची वसुली करणारे आहेत त्यात काही वावगे नाहीच. जप, तप काहीच वावगे नाही. पण प्रत्येकाच्या दृष्टीने प्रत्येकाच्या अपेक्षेप्रमाणे सत्य आहे.

**प्रश्नकर्ता :** मग जप-तप करणे जरूरी आहे की नाही?

**दादाश्री :** नाही, केमिस्टकडे सर्व औषधे असतात, म्हणून काय सर्व औषधे आपल्याला प्यायची गरज आहे का? तुम्हाला जेवढा आजार असेल तेवढेच औषध, एक-दोन बाटल्याच घ्यायच्या असतात. सर्वच बाटल्या घेतल्या तर मरून जाल! जप-तपाचा शौक असेल तर करा.

**प्रश्नकर्ता :** जप-तप करण्याचा शौक असतो?

**दादाश्री :** शौक असल्याशिवाय कोणी करतो का? असे आहे की स्त्रियांचा शौक, दारूचा शौक, विडीचा शौक, हे सर्व शौक अशुभ आहेत. रोज-रोज करावे लागते, त्याला शौक म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** जप-तपामुळे कर्म बंधन होते का?

**दादाश्री :** त्यामुळे कर्मबंधनच होते ना? प्रत्येक गोष्टीचे कर्म बंधन होते. रात्री झोपले तरी त्याचे कर्मबंधन होते. आणि जप-तप करतात त्याने तर कर्मबंधन खूपच होते. पण ते पुण्यकर्म बांधले जाते, त्याने पुढील जन्मात भौतिक सुखे मिळतात.

हा सगळा वीतराग मार्ग लाभालाभाचा आहे. धर्मात पाच आणे देखील सोडू नका. उपवास केला तर 'दोन उपवास केले, तीन उपवास केले' असे सांगत फिरतो. आणि मुलगा समोर आला की त्याला, 'काय रे, आज सकाळी दुकानात का गेला नाहीस? अशी कटकट करतो. अरे, दुकानाशी तुला काय करायचे आहे? तू आपला उपवास कर ना! मुलगा म्हणतो, 'आज जरा मला जायला जमले नाही.' तरी वडील कटकट करीतच राहतात. तिथे आजीबाई खोलीत उपवासाला बसल्या असतील आणि दुसऱ्या खोलीतून भांड्यांचा आवाज आला तर लगेच 'अरे, काय झाले? काय फुटले?' करतील. अहो आजी, तुमचा आत्मा फुटला! एक ग्लास फुटला तर लगेच त्यावर चित्त जाते. अशा लोकांचे फक्त नुकसानच होते.

## प्राप्त तप

असे आहे, की या काळातील जीवांनी जाणुनबुजून तप करायचे नाही आणि अजाणतेपणी जे तप वाट्याला येईल, आपोआप येईल ते करावे, असे म्हटले आहे. कारण या दूषमकाळात एक तर मनुष्य आधीच त्रासलेला असतो, मग घरी असो, बेडरूमध्ये असो वा उपाश्रयात असो, पण असतो तापलेलाच. मग तापलेल्याला आणखी अधिक तापवणे याला काय अर्थ आहे? डोके कापून पगडी घालण्यासारखे आहे हे. पेला फुटला, तर तप करावे. मुलगा दुकानात गेला नाही, तर तप करावे. प्रतिकूल परिस्थितीत जेव्हा आपली प्रकृती उचल खाते तेव्हा आत खळबळ माजते, त्यावेळी तप करावे. या काळात समोरून आलेली तपे करायची असतात. सत्युगात तर शेठला आयुष्यभर हे कळतही नव्हते की 'घरात तांदूळ कुठून येतात आणि काय भावाने येतात?' आपोआप येतच असे. आणि आज तर घरातील सर्व लोकांना कळते की आता

रेशन आणायला गेले आहेत, तांदूळ आणतील, साखर आणतील. पाहा किती पुण्यशाली (!) लोक आहेत हे. अरे! मोठमोठी बारा-बारा मजल्यांची घरे बांधतात तरी पण त्यांचे पुण्य किती कच्चे असते?

## 'ज्ञानीं'ना त्यागात्याग?

वीतराग मार्गाच्या मनुष्याचे जीवन उपयोगमय असले पाहिजे. तो उपयोग कसा असतो की अशुभ होत असेल तरी त्यातून शुभ ग्रहण करतात.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानींना 'त्यागात्याग' नसतो, हे समजवावे.

**दादाश्री :** म्हणजे असे की, समजा येथे जेवणाचे ताट आले आणि त्यात कढी थोडी आंबट असेल, तर ज्ञानी त्याचा निपटारा करतात. आणि खूप चांगली, स्वादिष्ट असेल तरी पण त्याचा निपटारा करतात. तिथे 'याचा मी त्याग केला आहे' असे म्हणत नाहीत. त्याग म्हटले की तिरस्कार आला आणि अत्याग हा राग (मोह, आसक्ती) आहे. 'ज्ञानीं'ना राग-द्वेष वगैरे काहीच नसतात, म्हणून 'ज्ञानीं'ना 'त्यागात्याग' संभव नाही. जे आले त्याचा वीतराग भावाने स्वीकार करतात आणि त्याचा निपटारा करून टाकतात. आपल्याला निकाल करून निपटारा करायचा आहे.

हे लोक जो त्याग करतात, त्याला भगवंत त्याग म्हणत नाहीत. भगवंतांनी वस्तूबद्दल असलेली मूर्च्छेच्या त्यागाला त्याग म्हटले आहे. या 'दादां'कडे सर्व काही आहे. अमके आहे, व्यापार आहे, त्यांच्या नावाने व्यापार चालतो, त्यांच्या नावाचे चेक चालतात. 'दादां'नी कशाचाही त्याग केलेला नाही. पण त्यांना कसलीही मूर्च्छा नाही, म्हणून त्यांचा सर्वस्व त्याग आहे. आणि साधू महाराज म्हणतात ना की, 'हे गाव माझे जन्मस्थळ आहे', तर असे बोलायचे नसते. त्यागी आहेत पण आतल्या आत सर्व भरलेलेच असते, मूर्च्छा तुटली नाही. आणि आम्ही जे सांगतो त्यात काहीही त्याग करण्यासारखे नाही. कशाचा त्याग करायचा नाही? तर वस्तूचा त्याग करायचा नाही, पण मूर्च्छेचा त्याग करायचा आहे. मूर्च्छा कशाला म्हणतात? मोहनीय कर्माला. लोकांनी खूप वस्तूंचा त्याग केला आहे, पण वस्तू तर पूर्णपणे उभीच राहिली आहे. त्याचे कारण

वस्तूची मूर्च्छा गेली नाही. स्वरूपज्ञान प्राप्त झाल्यावर तुम्हाला आता मूर्च्छा राहत नाही. कारण तुम्ही आता शुद्धात्मा झाला आहात. शुद्धात्मा झालात त्यामुळे सर्व मूर्च्छा गेली. तुमचे मोहनीय कर्म पूर्णपणे नष्ट झाले आहे. त्याशिवाय शुद्धात्म्याचे लक्ष बसत नाही. तीळभरही मोहनीय कर्म असेल तोपर्यंत शुद्धात्म्याचे लक्ष बसत नाही.

## शुद्धात्म्याचे लक्ष

**प्रश्नकर्ता :** दादा, शुद्धात्म्याचे लक्ष बसणे, म्हणजे शुद्धात्मा अनुभवास येतो तेव्हा लक्ष बसले असे म्हणतात का?

**दादाश्री :** रात्री तुम्ही झोपलात आणि जाग आल्यावर सर्वप्रथम आपोआप तुम्हाला काय लक्षात येते?

**प्रश्नकर्ता :** 'मी शुद्धात्मा आहे' हेच येते.

**दादाश्री :** आपोआप 'मी शुद्धात्मा आहे' असे आले तर लक्ष बसले असे समजावे. त्याची आठवण करावी लागत नाही. आठवण तर, जर स्मरण शक्ती नसेल तर आठवण येणारही नाही. लक्ष म्हणजेच जागृती. आणि आपल्याला तर अनुभवसुद्धा आहे. अनुभव-लक्ष-प्रतीती हे तिन्ही आपल्याला आहेत. आत्म्याचा अनुभव आल्यानंतरच समभावाने क्रिया होतात, प्रवर्तन होते.

## 'दादाई' एकादशी

हे एकादशी करतात, ते देखील सायंटिफिक आहे. ही दादांची एकादशी आयुष्यात एकदा जरी केली तर कल्याण होते. एकदा तरी 'दादां'च्या नावाने एकादशी केली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** 'दादां'ची एकादशी कशा प्रकारे करावी?

**दादाश्री :** पाच कर्मेंद्रिय, पाच ज्ञानेंद्रिय आणि अकरावे मन यांना निराहारी ठेवणे. डोळे, कान, मुख, स्पर्श ही ज्ञानेंद्रिये आणि हात-पाय, शौच, वगैरे सर्व कर्मेंद्रिये आणि अकरावे मन, यांना एक दिवस उपाशी ठेवावे, कानांनी ऐकू तर येईल पण आपण ऐकायचे नाही, डोळ्यांनी

दिसेल पण आपण उठून पाहायला जायचे नाही.दिवसभर काहीच करायचे नाही, मनाला अजिबात आहार द्यायचा नाही.

**प्रश्नकर्ता :** हिंडू-फिरू शकतो?

**दादाश्री :** नाही. काहीच करायचे नाही.

**प्रश्नकर्ता :** झोपू शकतो?

**दादाश्री :** पडू शकता.

**प्रश्नकर्ता :** झोप आली तर?

**दादाश्री :** तर मग परत उठून बसायचे. चोवीस तास निरंतर जागृतीत काढायचे. अशी एकच एकादशी कराल तर आत्मा वेगळाच होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** याचे पालन करणे कठीण आहे.

**दादाश्री :** तुम्ही निश्चय केला तर पालन होईलच. तुमचा निश्चय आणि आमचे वचनबळ असते म्हणून पालन होईलच.

**प्रश्नकर्ता :** उपवास करायचा असेल तर आपली आज्ञा घेऊनच केला पाहिजे का?

**दादाश्री :** आम्ही कुणाला अशी आज्ञा देत नाही की तू उपवास कर. पण तुम्हाला उपवास करायचा असेल तर तसा निश्चय करून आमच्याकडून आज्ञा घ्यावी. आज्ञेने, वचनबळाने तुमचे काम पूर्ण होत असते.

**प्रश्नकर्ता :** कधी 'दादा' इथे मुंबईत नसतील आणि उपवास करण्याची इच्छा झाली, तर दादांच्या फोटोजवळ आज्ञा घेता येते का?

**दादाश्री :** हो, आज्ञा घेऊन उपवास केला तर चालेल. तुम्ही बोलावले तर मी हजर होईन असे आहे, पण तुम्हाला बोलवता येत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** पाच कर्मेंद्रिय, पाच ज्ञानेंद्रिय यांचे तर ठीक आहे पण मनाचे काय दादा? त्याचे भ्रमण तर चालूच असते ना?

**दादाश्री :** करू दे ना भ्रमण. आपण त्याला आहार द्यायचा नाही. त्याला निराहारी ठेवावे. मग ते उड्या मारो की बसून राहो, पण आपण त्याला आहार द्यायचा नाही, हातांना आहार द्यायचा नाही, डोळ्यांना आहार द्यायचा नाही, त्यादिवशी नुसते बसून राहावे. पायांना देखील आहार द्यायचा नाही, पुस्तक घेऊन बसायचे नाही, फक्त 'दादा, दादा' बोलत राहावे. ते देखील तोंडाने बोलायचे नाही, मनात 'दादां'चे स्मरण होत राहते. अशी जर एक एकादशी केली तर एकठोक फळ मिळेल. पण हे तर एकादशीला भगर, लाडू, शिवाय तुपातल्या पुऱ्या, आमटी, वेगवेगळ्या भाज्या खातात, म्हणजे उलट त्या दिवशी जास्तच खातात.

**प्रश्नकर्ता :** तप केले, उपवास केला, आयंबिल केले तर त्याने काय फायदा होतो?

**दादाश्री :** त्याने शरीर शुद्धी होते आणि मन देखील शुद्ध होते. वाणी पण चांगली होते आणि कदाचित वाणी बिघडूनही जाते. चांगले खाऊ घातल्यानंतर बोलायला सांगितले तर बोलणार नाही. आणि भुकेला असेल तर तणतण करत बसेल.

## आयंबिल : एक सायंटिफिक प्रयोग

**प्रश्नकर्ता :** हे जे आयंबिल करतात, ते महावीर भगवंतांच्या काळापासून आहे? केव्हापासून आहे हे?

**दादाश्री :** आयंबिल तर सायन्स आहे. ते ऋषभदेव भगवंतांच्या काळापासून आहे. पण ते आत्मधर्माच्या हेतूसाठी नाही, शरीरधर्माच्या हेतूसाठी आहे. ते शरीर स्वस्थ ठेवण्यासाठी आहे. ज्याच्या शरीरात विषारी द्रव्य आहेत किंवा ज्याचे शरीर स्वस्थ नाही, त्याने आयंबिल करावे. पण ते पद्धतशीरपणे केले पाहिजे. एकच पदार्थ, एकच धान्य खातात, दुसरे धान्य खात नाहीत. आयंबिलबद्दल तर अगदी खरेच सांगितले आहे. तीर्थंकर भगवंतांच्या महालातील 'हे' एक पूर्ण दालन मात्र खरे राहिले आहे. बाकी सगळे उध्वस्त झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** आयंबिलमध्ये जे विधी करतात, माळ जपतात, ते सगळे योग्य आहे?

**दादाश्री :** आयंबिलचा आणि त्याचा काहीही संबंध नाही. तो परत वेगळा भाग झाला. आयंबिल म्हणजे काय की, एकावेळी एकच धान्य खाणे आणि भगवंतांचा मंत्रजाप करत राहणे. आयंबिल म्हणजे जरी मंत्रजाप करत नसेल पण नुसते एकच धान्य दिवसात एकदाच खाल्ले तरी देखील त्याला आयंबिलच म्हणतात. हे तर कुणीही करू शकतो. एकच धान्य खाणे, हे तर शरीराचे मोठे तप आहे. त्याने शरीरातील सर्व प्रकारचे विष, विषद्रव्य जळून नष्ट होतात. हे फार उत्तम आहे. हा तर तीर्थंकर महाराजांचा सायंटिफिक शोध आहे! म्हणून मी जैनांना सांगतो की तुम्ही इतके भाग्यशाली आहात, की हे आयंबिल अजून तुमच्याकडे टिकून राहिले आहे. अजूनही एक धान्य खातात आणि त्यांचे शरीर स्वस्थ राहते. आयंबिलमुळे त्वचेचे कित्येक रोग नाहीसे होतात. कुष्टरोगावर देखील ते लाभदायक आहे.

**प्रश्नकर्ता :** खूप लोक आयंबिल वर्षानुवर्षे करतात, त्याने काय फायदा होतो?

**दादाश्री :** आयंबिल काही काळापुरतेच केले तर फायद्याचे आहे, दीर्घ काळापर्यंत केले तर उलट नुकसान होते. शरीरातील इतर द्रव्ये, व्हिटॅमिन्स यांची कमतरता होते. सर्व काही नॉर्मालिटीत असले पाहिजे.

## उपवासात उपयोग

**प्रश्नकर्ता :** उपवास तीन दिवस, नऊ दिवस, एक महिना, तीन महिन्यांचा करतात, ते काय आहे?

**दादाश्री :** उपवास करणे चांगलेच आहे, पण ज्याने खूप पक्वान्ने खाल्ली आहेत त्यांच्यासाठी उपवास आहे. हे बिचारे राशनचे धान्य खाऊन जगतात, त्यांना कसला उपवास? भगवंतांनी उपवास करण्यास सांगितले हे चुकीचे नाही. भगवंतांनी म्हटले आहे की, 'उपवास करा'. पण मग उपवासाच्या सार रूपाने जर आत्मा प्राप्त झाला नाही तर उपवास वाया गेले म्हणायचे. उपवासाचे सार म्हणून आत्मा प्राप्त झाला नाही, आत्म्याचे समकितसारखे काही झाले नाही, तर उपवासाचे सांसारिक फळ मिळेल, पुण्य मिळेल. हे तर अनंत जन्मांपासून उपवास करत

आहेत. पण भगवंतांनी त्याला न समजता उपाशी मरणे म्हटले आहे. कारण उपयोग नसलेले उपवास केले, म्हणून सर्व वाया गेले!! तसे तर तप करणाऱ्यांसोबत बसलो तर आपल्याला तप करणे जमेलच. आत्मा तर आहारी नाहीच, हा देहच आहारी आहे. पण एकदा आत्म्याचे ज्ञान झाल्यावरच हे सर्व स्पष्ट होते, त्याशिवाय स्पष्ट होतच नाही.

भगवंतांनी म्हटले आहे की उपयोगपूर्वक एक जरी उपवास झाला तरी काम होईल. तुम्हाला स्वरूप ज्ञान प्राप्त झाले आहे, म्हणून तुमच्याकडून तर शुद्धात्म्याचा उपयोगपूर्वक उपवास होऊ शकतो. शुद्ध उपयोगपूर्वक होऊ शकतो. तुमच्या हाती तर 'वस्तू' (आत्मा) आली आहे. पतंगाची दोरी तुमच्या हाती आहे. आता त्याला कोलांट्या खाऊ न देणे, हे तुमच्या हाती आहे. एक उपवास होत असेल तर एक, पण करून तर बघा. मग त्याची 'टेस्ट' तर बघा! रविवार असेल-कुठे जायचे नसेल, तेव्हा करा. पण त्यात झोपा काढायच्या नसतात. झोपण्यात उपयोग राहत नाही ना? आणि हा उपवास तर शुद्ध उपयोगपूर्वक करायचा आहे. त्यात पूर्ण दिवस कविराजांची भक्ती पदे वाचली तर बाहेरून शुद्ध आणि आतूनही शुद्ध राहील. किंवा मग आमच्या पाच आज्ञांचा आधार घ्यावा. अशाप्रकारे पूर्णदिवस शुद्ध उपयोगात घालवला तर तुम्हाला उपवास केले असे वाटणारही नाही. भूक लागली असे जर वाटले तर शुद्ध उपयोग राहिला नाही असे समजावे, तरच असे वाटते. भूख लागली आहे हे जाणतो जरूर पण वेदत नाही. वेदले तर उपयोग चुकला म्हणायचे आणि 'जाणले' तर उपयोगपूर्वक आहे असे म्हणता येईल. कित्येकांना उपवासाच्या दिवशी खूप छान वाटते, शाता वेदनीय वाटते. म्हणजे हे 'बिलीफ'वर आधारित आहे.

**प्रश्नकर्ता :** 'दादा', उपयोग तर आता कुठेही राहिला नाही, म्हणून तर उपयोगाबद्दल कोणी काही बोलतच नाही.

**दादाश्री :** उपयोग कुठेही राहिला नाही. म्हणून उपयोगाबद्दल कोणी काही बोलतच नाही. उपयोगाचा उपयोग बंद झाला आहे, म्हणून त्याला एका बाजूला सारून दिले आहे! परंतु जर उपयोगाविषयी समजावून सांगितले तर ते सोपे नाही का?

**प्रश्नकर्ता :** हो, समजावून सांगितले तर सोपे आहे.

**दादाश्री :** भगवंतांनी सांगितले, की अशुभातून शुभ केले तरी ते उपयोगपूर्वक कर, आणि शुद्धमध्ये आलास तर मग तू शुद्ध उपयोगी-म्हणजे परमात्मस्वरूप झालास. तात्पर्य हेच की उपयोग ठेवायला सांगितले आहे. तसे तर सर्व काही होत असते, पण त्याला काही अर्थ नाही. तरी पण त्याचे फळ मिळेल, कोणाचे काही वाया जाणार नाही. शुद्ध उपयोग 'आम्ही' एका मिनिटासाठी देखील चुकलो नाही, कधीच नाही. आम्हाला केवळ शुद्ध उपयोगच असतो. शुभ उपयोग तर आता आमच्यासाठी कामाचा नाही.

*'शुद्ध उपयोगी ने समताधारी, ज्ञानध्यान मनोहारी,*
*कर्म कलंक को दूर निवारी, जीव वरे शिवनारी.'*

**प्रश्नकर्ता :** 'स्वरूपज्ञान' प्राप्त झालेल्या आपल्या महात्म्यांनी उपवास केला तर?

**दादाश्री :** खूप फायदा होईल. एका उपवासात एका वर्षाचे फळ मिळेल, पण फार जागृती ठेवावी लागते.

भगवंतांनी म्हटले आहे की एक उपवास शुद्ध उपयोगपूर्वक केला तर पूर्ण वर्षभराचा शुद्ध उपयोग एकदम गोळा होतो. उपवास करण्यासाठी आदल्या रात्री (तोंडावर) कुलूप लावायचे. रात्री निश्चय करून झोपावे की, उद्या शुद्ध उपयोगपूर्वक उपवास करायचा आहे. आमची आज्ञा घेतल्यानंतर 'मी शुद्धात्मा आहे', 'मी शुद्धात्मा आहे' या लक्षामध्ये संपूर्ण दिवस राहावे, आणि आमच्या पाच आज्ञांमध्ये राहावे. याप्रमाणे छत्तीस तास तोंडावर कुलूप लावून उपवास केला तर त्याला वर्षभराचा शुद्ध उपयोग प्राप्त होतो. आणि भगवंतांनी सांगितले आहे की जर तुला ज्ञान नसेल आणि उपवास केलास तर तुला भुकेला राहण्याचे फळ मिळेल, तुला ताप आला असेल तर तो बरा होईल. काही लोक तर रथावर बसण्यासाठी उपवास करतात. अरे, तुझी तर हाडे दिसत आहेत, मग तू हे कशाला करतोस? हे तर एखाद्या जाडजूड माणसासाठी कामाचे आहे.

भगवंतांनी सांगितलेला उपवास चुकीचा नाही. तो तर खूपच चांगला आहे, पण ते कोणाला करायला सांगितले होते? तुम्हाला मी 'स्वरूपज्ञान' दिले आहे, म्हणून जर तुम्ही उपवास केला तर तो भगवंतांनी सांगितल्याप्रमाणे होईल. नाही तर ज्यांनी शुद्ध तूप खाल्ले असेल, सकाळी शुद्ध दूध प्यायले असेल, जेवणात शुद्ध तूप वापरले असेल, म्हणजे ज्या काळात कंट्रोलचे धान्य नव्हते, कंट्रोलचे तूप नव्हते, भेसळीचा माल नव्हता, त्याकाळी जे भोजन करीत असत त्यांना भगवंतांनी उपवास करायला सांगितले होते. आजचे जीव तर भुकेले आहेत, त्यांनी कशाला उपवास करायचा? या लोकांमध्ये ताकदच कुठे आहे? यांची तर सर्व हाडे दिसतात. दोन-तीन उपवास केले तर हरकत नाही.

## ...एकही उपवास झाला नाही

**प्रश्नकर्ता :** आपण ज्ञानी होण्यासाठी किती उपवास केलेत?

**दादाश्री :** शपथ घेण्यापूरताही मी एक उपवास करायला हवा होता, पण तो ही झाला नाही. आम्ही निरंतर उणोदरी तप करीत असतो. हा आमचा शोध आहे. निरंतर उणोदरी हे कायमच्या उपवासासारखे आहे. ह्या बाराही प्रकारची तपे करायला गेलो तर कधी अंत येईल?

## उणोदरी - जागृतीचा हेतू

**प्रश्नकर्ता :** जीवनात मोक्षमार्गावर पुढे जाण्यासाठी उपवास करता येत नसेल तर यथाशक्ती काय केले पाहिजे?

**दादाश्री :** उणोदरी करा.

**प्रश्नकर्ता :** उणोदरीचा अर्थ काय?

**दादाश्री :** तुम्ही चार चपात्या खात असाल तर आधी तीन खा, मग दोन खा, त्याला उणोदरी म्हणतात. हे पोट काही गच्च भरून टाकण्यासाठी नाही!

**प्रश्नकर्ता :** पण पुरेसे भोजन भरले नाही तर धर्माचा पुरुषार्थ कसा होईल?

**दादाश्री :** उणोदरी अर्थात भूक लागल्यावर खावे, रिकाम्या पोटी धर्म करा असे सांगितलेले नाही. उणोदरीमुळे डुलकी येत नाही. उणोदरी सर्वात चांगली गोष्ट आहे. जेवणाचे चार भाग करायचे. दोन भाग पोळी-भाजीसाठी, एक भाग पाण्यासाठी आणि एक भाग रिकामा ठेवावा, वायु-संचारासाठी, नाही तर जागृती संपून जाईल. जागृती सुटत नाही त्याला उणोदरी म्हणतात. उपवास तर इथे (पोटात) जास्त भरले गेले असेल, शरीर बिघडले असेल तर करावा. उपवास अनिवार्य नाही.

## 'उपवास', तरीही कषाय

**प्रश्नकर्ता :** मी ज्या दिवशी उपवास करतो त्या दिवशी मला असे वाटते की सकाळी उठल्यावर 'कोणीतरी माझी कामे करून दिली तर बरे होईल.'

**दादाश्री :** असा भिकारीपणा करण्यापेक्षा तर तप न केलेलेच बरे! भगवंतांनी स्वाश्रयी न बनता पराश्रयी व्हा असे सांगितलेले नाही.

**प्रश्नकर्ता :** उपवास केला असेल आणि काही खावेसे वाटले, तर लक्षात येते की आज तर माझा उपवास आहे, पण घरच्यांना सांगावेसे वाटते की 'माझ्या आवडीचा पदार्थ ठेवून द्या, मी उद्या खाईन' असे केले तर त्याचा दोष लागतो की नाही?

**दादाश्री :** त्यापेक्षा तर खाणारा खाऊन मोकळा होतो आणि न खाणाऱ्यावर कर्म बंधन पडते, त्याला बंधन नावाचा दोष लागतो. खाणारा खातो आणि बांधला जात नाही. तो तर खातो नंतर त्याला विसरूनही जातो. आणि 'उद्या खाईन' म्हणणारा तर खात नाही, तरी पण त्याला चिकटून राहतो, त्यामुळे तो बंधनात येतो. अर्थात हा खोटेपणा जेव्हा उदयास येईल तेव्हा तो चार पायात (पशुयोनीत) असेल. यालाच धर्मात वेडेपणा घुसला आहे असे म्हणतात ना? अरे, ही तर मोठी जोखीम ओढवली असे म्हणावे लागेल. 'उद्या खाईन' म्हटले की रात्री तेच आठवते, 'फ्रीजमध्ये ठेवले आहे, उद्या मी खाईन' असे सतत ध्यानात राहते. आता हे ध्यान काय करत नाही? दोन पायांचे चार पाय करते. दोन पायांमुळे पडायला होत असेल त्यापेक्षा चार पाय झाले की मग पडणार तर नाही ना?

हा तर उपवास करतो आणि त्याबरोबर कषाय ही करतो. कषाय करायचे असतील तर उपवास करू नकोस आाणि उपवास करायचा असेल तर कषाय करू नकोस. आर्तध्यान आणि रौद्रध्यान न करता उपवास केला पाहिजे. हा तर ज्या दिवशी उपवास नसेल, त्या दिवशी जर दोन वाजेपर्यंत जेवण मिळाले नाही तर बोंबाबोंब करील, भोवरा उसळत राहील आणि ओरडत राहील की हे गावच असे आहे, इथे साधे हॉटेलसुद्धा नाही! खरे तर, त्यावेळी त्या ठिकाणी सांभाळून घेतले पाहिजे. अरे, आज वीतरागांनी सांगितलेला उपवास कर ना, मग मन उसळ्या मारणार नाही. आणि लग्न प्रसंगात खाण्या-पिण्याचे चांगले-चांगले पदार्थ असतील, तेव्हा 'आज माझा उपवास आहे' असे म्हणून बाजूला होईल. लोक हे असे झाले आहेत!! लोकांना भानच नाही की कुठल्या संयोगात उपवास करायला हवा. जेव्हा जेवण मिळाले नाही किंवा मनासारखे जेवण मिळाले नसेल तेव्हा तू तप कर. तसे तर त्याला जेवण वेळेवर मिळतच असते. आणि जेव्हा नाही मिळाले तेव्हा तू समजून घे की, आज काय जेवणाची सोय होईल असे वाटत नाही, म्हणून आज उपवास. पण शेठ काय करतात की भूक लागल्यावर लक्ष्मी लॉज पाहून वर जातात आणि म्हणतात, 'अरे, हे तर घाणेरडे आहे, हे लोक तर घाणेरडे दिसत आहेत.' आणि मग खाली येऊन कषाय करतात. खाणे-पिणे, सगळे मसाले तुमच्यासाठी तयार आहेत, कंटाळून जाल इतक्या साऱ्या वस्तू आहेत. पण तरी मिळत का नाहीत? कारण सोबत अंतराय घेऊन आले आहेत. बत्तीस-बत्तीस प्रकारचे भोजन मिळू शकेल असे आहे. पण यांना शुद्ध तूप घातलेली खिचडीदेखील मिळत नाही, कारण अंतराय घेऊन आले आहेत.

भगवंतांनी कषाय करण्याची मनाई केली आहे. तप करताना कषाय करण्यापेक्षा तप न केलेलेच बरे. कषायांचीच फार किंमत आहे. तपात जितका लाभ आहे त्याहून अधिक कषायात नुकसान आहे. हा वीतरागांचा धर्म लाभालाभवाला आहे. म्हणजे शंभर टक्के लाभ असेल आणि अठ्ठ्याण्णव टक्के नुकसान असेल तर दोन टक्के आपल्याकडे वाचले, असे समजून व्यापार केला पाहिजे. पण कषायांमुळे सर्व काही जळून

भस्मीभूत होऊन जाते. कषाय सर्व काही खाऊन टाकतात. कसे खाऊन टाकतात? तर जसे आंधळा दोरी विणतो आणि मागे वासरू सर्व खाऊन टाकते तसे. आंधळ्याला वाटते दोरी लांब होत आहे आणि वासरू दोरी खाऊन टाकते. तसेच हे सर्व अज्ञानक्रियेचे फळ आहे. एकदा समजून घेतले तर काम होईल. अनंत जन्मांपासून असेच करत आले आहेत. जप केले, तप केले, पण ते आज्ञापूर्वक केले नाही. स्वत:च्या मताने, स्वच्छंदपणे केले. डोक्यावर समकिती गुरु असेल तर त्यांच्या आज्ञेने केले पाहिजे. गुरु समकिती असले पाहिजेत, मिथ्यात्वी गुरु चालणार नाहीत. मिथ्यात्वी गुरु आपले मिथ्यात्व दूर करत नाहीत, तरीदेखील आपण त्यांची सेवा करावी. पण गुरु तर समकिती असले पाहिजेत, ज्यांना आत्म्याचे भान आहे असे गुरु केले तर आपले काम होईल. बाकी, मिथ्यात्वीची संगत केली तर आपला संघ काशीला पोहोचणार नाही आणि मध्येच कुठेतरी भटकत राहू! (ध्येय साध्य होणार नाही)

**प्रश्नकर्ता :** जागृतीपूर्वक उपवास कशाला म्हणतात?

**दादाश्री :** कोणी जागृत व्यक्ती असेल, त्याच्या निमित्ताने जर उपवास केला तर तो उपवास जागृतीपूर्वक केला असे म्हणतात. आता मी जागृत पुरुष आहे, जर माझ्या सांगण्यावरून उपवास केला तर तो जागृतीपूर्वक केलेला उपवास म्हटला जाईल.

**प्रश्नकर्ता :** जागृती प्राप्त होण्यापूर्वी ख्रिस्त आणि बुद्ध यांनीही उपवास केले होते ना?

**दादाश्री :** फक्त उपवासच नव्हे, तर दुसऱ्या बऱ्याच गोष्टी त्यांनी केल्या होत्या.

भोजन स्वत:च मादक गोष्ट आहे. कुठलेही भोजन असो, पण ते मादक असतेच, म्हणून त्याच्या मादकतेत सर्व मजा करत आहेत. उपवासामुळे त्याची सगळी मादकता उतरून जाते. पण त्यानंतर जर जागृतीला पोषण मिळाले नाही तर काही कामाचे नाही. उपवास शरीर स्वस्थ ठेवतो, मनाला देखील जरा बरे करतो, एवढेच. पण तो जागृत राहत नाही, त्याला परत झोप लागते. कारण केव्हा न केव्हा खाल्ल्याशिवाय

तर चालणारच नाही ना? आणि एकदा संपूर्ण जागृत झाल्यानंतर खाल्ले-प्यायले तरी काही हरकत नाही. एकदाचे डोळे उघडले की मग भले खात-पीत असला तरी त्याला काहीही बाधक होत नाही. ज्याला जे मानवेल ते भोजन तर घ्यावेच लागते. जर तुला मानवत असेल तर तपाचा खुराक घे आणि मानवत नसेल तर घेऊ नकोस. तप हा देखील खुराक आहे. तरी पण तुला जर अजीर्ण झाले असेल तर तू उपवास कर. भगवंत आणि भोजन यांचे काही देणेघेणे नाही. आत्म्याला उपवासाची काय गरज? हे तर उपवास करतात आणि म्हणतात आत्म्यासाठी करतो. आत्मा म्हणतो त्यात माझ्यावर काय उपकार केलेस? म्हणून तुम्हाला जेव्हा वाटेल की हे तप करावे, तेव्हा करा.

## उपवासामुळे मुक्ती?

या शरीराला रोजच खायला देत राहतो, त्याला एक दिवस निराहारी ठेवले तर शरीर चांगले राहील, मन चांगले राहील, सगळेच चांगले राहील त्यात काहीच हानिकारक नाही. ज्याला मोक्ष मिळवायचा आहे त्याला या सर्व गोष्टींची काही आवश्यकता नाही. आवश्यकता आहे, पण उपवासाचा अभिनिवेश होता कामा नये. मोक्ष मिळवायचा असेल तर 'मी बांधला गेलो आहे की नाही' हे इतकेच जाणून घ्यायला हवे. मग हे जाणून घ्यायला हवे की 'हे बंधन कसे तुटेल? बंधन कशामुळे पडले आहे? हे बंधन कशा प्रकारे तुटेल?' त्याचे उपाय समजून घेतले पाहिजेत.

बंधन तोडण्याचे उपाय तर जे मुक्त झाले आहेत त्यांना आपण विचारायला हवे की, 'साहेब तुम्ही मुक्त झाले असाल तर मी तुमच्याजवळ बसतो, नाही तर मला माझा वेळ फुकट घालवून काय फायदा? तुम्हीही बांधलेले आणि मी पण बांधलेला, तर आपले काम कसे होईल?' मी मुक्त आहे असे सांगणारे कोणी तुला भेटले नाही का?

**प्रश्नकर्ता :** हा आपला सत्संग मिळाला आहे ना?

**दादाश्री :** बस तर, 'आम्ही' मुक्त झालो आहोत असे आम्ही

म्हणतो! आणि तुला मुक्ती पाहिजे असेल तर ये. याची काही फी वगैरे नाही, आणि भगवंताच्या मोक्षमार्गात फी वगैरे काही नसतेच. कारण 'ज्ञानी पुरुष' कोणाला म्हणतात? तर ज्याला लक्ष्मीची भीक (तीव्र इच्छा) नसते, कीर्तीची भीक नसते, शिष्यांची, विषयांची भीक नसते, कुठल्याही वस्तूची भीक नसते, तेव्हा 'ज्ञानी' असे पद प्राप्त होते.

## 'करा', पण फळ श्रद्धेमुळेच

**प्रश्नकर्ता :** पण ज्योतिषी सांगतात की राहु आणि केतु बाधक आहेत, म्हणून बुधवारचे व्रत ठेवा.

**दादाश्री :** मग तुम्ही बुधवारचे व्रत करा. त्यात काय नुकसान आहे? ज्योतिष्याकडे गेलात तर आता बुधवारचे व्रत करा, नाही तर जाऊच नये. ज्योतिष्याला विचारायला गेला म्हणून संशय शिरला ना? तर आता बुधवारचे व्रत करा. नाहीतरी उपवासाने शरीराचा फायदाच होतो.

**प्रश्नकर्ता :** आमच्याकडे वंशपरंपरागत सोमवारचा उपवास असतो.

**दादाश्री :** तर करा. तुमचा विश्वास आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** विश्वास तर आहेच ना?

**दादाश्री :** जे करायचे ते विश्वासाने करावे आणि विश्वास ढळला तर करू नका. गाडीत बसतानाच असे वाटले की 'काल गाडी रूळावरून घसरली होती, आजही घसरली तर काय होईल?' तर त्याचक्षणी गाडीतून उतरून जावे. विश्वास नसेल तर काय कामाचे? विश्वास असेल तोवर करा, विश्वास नसेल तर सोडून द्या.

विश्वास कसा असला पाहिजे की कोणी आपल्याला मारले, अपमान केला, तरी आपला विश्वास ढळणार नाही. असा विश्वास असायला हवा.



# [ 22 ]
# लौकिक धर्म

## मोक्षासाठी कोणता धर्म?

**प्रश्नकर्ता :** साधकाने कोणत्याही धर्माचे योग्य रीतीने पालन केले तर तो मोक्षापर्यंत पोहोचेल ना?

**दादाश्री :** साधक तर पक्षपाती आहे आणि भगवंत कोणत्या पक्षाचे असतील? निष्पक्षपाती असतील ना ते?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** पक्षात अडकलेल्यांचा मोक्ष कधीही होत नाही. हो पण भौतिक सुखे मिळतात. स्टँडर्डवाल्यांना मोक्ष मिळत नाही. आउट ऑफ स्टँडर्ड झाला तरच मोक्ष मिळेल. इथे हे स्टँडर्डच्या बाहेर आहे. इथे सर्व येतात, मुस्लिम, जैन, वैष्णव सगळेच येतात!

हे जे वेगवेगळे धर्म आहेत-जैन धर्म, वैष्णव धर्म, मुस्लिम धर्म- हे सर्व 'रिलेटिव्ह' धर्म आहेत. यातील एकही 'रियल' धर्म नाही. 'रिलेटिव्ह' धर्म तुम्हाला डेव्हलप्ड (विकसित) करतो. पण त्यातून फुल डेव्हलप्ड होता येत नाही. आणि मोक्ष तर फुल डेव्हलप्ड झालेल्याचाच होतो. देह असूनही देह आणि आत्मा वेगळे राहतात, त्यानंतरच मोक्ष मिळतो.

मोक्षासाठी तर वीतराग वाणीशिवाय दुसरा काही उपाय नाही!

इतर सर्व वाणी रागी (मोह, आसक्तीयुक्त) असतात. वीतराग वाणी म्हणजेच स्याद्वाद. कुठल्याही जीवाचे प्रमाण दुखावले जात नाही. मग जरी कसाई आला, तरी तो देखील त्याच्या धर्मातच आहे. वीतरागांच्या दृष्टीने कोणीही क्षणापुरता देखील धर्माच्याबाहेर जात नाही. धर्माशिवाय तर कुणी एक क्षणही जगू शकत नाही. तरीही अधर्म घुसतोच. नास्तिक व्यक्ती देवाला मानत नाही, धर्माला मानत नाही, पण शेवटी नैतिकतेला मानते आणि नैतिकता हा तर सर्वात मोठा धर्म आहे. नैतिकतेशिवाय धर्म नाहीच. नैतिकता तर धर्माचा आधारस्तंभ आहे. जो देवाला मानत नाही तो देखील धर्मातच आहे. धर्माशिवाय तर कोणीच नाही. आत्मा आहे तर धर्म असलाच पाहिजे. प्रत्येक मनुष्य धर्मातच आहे! हो, पण सोबत अधर्मही असतो!!

## धर्म पक्षात की निष्पक्षतेत

सर्व धर्मांचे संप्रदाय-पंथ मताग्रह आणि कदाग्रह यातच रमलेले आहेत. त्यातील प्रत्येक जण असेच मानतो की त्यांच्या धर्मानेच मोक्ष मिळेल. पण ते सर्व आग्रही आहेत, मताग्रही आहेत. मताग्रहाने कधीही मोक्ष मिळत नाही. निराग्रहीचाच मोक्ष होतो. एका पक्षात असलेल्या मनुष्याने त्यापक्षाची शास्त्रे वाचली तरी काहीही निष्पन्न होणार नाही. प्रत्येक पक्षाचे 'एसेन्स' (सार) काढले आणि प्रत्येक पक्षाचे, प्रत्येक धर्माचे शास्त्र अभ्यासिले, तरच त्याने धर्म प्राप्त केला असे म्हणता येईल. धर्म काय आहे? हे धारण केल्याशिवाय समजणार नाही. अन्यथा, जे कुंपणात अडकले ते सर्व मेंढ्या आणि जे कुंपणाच्या बाहेर पडले ते सर्व सिंह. भगवंत म्हणतात की आमचे मत वीतराग आहे आणि तुम्हा पक्षवाल्यांचे मत वीतरागतारहित आहे. चोवीसही तीर्थंकराचे वीतराग मत होते. पक्षात पडलेल्यांमध्ये वीतराग मत नसते. भगवंत गेल्यानंतर पक्षपात आला, विभाजन झाले. मोक्षाचा मार्ग तर खरा राहिला नाही, पण व्यवहारिक धर्मही खरा राहिला नाही. भगवंतांची खरी आज्ञा पाळणे आणि त्या आज्ञेत राहणे, यालाच धर्म म्हणतात. त्यांच्या आज्ञा कमी पाळल्या गेल्या तर कमी, अगदी दोन आज्ञांचे पालन झाले तरी

चालेल, पण घोटाळा करता कामा नये. हे तर सामायिक करतात आणि वाळूचे घड्याळ पाहतात! भगवंतांने सांगितले आहे की जमले तर सामायिक कर, जास्त होत नसतील तर कमी कर, पण बरोबर कर, यथार्थपणे कर. लाखोवेळा पालन केले तरी भगवंतांची आज्ञा जुनी होत नाही. पण भगवंतांची आज्ञा समजत नाही म्हणून नुसते घोटाळेच करतात. त्यात त्यांचा दोष नाही. वीतराग भगवंताचे धर्मध्यान कधी होईल तर जेव्हा कोणत्याही पक्षात पडला नाहीत तर. कुठल्याही पक्षात पडले की धर्मध्यान नष्ट होते. पक्षात राहणे म्हणजे 'व्ह्यू' पॉइंटमध्ये राहणे. 'सेंटरमध्ये' बसला तर मतभेद होणार नाहीत, मग मोक्ष होईल. कोणत्याही 'डिग्री'वर बसला तर आमचे-तुमचे होतेच, त्याने मोक्ष मिळत नाही.

## धर्मातही व्यापारी वृत्ती...

संसारात जे धर्म चालतात त्याला व्यापार म्हणतात. त्यात सूक्ष्म का होईना पण इच्छा दडलेली असते. सूक्ष्म जरी इच्छा असेल, तरीही मोक्ष प्राप्त होत नाही. जो स्वत:च बुडलेला आहे तो आपल्याला कसा तारेल? ज्ञान मिळाल्याशिवाय इच्छा जात नाहीत. इच्छा स्वत:च अग्नी आहे. इच्छा झाली म्हणजे ती प्रज्वलित होते आणि मग ती विझवावी लागते. आजचे लोक तिला 'पेट्रोल' ने विझवू पाहतात! तुम्ही घरून चांगले पोटभर खाऊन निघाले असाल तर उगाच कोणाच्या दुकानाकडे पाहाल का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तसेच 'ज्ञानी पुरुष' आत तृप्ती करून देतात, म्हणून मग बाहेर इच्छा होत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** सगळेच लुटालूट करतात, तर त्यांचे काय होईल?

**दादाश्री :** जे लुटले जातात, ते सर्व कमावत आहेत! 'रिलेटिव्ह'मध्ये लुटले जातात तेव्हा 'रियल'मध्ये कमाई करतात, असे मानले जाते.

**प्रश्नकर्ता :** महामोहनीय कर्म म्हणजे काय?

**दादाश्री :** धर्माच्या नावाने दुरुपयोग करणे, याला महामोहनीय कर्म म्हटले आहे. त्याने भयंकर असे पुढील जन्म बांधले जातात. धर्मात व्यापार करतात, पैशांचा व्यापार फार वाईट समजला जात नाही, पण दुराचारी फार भयंकर कर्म बांधून घेतो. संसारात दुरुपयोग केला तर ते मोहनीय कर्म आणि धर्मात दुरुपयोग केला तर ते महामोहनीय कर्म.

## ...तर रिटर्न तिकीट तीर्यंच गतीचे!

लौकिकधर्मात 'गुरुजी आमचे हे काम करा' असे म्हटले तर गुरुजी खुश होतात. पण ते ठीक आहे. कारण अहंकाराशिवाय जगणार कसे? पण धर्मात लक्ष्मी किंवा विषय घुसू नये. मी लक्ष्मी स्वीकारली तर जसे लोक भिकारी तसा मीही भिकारी, मग 'ज्ञानी पुरुष' आणि लोक यात काय फरक राहिला? अर्थात 'ज्ञानी पुरुष' तर कोणत्याही वस्तूचे भिकारी नसतात. त्यांना कसलीही इच्छा होत नाही. इथे तर मानाची भीक, लक्ष्मीची भीक, विषयांची भीक, कीर्तीची भीक, शिष्यांची भीक कुठल्याही प्रकारची भीक नसते. जिथे कुठल्याही प्रकारची भीक आहे, तिथे भगवंत आणि भक्त वेगळे आहेत, आणि जिथे कसलीच भीक नाही, तिथे भगवंत आणि भक्त एक झालेले असतात, अभेद असतात! सगळेच काही धर्मात भांडण करीत नाहीत, तर ज्यांना रिटर्न तिकीट मिळाले आहे तेच भांडत असतात. संसारात भांडतात त्याला हरकत नाही, पण धर्मात भांडण करणे हे तर रीटर्न तिकीटवाल्यांचे काम आहे.

**प्रश्नकर्ता:** रिटर्न तिकीट म्हणजे काय?

**दादाश्री :** जनावर गतीतून इथे रिटर्न तिकीट घेऊन आला आहे आणि इथून परत तिथेच जाणार आहे. आमचा मुस्लिम धर्म, आमचा हिंदू धर्म, अशी भांडणे धर्मात असू नयेत. धर्मात कोणीही हात घालू नये. जो रिटर्न तिकीट घेऊन आला असेल, तोच धर्मात हात घालतो. कोणत्याही धर्माचा तिरस्कार करणे, याला धर्मातील भांडणे म्हणतात. खऱ्या, सरळ मार्गाने जाणारे असे करीत नाहीत. असे मानवतावाले लोक खूप कमी असतात.

## आत्म्याची ओळख 'ज्ञानी'च करून देतात

वीतरागांची वाणी काय इतकी खोटी असेल? ती काय सासू-सुनेसारखी आहे? अंघोळीची सवय लागली आहे म्हणून चिखल चोपडतो. ती सवय जात नाही तोवर चोपडल्याशिवाय राहणारच नाही ना? त्यापेक्षा भगवंताची ओळख करून घ्या, आत्मा जाणून घ्या. आत्मा जाणला त्याने सर्व काही जाणले आणि आत्मा जाणला नसेल तर जंगलात जाऊन जोरजोरात रड, म्हणजे निवांतपणे हवे तेवढे रडता येईल! इथे तर हवे तेवढे रडायला सुद्धा मिळत नाही. वीतरागांच्या मार्गात तर एका शब्दात निव्वळ सुखच वर्तत असते. या 'दादांनी' कुणाला त्याग करायला सांगितले आहे का? पच्चखाणही दिले नाही की त्यागाचा उपदेशही दिला नाही. पाहा, तरी पण सर्वांना कसे सुख वर्तत आहे! शिवाय कधी संपणार नाही असे सुख!! अस्त होणारच नाही असा प्रकाश दिला आहे, अनंत प्रकाश!!!

## लौकिक धर्म द्वंद्वातच ठेवतो

'रिलेटिव्ह' धर्म द्वंद्व उत्पन्न करणारे आहेत आणि 'हा' तर 'रियल' मार्ग आहे. हा द्वंद्वाच्या पलीकडे नेणारा आहे. धर्माचे खरे दुकान असते तरी ठीक होते, पण हे तर भटकायला लावतात, त्याचा काय फायदा? तिथे ते म्हणतात, 'आत्म्याला ओळखा.' मग आपण म्हणायचे ना की 'हे तर माझे वडीलही सांगत असत, म्हणून तर मी तुमच्याकडे आलो आहे, म्हणजे तुम्ही ओळख करून द्याल.' पण हे तर जिथे-तिथे थंडीत थंड पाण्याने अंघोळ करायला लावतात! ज्यांना आत्मज्ञानातले एक अक्षरही माहीत नाही ते ज्ञानी होऊन बसले आहेत. क्रोध-मान-माया-लोभ जिथे शाबूत आहेत, त्यांना ज्ञानी कसे म्हणता येईल? ज्ञानी त्यांना म्हणतात की ज्यांच्यात संसारी प्रवृत्ती नसते, क्रोध-मान-माया-लोभ नसतात. वीतराग झालेले आहेत त्यांना ज्ञानी म्हणतात. या चर्मचक्षुंमुळे भेदबुद्धी उत्पन्न झाली आहे. दोघे भाऊ-भाऊ असले तरी तू-मी असा भेद करतात. पति-पत्नी असले तरी भेदबुद्धी उत्पन्न होते, ते जेव्हा भांडतात तेव्हा तू-मी करतात. हे 'रिलेटिव्ह' असे आहे, की

जे शेवटपर्यंत तुम्हाला ठेचून ठेचून झीरो करीत नाही, तोपर्यंत सुटका होत नाही. 'रिलेटिव्ह' धर्म भेद निर्माण करतात, आणि 'रियल' धर्म शेवटपर्यंत वेगळेपण निर्माण करीत नाही, भेद उत्पन्न करीत नाहीत, अभेद ठेवतो!

सर्व 'रिलेटिव्ह' धर्मांना लौकिक धर्म म्हणतात, ते मोक्ष तर मिळवून देत नाहीत, तर 'हे करा, ते करा' असे काही ना काही करायला सांगत असतात. त्यात तुम्ही कर्ता नाहीत. तरी पण तुम्हाला कर्ता भावातच ठेवतात आणि आम्ही तुम्हाला काही करायला सांगत नाही, म्हणून याला अलौकिक म्हणतात. इथे जो आला त्याचा मोक्ष झालाच पाहिजे. म्हणूनच आम्ही त्याला आधी विचारतो की तुला मोक्ष मिळवायचा आहे? तुझा रोग काढायचा आहे? आणि मग त्याची इच्छा असेल तर 'ऑपरेशन' करतो. आणि जर त्याची मोक्षाला जाण्याची इच्छा नसेल आणि संसारात सुख पाहिजे असेल तर तशी ॲडजस्टमेंटही करून देतो. घरच्यांबरोबर काही रोग असेल तर मिटवून टाकतो आणि घरात 'ॲडजस्टमेंट' करून देतो. ॲडजस्टमेंट हाच मुख्य धर्म आहे. कोणी तुमच्याकडून पैसे घेऊन गेला आणि तुमची त्याच्याबरोबरची ॲडजेस्टमेंट तुटली (संबंध बिघडले) तर तुम्ही मुख्य धर्म चुकलात असे म्हणावे लागेल!

## त्वरित फळ देतो तो धर्म

धर्म कशाला म्हणतात, तर जो त्वरित फळ देतो. त्वरित फळ देणारा असेल तरच तो धर्म, नाही तर अधर्म. क्रोध लगेच फळ देतो ना? जसे अधर्माचे फळ लगेच मिळते, तसेच धर्माचे फळही लगेच मिळाले पाहिजे. जोपर्यंत स्वरूपाचे अज्ञान गेलेले नाही तोपर्यंत खरा धर्म पाळला तरी त्याच्या घरात क्लेश निर्माण होणार नाहीत. जिथे कषाय आहेत तिथे धर्म नाहीच. कषाय आहे तिथे लोक धर्म शोधतात, हेच आश्चर्य आहे! लोकांमध्ये पारख करण्याची शक्तीच नाही. सम्यक् दर्शन प्राप्त झाल्यावर संसार आवडतच नाही. म्हणून सम्यक् दर्शन काय म्हणते की 'माझी प्राप्ती झाल्यावर तुला मोक्षाला जावेच लागेल. म्हणून मला प्राप्त करण्यापूर्वी विचार कर.' म्हणूनच तर कवी म्हणतात ना की,

*'जेनी रे संतो, कोटि जन्मोनी पुण्यै जागे,*
*तेने रे संतो, दादांना दर्शन थाये रे,*
*घटमां एने खटकारो खटखट वागे रे.'*

–नवनीत

(ज्याचे कोटी जन्माचे पुण्य जागे झाले असेल, त्यालाच दादांचे दर्शन घडते. आणि एकदा दर्शन घडले की मग त्याला पुन्हा पुन्हा दर्शन करावेसे वाटते.)

खटकारो म्हणजे काय तर एकदा का 'दादां'ना भेटला की मग इथे पुन्हा पुन्हा दर्शन करावेसे वाटते. म्हणून आम्ही म्हणतो की तुला परत जायचे असेल तर मला भेटूच नकोस, आणि भेटलास तर मात्र तुला मोक्षाला जावेच लागेल! जर तुला चारही गतींमध्ये फिरायचे असेल तर तेही मी करून देईन. इथे तर मोक्षाचा शिक्का बसतो, म्हणून मोक्षाला जावेच लागते. आम्ही तर तुम्हाला सांगतो की इथे अडकू नका, आणि एकदा अडकले की मग बाहेर पडता येणार नाही.



# [ 23 ]
# मोक्षप्राप्ती, ध्येय

## मोक्ष काय आहे?

**प्रश्नकर्ता :** मोक्ष किंवा मुक्ती कशाला म्हणतात?

**दादाश्री :** मोक्ष आणि मुक्ती एकमेकांजवळचे शब्द आहेत. एकाच आईची दोन मुले आहेत.

जर सर्व कर्मांपासून मुक्ती हवी असेल, पूर्ण मोक्ष हवा असेल तर आधी अज्ञानातून मुक्ती झाली पाहिजे. तुम्ही अज्ञानामुळेच बांधले गेलेले आहात. जर अज्ञान गेले तर सर्व काही सरळ होऊन जाईल, शांती मिळेल, दिवसेंदिवस आनंद वाढत राहील आणि कर्मांपासून मुक्ती मिळेल.

मोक्ष म्हणजे आपल्याला मुक्ततेचे भान झाले पाहिजे. 'मी मुक्त आहे' असे भान जिवंतपणीच वाटले पाहिजे. मृत्यूनंतरचा मोक्ष काही कामाचा नाही, ती तर फसवणूक आहे. मोक्ष तर रोख असला पाहिजे, उधार चालणार नाही. कोणाला भाजी आणण्यासाठी पाठवले तरी तो आतून कमिशन काढून घेतो, असा हा काळ आहे. त्यात कोणी असा उधार मोक्ष थोडाच घेईल? असा उधार मोक्ष कोणी देत असेल तर आपण सांगितले पाहिजे की 'पुढल्या जन्मी मोक्ष', असा उधार मोक्ष मला नको आहे. या काळात उधारीचा धंदा करूच नका. आज तर धर्मातही भेसळ झाली आहे. शुद्ध तुपात व्हेजिटेबल तुपाची भेसळ

करण्याचे दिवस आता गेले, आता तर व्हेजिटेबल तुपातही भेसळ होत असते. कोणी म्हटले की, 'आपले क्रोध-मान-माया-लोभ' काढून टाका.' तर आपण म्हणावे 'साहेब, हे तर मलाही माहीत आहे, पण तुम्ही असे काही सांगा की ज्यामुळे माझे क्रोध-मान-माया-लोभ निघून जातील.' असेच चालवून घेण्यात काय अर्थ आहे? वचनबळ असलेल्या पुरुषाकडे गेलो, चारित्र्याबल असलेल्या पुरुषाजवळ गेलो तर क्रोध-मान-माया-लोभ यांना निघून जावे लागेल. दुबळ्या व्यक्तीचा दुबळेपणा जर आपोआप निघून जात असेल तर शक्तिवान माणसाची काय गरज?

लोक धर्माचे ऐकायला जातात त्याला श्रुतज्ञान म्हणतात. परंतु जे ऐकल्यानंतर आपला रोग आपणहून निघून जातो, त्यालाच श्रुतज्ञान म्हणतात.

## मोक्षप्राप्तीचा मार्ग

**प्रश्नकर्ता :** मोक्ष कसा मिळतो?

**दादाश्री :** त्याची काही पद्धत नाही. आर्तध्यान आणि रौद्रध्यान निघून गेले की मोक्ष मिळतो.

**प्रश्नकर्ता :** तरी पण मोक्ष प्राप्त करण्याचा मार्ग काय आहे? मोक्ष कोणाकडून मिळेल?

**दादाश्री :** मोक्ष तर फक्त 'ज्ञानी पुरुषां'कडूनच मिळतो. जे मुक्त झाले आहेत तेच तुम्हाला मुक्त करू शकतात. जो स्वतःच बद्ध आहे, तो दुसऱ्याला कसा सोडवू शकेल? म्हणजे आपल्याला ज्या दुकानात जायचे असेल त्या दुकानात जायची सूट आहे, पण आपण विचारले पाहिजे की, 'साहेब मला मोक्ष द्याल?' जर ते म्हणाले, 'नाही, मोक्ष देण्याची आमची तयारी नाही', तर मग आपण दुसऱ्या दुकानात, तिसऱ्या दुकानात गेले पाहिजे. कुठेतरी आपल्याला हवा तो माल मिळेल. पण एकाच दुकानाशी अडून बसलात तर? भटकतच राहाल. अनंत जन्मांपासून असे भटकत राहाण्याचे कारण हेच आहे की आपण एकाच दुकानात बसून राहिलो आहोत, शोधाशोधही केली नाही. इथे बसल्यावर

आपल्याला मुक्तीचा अनुभव येतो की नाही? आपले क्रोध-मान-माया-लोभ कमी झालेत का? तेही पाहिले नाही.

लग्न करायचे असेल तर चौकशी करतात की कुठले कूळ आहे, आजोळ कुठे आहे? सर्व 'रियलाइज' (चौकशी) करतात. पण यात मात्र 'रियलाइज' करत नाहीत. केवढे मोठे 'ब्लंडर' (मूलभूत चूक) म्हणावे याला?

**प्रश्नकर्ता :** वीतराग दशा प्राप्त करण्याची सर्वात पहिली पायरी कोणती?

**दादाश्री :** खरे तर मोक्षाला जायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** मोक्ष तर नंतर मिळेलच ना?

**दादाश्री :** सध्या देहाचा मोक्ष होत नाही, पण आत्म्याचा मोक्ष तर आहेच ना? या काळामुळे या क्षेत्रापासून देहाचा मोक्ष थांबला आहे, पण आत्म्याचा मोक्ष तर होऊ शकतो ना?

**प्रश्नकर्ता :** हो, होऊ शकतो.

**दादाश्री :** मग तर इतके झाले तरी खूप झाले.

**प्रश्नकर्ता :** मोक्ष प्राप्त करण्यासाठी काय केले पाहिजे? आपण उपाय सांगावा.

**दादाश्री :** मी उपाय सांगतो, पण तो तुम्हाला जमणार नाही. घरी गेल्यावर विसरून जाल. या काळात लोकांमध्ये एवढे स्थैर्य नसते. त्यापेक्षा तुम्ही आमच्याकडे या, एका तासातच तुम्हाला रोख मोक्ष देऊ. मग तुम्हाला काहीच करायचे नाही. फक्त आमच्या आज्ञेत राहायचे.

## मोक्ष म्हणजे सनातन सुख...

**प्रश्नकर्ता :** तसे तर माणसांना मोक्षाचा काही अनुभव नसतो, तरीही मोक्षासाठी प्रयत्न करत असतात.

**दादाश्री :** या जगात सुख-दुःखाचा जो अनुभव होतो, ते तर

पूर्णपणे दुःखच आहे. सुख आहे असे जे वाटते, ते तर काल्पनिकच आहे. जी वस्तू तुम्हाला आवडते ती वस्तू दुसऱ्याला दिलीत तर त्याला दुःख वाटते. असे होते की नाही? सर्वांनाच सुख वाटेल, तेच खरे सुख. खऱ्या सुखासाठी प्रत्येकाचा अभिप्राय सारखाच असतो.

जीवमात्र सुखाचा शोध घेत असतो, दुःखापासून दूर जाऊ पाहतो. दुःख कोणालाही आवडत नाही. पण ही सुखे तर टेम्परिरी असतात, ते त्यांना आवडत नाही, कारण सुखामागून दुःख येतेच. लोकांना कोणते सुख आवडते? सनातन सुख, जे आल्यानंतर कधीही दुःख येणार नाही. सनातन सुख कशाला म्हणाल? तर मोक्षाला, मुक्तीला! मोक्ष असेल तरच सनातन सुख उत्पन्न होते. बंधनात दुःख आहे.

संसारी दुःखांचा अभाव, याला मुक्तीचा पहिला अनुभव म्हणतात. आम्ही तुम्हाला ज्ञान देतो त्याच्या दुसऱ्या दिवसापासूनच हा अनुभव तुम्हाला येतो. मग या शरीराचे ओझे, कर्माचे ओझे वगैरे सर्व नष्ट होतात, हा दुसरा अनुभव. त्यानंतर मग इतका आनंद असतो की ज्याचे वर्णनच करता येणार नाही.

## सिद्धगतीची स्थिती कशी?

**प्रश्नकर्ता :** मोक्ष मिळाल्यानंतरची आमची स्थिती कशी असते?

**दादाश्री :** परमात्म स्वरूप.

**प्रश्नकर्ता :** मग त्याला काही कार्य करायचे असते का?

**दादाश्री :** तिथे काहीच कार्य नसते. आता देखील तुमचा आत्मा काहीच कार्य करीत नाही. हे जे कार्य करीत आहे, तो अज्ञानभाव आहे, मेकॅनिकल भाव आहे. आत्मा क्रियाकारी नाहीच, स्वतः ज्ञायक स्वभावाचा आहे. तिथे सिद्धगतीमध्ये फक्त ज्ञाता-द्रष्टा आणि परमानंद असतो. तिथे सिद्धगतीमध्ये एवढे सारे सुख आहे की तिथल्या निरंतर सुखातल्या एका मिनिटाचे सुख जरी इथे पृथ्वीवर पडले तरी जगात वर्षभर आनंदच आनंद, आनंदाची सीमा राहणार नाही!

## मोक्षाचे स्वरूप!

**प्रश्नकर्ता :** मोक्ष प्राप्त झाल्यावर परत कधीही जन्म घेतला जात नाही?

**दादाश्री :** मग या भानगडीत कोण पडेल? ही तर अतिशय त्रासदायक गोष्ट आहे. या संसारात अपार परवशता आहे? हे तर दारू पिऊन स्वतःला सुखी मानण्यासारखे आहे. हा संसार तर भूत चिकटल्यासारखा आहे. ही मन-वचन-कायेची तीन भुते चिकटलेली आहेत! दाढ दुखली की हे समजेल. राजाला देखील दाढ दुखायला लागली की राज्य प्रिय वाटते का? राण्या प्रिय वाटतात का?

**प्रश्नकर्ता :** कोणीही प्रिय वाटत नाही.

**दादाश्री :** हा (संसार) तर भयंकर संकट आहे! आणि मोक्ष तर स्वाभाविक सुख आहे.

**प्रश्नकर्ता :** संसारातील व्यवहार करीत असताना सुद्धा मनुष्य मोक्षाचा अनुभव घेऊ शकतो?

**दादाश्री :** आंधळ्याला एका खांबाला दोरी लपेटून, करकचून बांधले, आणि मग त्याला हात न लावता हळूच मागून एक दोरी ब्लेडने कापून टाकली तर त्याला समजेल की नाही?

**प्रश्नकर्ता :** समजेल.

**दादाश्री :** ह्या भागातील बंधन तुटले आहे हे त्याला कळते. तसेच मोक्षाचाही अनुभव येतो.

मोक्ष म्हणजे मुक्तभाव, बंधन वाटत नाही. पोलिसांनी पकडले तरीही बंधन वाटत नाही.

## स्वर्ग, तरीही बंधन

**प्रश्नकर्ता :** असे म्हणतात ना की, मोक्ष म्हणजे स्वर्ग मिळणे, वैकुंठ मिळणे किंवा भगवंतात मिसळणे, ते काय आहे?

**दादाश्री :** तिथे स्वर्ग-बिर्ग असे काहीच नसते. स्वर्ग म्हणजे तर भौतिक सुखे भोगण्याचे स्थान आणि नरक म्हणजे भौतिक दुःखे भोगण्याचे स्थान. आणि या मध्यलोकात सुख आणि दुःख यांचे मिश्रण असते. स्वर्गात देखील बंधने आहेत. तिथे आवडत नसले तरी राहावे लागते. तिथेही पत्नीशी पटत नसले तरी जगावे लागते. कारण तिथे त्यांचे आयुष्य कमी होऊ शकत नाही.

लाखो जन्मांपासून यातून सुटण्याची कामना प्रत्येकाच्या बुद्धीच्या आशयात असतेच पण सुटका होऊ शकत नाही. खूप खटाटोप करतो, धडपड करतो, तरी देखील सुटका होत नाही. पत्नी मुलांशिवाय राहून पाहतो, तरी काही निष्पन्न होत नाही, म्हणून मग पुढच्या जन्मात संसारी बनतो. अर्थात सर्व प्रकारचे विकल्प करून पाहिले. निर्विकल्प प्राप्त करण्यासाठी जे काही करतात, ते सर्व विकल्पांचे विकल्प आहेत. हा जंजाळ सुटेल असा नाही. गृहस्थीचा जंजाळ सुटला तर त्यागीचा जंजाळ चिकटतो, तिथेही संसार तर आहेच ना!

## विनाशी वस्तू नको

मुक्तीसाठी काय केले पाहिजे?

'ज्ञानी' शिवाय आपल्याला दुसरे काहीच नको, असा भाव ठेवावा. 'या जगातील कुठलीही विनाशी वस्तू मला नको आहे.' असे सकाळी उठल्यावर पाच वेळा बोललात आणि त्या भावाशी सिन्सियर राहिलात तर तुम्हाला कुठलेही कर्म बांधले जाणार नाही. पण 'मला' म्हणजे कोणाला? हे निश्चित करून बोलले पाहिजे. 'मी शुद्धात्मा आहे' आणि जे हवे आहे ते या देहाला हवे आहे, 'चंदुलाल'ला हवे आहे आणि ते काही जास्त नसतेच ना? 'व्यवस्थित'मध्ये जे असेल ते ठीक आणि नसेल तर तेही ठीक, पण 'मला काहीही नको' हा भाव पक्का असला पाहिजे. आणि त्या भावाशी सिन्सियर राहिले तर कसलीच भानगड होणार नाही. व्यवस्थितमध्ये जेवढे मिळायचे तेवढेच मिळणार, त्यात काहीच बदल होत नाही. उलट चिंता-बैचेनी कमी होते, हा फायदा होतो. ही दोन्ही द्रव्ये वेगळी आहेत. त्यांचा वेगळा अनुभव घेतला

पाहिजे. दुसरे काहीही करायचे नाही. आत बुद्धीने ढवळाढवळ केली किंवा विचारात एकाकार होऊन गोंधळायला झाले तरी ते 'आपण' करत नसतो. 'तुम्ही' 'तुमचा' भाग वेगळा ठेवा. 'तुम्ही' आणि 'चंदुलाल' शेजाऱ्यासारखे राहाल तर काहीही परिणाम होणार नाही! तात्पर्य 'तुम्ही' जर 'तुमच्या स्वत:शी' सिन्सियर राहिलात, तर हे विज्ञान असे आहे की ते तुम्हाला निर्लेपच ठेवेल!

तुम्ही कारखान्यात नोकरी करता, तिथे सिन्सियर राहता की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तिथे सिन्सियर राहणे म्हणजे एक डोकेदुखीच आहे. आणि यात इतकी डोकेदुखी नाही. आणि कोणाला कशात तरी रस वाटत असेल आणि त्यामुळे 'सिन्सियारिटी' राहत नसेल तर तसे मला सांगावे, मग मी त्यावर मार्ग काढेन. पण आतल्याआत गडबड होत असेल आणि मनात गोंधळ निर्माण होत असेल की 'कर्म बांधले जाईल की काय', तर त्याने उपाय सापडणार नाही. कर्म बंधनाची थियरी वेगळीच आहे. ती आमच्याकडून समजून घेतली पाहिजे.

## जगाची सत्ता कुठे झुकते?

ज्याची या जगातील सर्व प्रकारची भीक निघून गेली आहे, त्याच्या हाती या जगातील सर्व सूत्रे सोपवली जातात.

भीक किती प्रकारची असेल? मानाची भीक, लक्ष्मीची भीक, विषयांची भीक, शिष्यांची भीक, मंदिरे उभारण्याची भीक, अपमानाची भीक. सर्व प्रकारची भीक, भीक आणि भीक! तिथे आपले कल्याण कसे होईल?

ज्याची सर्व प्रकारची भीक निघून जाते, त्याच्या हाती या जगाची सत्ता येते. आता माझ्या हाती आली आहे. कारण माझी सर्व भीक निघून गेली आहे. जोपर्यंत खरे वासनारहित पुरुष भेटत नाहीत, तोपर्यंत खरा धर्म प्राप्त होणार नाही. वासनारहित पुरुष तर जगात क्वचितच भेटतात. तेव्हाच आपले मोक्षाचे काम होते. ते नाही भेटले तर कुठपर्यंत चालवून

घ्यायचे? तर मानाची भीक असेल तर चालेल, पण लक्ष्मीची भीक, कीर्तीची भीक, विषयांची भीक असेल तर मात्र चालणार नाही.

## बिनचूक व्हा

आत्म्यात आत्मबुद्धी तो मोक्ष आणि देहात आत्मबुद्धी तो संसार.

ही दृष्टी दृश्यावर पडत राहते, पण कधी द्रष्ट्यावर पडत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण चर्मचक्षूंनी जेवढे दिसते तेवढेच दिसेल ना?

**दादाश्री :** चर्मचक्षूंनी दृष्टी द्रष्ट्यावर पडतच नाही. दिव्य चक्षू उत्पन्न होतात तेव्हाच दृष्टी द्रष्ट्यावर पडते.

आत्म्याला जाणण्यासाठी, जे सांगितले आहे, ते फक्त समजून घ्यायचे आहे. करायचे काहीच नाही. एका व्यक्तीने भगवंताला विचारले की 'माझा मोक्ष कधी होईल?' तेव्हा भगवंत म्हणाले की, 'तुझी समजूत बिनचूक होईल तेव्हा मोक्ष होईल.' सांगा आता, भगवंतांनी यात काय चुकीचे सांगितले?

**प्रश्नकर्ता :** बरोबर सांगितले आहे.

**दादाश्री :** मग परत त्याने भगवंतांना विचारले की, जप-तप करतात त्याचे काय? तेव्हा भगवंत म्हणाले की, 'तुला ज्या दिवशी अजीर्ण झाले असेल त्या दिवशी तू उपवास कर. जप-तप करण्याची आमची अट नाही. कसेही करून तुझे ज्ञान आणि समजूत बिनचूक कर, आम्हाला तेवढेच हवे आहे. सध्या तुमच्या किती तरी चुका आहेत. 'मी चंदुलाल आहे, या स्त्रीचा पती आहे, या मुलाचा बाप आहे.' किती या चुका... चुकांची परंपराच आहे. मुळातच चूक आहे, तिथे काय होणार? एक संख्या विनाशी आहे आणि दुसरी संख्या अविनाशी आहे. आता या दोन संख्यांचा गुणाकार करायला गेलो की लगेच विनाशी संख्या नष्ट होईल. म्हणजे हा गुणाकार कधी होणार नाही आणि त्याचे उत्तर मिळणार नाही. शुक्रवार बदलणार नाही आणि शनिवार उजाडणार नाही, एवरी डे फ्रायडे आणि फ्रायडेच राहील. पण लोक आडमार्गी गेले

आहेत. चुकांमुळे संसार देखील चांगला होत नाही तर मोक्ष कसा होईल? खरे तू स्वत:च मोक्षस्वरूप आहेस. तूच परमात्मा आहेस, पण अचूक ज्ञान आणि अचूक समजूत याचे भान झाले पाहिजे. तू शुद्धात्मा तर आहेसच, पण त्याचे भान झाले पाहिजे.

## फक्त मोक्षाचाच नियाणां

**प्रश्नकर्ता :** आपण ते समजवावे. ते ज्ञान प्राप्त करण्याची इच्छा जागृत झाली आहे, म्हणूनच येथे आलो आहोत.

**दादाश्री :** ते ज्ञान प्राप्त करण्याची इच्छा जन्मोजन्मी असते, पण त्यासाठी खरा *नियाणां* (आपले सारे पुण्य खर्चून फक्त एका ध्येयाची कामना करणे) केलेला नाही. जर खरा *नियाणां* केला असेल तर सगळे पुण्य त्यातच खर्च होईल आणि ती वस्तू अवश्य मिळेल. *नियाणांचा* स्वभाव काय आहे की तुमचे जेवढे पुण्य असेल, ते सर्व *नियाणांसाठी* खर्च होते. तुमचे बरेच पुण्य तर घरात खर्च झाले आहे, देहात खर्च झाले आहे, मोटर-बंगला, बायको-मुले यांच्या सुखात खर्च झाले आहे. आम्ही फक्त मोक्षाचाच *नियाणां* घेऊन आलो होतो, म्हणून सर्व सुरळीत चालले आहे. आम्हाला कसलीही अडचण येत नाही. *नियाणांचा* अर्थ असा आहे की एकच ध्येय असणे की हेच पाहिजे, दुसरे काहीच नाही! *नियाणां* फक्त मोक्षाला जाण्यासाठीच करण्यासारखा आहे. ध्येय तर शुद्धात्म्याचे आणि *नियाणां* फक्त मोक्षासाठी. बस, आणखी काही नको. आता तर मोक्षाला जाण्यासाठी विडा उचलायचा आहे. हा एकच *नियाणां* करावा, जेणेकरून परत परत जन्म घ्यावा लागणार नाही. एक दोन जन्मात सुटका होईल. हा संसार म्हणजे जंजाळच आहे.

## मोक्ष, स्थान की स्थिती?

**प्रश्नकर्ता :** पण मला हे समजून घ्यायचे आहे की मोक्ष, हा तिथे जाण्याचे ठिकाण आहे, प्राप्त करण्याची वस्तू आहे की मग मोक्ष ही स्थिती आहे?

**दादाश्री :** मोक्ष तर स्वत:चा स्वभावच आहे. मोक्ष हा तुमचा

स्वभावच आहे, पण स्वभाव प्राप्त करण्यासाठी काही तरी उपाय करावा लागेल ना? तुम्ही मोक्षस्वरूप आहात, पण आता तुम्ही मोक्षसुख उपभोगत नाही, कारण तुम्हाला त्याचे भान नाही. मोक्षासाठी तुम्हाला एखाद्या ठिकाणी जायचे नसते. सर्व दु:खांपासून मुक्ती हा पहिला मोक्ष आहे, आणि मग संसारातून मुक्ती, हा दुसरा मोक्ष! पहिला मोक्ष झाला की दुसरा मोक्ष समोर येतो. पहिली मुक्ती 'कॉजेस'च्या स्वरूपात आहे आणि दुसरी 'इफेक्टच्या' रूपात आहे. कॉजेसपासून मुक्त झाल्यावर मग मुलांचे लग्न करू शकता, सर्व काही करू शकता, त्यातही मुक्त भाव राहतो. पण इफेक्ट - मोक्ष आता लगेच होईल असे नाही. मी स्वत: कॉजेस मोक्षात राहतो आणि सर्व कामे होत राहतात.

ज्या देहाने मुक्ततेचे भान होते, त्यानंतर एखादा देह धारण करणे बाकी राहते.

## मोक्षमार्ग कठीण की संसार मार्ग

मोक्षमार्ग कठीण नाही, संसारमार्ग कठीण आहे. एक मोठी टाकी भरून पाणी गरम करायचे असेल तर काय काय वस्तू लागतील? ते गरम व्हायला किती मेहनत लागेल? आणि नंतर त्याला थंड करायचे असेल तर काय करावे लागेल? आता तिथे त्याला प्रश्न पडतो की 'पाणी कसे थंड होईल', तर? आपण ज्ञानी आहोत म्हणून त्याला सांगू की अग्नि विझवून निवांत झोप. तो विचारात पडेल की पाणी गरम व्हायला इतका वेळ लागला तर ते लवकर थंड कसे होईल? पण पाण्याचा स्वभावच थंड आहे, म्हणून आपोआप थंड होईल. पाण्याला गरम करणे म्हणजे त्याला संसार स्वभावात आणणे. 'स्वत:' स्वत:च्या स्वभावात येणे, याला मोक्ष म्हणतात, आणि विभावात जाणे याला संसार म्हणतात. हे भेदज्ञान करून देण्यासाठी ज्ञानी भेटले पाहिजेत, तरच काम होईल. नाही तर करोडो जन्मांतही काम होणार नाही.

## खरा मुमुक्षू कसा असतो?

शास्त्रकारांनी अगदी स्पष्टपणे म्हटले आहे की मुमुक्षू महात्म्याला

'ज्ञानी पुरुषा'ची ओळख लगेच पटली तरच तो खरा मुमुक्षू. ज्याला केवळ मोक्षाचीच इच्छा आहे, त्याला तर लगेचच मोक्षदाता 'ज्ञानी पुरुषा'ची ओळख पटते. पण ज्याला आणखी काही इच्छा आहेत, मानाची, कीर्तीची, शिष्यांची, त्याच्याने ज्ञानी पुरुष ओळखले जात नाहीत. कारण आत खूप आवरणे पडलेली असतात. ज्ञानी पुरुष तर फार सरळ असतात. सहज ओळखता येतात. पण 'त्यांनी कपडे असे काय घातलेत?' असे पाहिले तर मग तो उलट्या दिशेने जाईल.

## आत्मा अबंध, कुठल्या अपेक्षेने?

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला तर अबंध (बंधनरहित) म्हणतात, तर मग मोक्ष कोणाचा होतो?

**दादाश्री :** आत्म्याविषयी तर ज्ञानींची भाषा समजून घेतली तरच उकल होईल. लोकांच्या भाषेतील अबंध वेगळा आहे आणि 'ज्ञानीं'च्या भाषेतील अबंध वेगळा आहे. जर सर्वज्ञांच्या भाषेतील अबंध समजला तर सर्वज्ञपद प्राप्त होईल, असे आहे. सर्वज्ञांच्या भाषेत तर आत्मा अबंधच आहे, निरंतर मोक्षस्वरूपच आहे. तो कधीच बांधला गेला नाही. ही सर्वज्ञांची भाषा आहे. 'जसे आहे तसे' 'फॅक्ट' आहे. थोडीशी जरी शंका आली की स्वत: अजून बांधला गेलेला आहे तर त्याला तर लगेच चिकटेल. स्वत: निर्बंध आहे, ही गोष्ट नि:शंक आहे.

## मोक्ष कोणाचा?

**प्रश्नकर्ता :** मृत्यू, मुक्ती आणि मोक्ष या तिन्हीत कशा प्रकारे फरक करता येईल?

**दादाश्री :** 'तुम्ही' जर खरोखर 'चंदुभाई' आहात तर मरण पावणार आहात आणि 'तुम्ही' जर शिव आहात तर तुमची मुक्ती झालेलीच आहे, आणि मुक्ती झाली की मुक्तीचे फळ म्हणजे मोक्ष मिळेल. इथेच मुक्ती झाली पाहिजे. माझी मुक्ती झाली आहे.



# [ 24 ]
# मोक्ष मार्गाची प्रतीती

## मोक्षप्राप्ती-मार्गदर्शन

**प्रश्नकर्ता :** मुमुक्षू आत्म्याला मोक्ष प्राप्त करण्यासाठी कोणत्या धर्माची गरज आहे?

**दादाश्री :** आत्मधर्माची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** कोणत्या वेषात मोक्ष मिळतो?

**दादाश्री :** वेष आणि मोक्ष यांचे काही देणेघेणे नाही. नग्न फिरत असेल किंवा कपडे घालून फिरत असेल, त्याला काही हरकत नाही. कुठल्याही वेषात मोक्ष मिळू शकतो.

**प्रश्नकर्ता :** कोणत्या स्थानकात मोक्ष मिळतो?

**दादाश्री :** वीतराग धर्मामुळे मोक्ष मिळतो. वीतराग स्थानकात मोक्ष मिळतो.

**प्रश्नकर्ता :** कुठल्या दशेत मोक्ष मिळतो?

**दादाश्री :** वीतराग दशेत मोक्ष मिळतो.

**प्रश्नकर्ता :** कुठल्या संप्रदायात, संघात, पंथात खरा धर्म आहे? संप्रदाय आहेत, ते काय आहे? त्याची आवश्यकता आहे का?

**दादाश्री :** सगळे संप्रदाय अंश धर्म आहे, 'रिलेटिव्ह' धर्म आहेत.

जिथे पक्ष आहे तिथे मोक्ष नाही, तिथे 'रियल' धर्म नाही. संप्रदायात खरा धर्म नाही. कारण ते एकांतिक आहेत.

**प्रश्नकर्ता :** सद्गुरुंची ओळख काय आहे?

**दादाश्री :** ज्यांना रात्रंदिवस आत्म्याचा उपयोग असतो तेच सद्गुरु. शास्त्रांमध्ये वाचली नसेल, कुठेही ऐकली नसेल, तरीही अनुभवास येते, अशी त्यांची अपूर्व वाणी असते!

**प्रश्नकर्ता :** हेच सद्गुरु आहेत असे कधी म्हणावे?

**दादाश्री :** इथे गार (शांत) वाटले तर समजावे की हे सद्गुरु आहेत.

**प्रश्नकर्ता :** सद्गुरुंची लक्षणे काय?

**दादाश्री :** कषाय-क्रोध-मान-माया-लोभ रहित परिणाम!

**प्रश्नकर्ता :** या काळात सद्गुरु कुठे-कुठे विराजमान आहेत?

**दादाश्री :** ते तुमच्या समोर विराजमान आहेत.

**प्रश्नकर्ता :** सद्गुरु प्राप्त करण्यासाठी काय केले पाहिजे?

**दादाश्री :** परम विनय.

**प्रश्नकर्ता :** सम्यकत्व, बीजज्ञान, किंवा बोधबीज, यांना धर्माचे मूळ मानतात, तर त्यांची प्राप्ती कोणाच्या माध्यमातून होईल?

**दादाश्री :** कषायरहित सद्गुरुंच्या माध्यमातून!

**प्रश्नकर्ता :** धर्माची उत्पत्ती कशी होते? म्हणजे धर्म कशामुळे होतो?

**दादाश्री :** कषायरहित सद्गुरुंद्वारे!

**प्रश्नकर्ता :** कुठल्या क्रियेमुळे किंवा काय केल्याने धर्म होतो?

**दादाश्री :** ज्ञानक्रियेमुळे आणि दर्शनक्रियेमुळे धर्म होतो.

**प्रश्नकर्ता :** धर्माचे साधन काय? धर्म कशाला म्हणतात?

**दादाश्री :** धर्माचे साधन, म्हणजे उपादान जागृत असले पाहिजे

आणि धर्म कशाला म्हणतात? तर स्वतःचे कषाय कमी झाले की समजावे धर्म उत्पन्न झाला.

**प्रश्नकर्ता :** धर्मात कसे स्थिर व्हावे?

**दादाश्री :** उपादान जागृत केले की स्थिर होता येते.

**प्रश्नकर्ता :** मोक्षाचा सरळ उपाय काय?

**दादाश्री :** कषायरहित 'ज्ञानी पुरुषां'च्या सेवेमुळे मोक्षमार्ग सरळ होतो.

**प्रश्नकर्ता :** कोण कोणत्या साधनांमुळे मोक्ष होतो?

**दादाश्री :** ज्ञानामुळे मोक्ष होतो. सद्ज्ञानामुळे, आत्मज्ञानामुळे मोक्ष होतो.

## मोक्ष - स्वतःला स्वतःचे भान झाल्याने

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत आतून आत्म्याची प्रतीती होत नाही, तोपर्यंत आत्म्याला उपकारक असे काय आहे? आत्म्याला असे समजले की हे मन-वचन-काया आणि सर्व पदार्थांपासून आत्मा भिन्न आहे, तसेच जोपर्यंत संसारिक कार्यांमधील कर्ता-भोक्तापण सुटत नाही, तोपर्यंत धर्मात प्रवृत्त होण्यासाठी कोणते कार्य करणे योग्य आहे?

**दादाश्री :** जर 'ज्ञानीं'ची प्रतीती झाली तर आत्म्याची प्रतीती झाल्याशिवाय राहणार नाही. आत्म्याची प्रतीती झाल्यावर, त्याचे लक्ष बसल्यावर सांसारिक कार्यांमधील कर्ता-भोक्तापण सुटूनच जाते. सांसारिक कार्ये तर आपोआप होतच राहतात.

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात राहणे आणि मोक्षमार्गाला जाणे, या दोन्ही गोष्टी वर्तमान परिस्थितीत एकाचवेळी होऊ शकतील, हे शक्य वाटत नाही.

**दादाश्री :** फक्त शक्यच नाही, पण अनुभवासही येते, अशी ही गोष्ट आहे. जेव्हा तुम्हाला अनुभव येईल तेव्हा समजेल. तशी अशक्य वाटते, पण अनुभवास येते. कारण दोन्ही गोष्टी वेगळ्या आहेत आणि ज्या गोष्टी वेगळ्या

आहेत त्याचा वेगळेपणा अनुभवास येतो. लोकांना तर असेच वाटते की आत्मा म्हणजेच 'मी आहे.' याला आत्मा म्हणणे हे चुकीचे आहे. तो ज्याला 'मी आहे' असे म्हणतो तो 'मेकॅनिकल आत्मा' आहे. जो दरअसल (मूळ) आत्मा आहे, तो तर यापासून वेगळा आहे. आम्ही दरअसल खऱ्या आत्म्याचे भान करवितो तेव्हा 'तुम्हाला' त्याचे भान येते. तेव्हा हा 'मी' दरअसल आत्म्यात फिट होतो. वस्तुत्वाचे भान होताच 'मी' मूळ अस्तित्वात फिट होऊन जातो. आत्म्याला अस्तित्व, वस्तुत्व आणि पूर्णत्व आहे. अस्तित्वाचे भान तर सर्वांना आहे, पण वस्तुत्वाचे भान नाही. आम्ही वस्तुत्वाचे भान करवितो, त्यामुळे तो 'स्वतः', 'स्वतः'मध्ये फिट होतो, मग पूर्णत्व होत राहते. अर्थात 'स्वतः' 'स्वतः'च्या स्वभावात आणि पुद्‌गल पुद्‌गलाच्या स्वभावात राहते, प्रकृती, प्रकृतीच्या स्वभावात आणि पुरुष, पुरुषाच्या स्वभावात राहतो! दोन्ही वेगळ्या गोष्टी आहेत, म्हणून मग अगदी वेगळेपण राहते!

'ज्ञानी पुरुषां'मध्ये अनंत प्रकारच्या सिद्धी असतात, म्हणूनच असे होऊ शकते. ज्यांना कसली अपेक्षा नसते, त्यांच्यात अनेक प्रकारच्या सिद्धी असतात, आश्चर्यकारक सिद्धी असतात. कारण ज्यांना कसली अपेक्षा नसते, त्यांच्यात अनेक प्रकारच्या सिद्धी असतात.

**प्रश्नकर्ता :** मोक्षमार्गात व्यवहार बाधा आणतोच ना?

**दादाश्री :** वास्तवात आम्ही असे सांगू इच्छितो की जर व्यवहार बाधक होत असेल तर या साधू, संन्यासी, आचार्यांनी तर व्यवहार सोडला आहे, तर आता त्यांचा मोक्ष झाला पाहिजे, असा याचा अर्थ निघेल. पण असे होत नाही. वास्तवात मोक्षासाठी व्यवहार बाधारूप नाही, व्यवहार बाधक नाही. फक्त अज्ञानच बाधक आहे 'ज्ञानी पुरुष' असे अचूक ज्ञान देतात की लगेच ते वर्तनात येते. जे ज्ञान क्रियाकारी असते त्यालाच ज्ञान म्हणतात, बाकीचे सर्व ज्ञान नाहीत.

**प्रश्नकर्ता :** मोक्षमार्ग मुक्तीचा मार्ग आहे, त्यात कसलीही अपेक्षा असू नये. तर मग यात शासन देवी-देवतांना प्रसन्न ठेवण्याची काय आवश्यकता आहे?

**दादाश्री :** या शासन देव-देवींना याकरिताच प्रसन्न ठेवले पाहिजे,

कारण की या काळातील माणसे पूर्वविराधक आहेत. पूर्वविराधक म्हणजे पूर्वी कोणाला तरी त्रास देऊन आले आहेत. म्हणूनच तर आतापर्यंत भटकत आहेत. देवी-देवतांची आराधना आपण यासाठी करायची आहे की जेणेकरून त्यांच्याकडून काही क्लेम (दावा) राहू नये. आपल्या मार्गात त्यांनी अंतराय आणू नये, आपल्याला पुढे जाऊ द्यावे आणि आपल्याला मदत करावी. पूर्वी कधी आपले या गावातील लोकांशी भांडण झाले असेल परंतु जर आपण या गावातील लोकांबद्दल आराधक भाव ठेवला तर भांडणही मिटेल आणि कामही चांगले होईल. तसेच केवळ शासन देवी-देवता नव्हे तर सर्व जगाची, सर्व जीवमात्रांची आराधना केली तर चांगलेच होईल. शासन देवी-देवता नेहमी शासनावर धर्मावर काही अडचण आली तर सहाय्य करतात! आणि हा मोक्षमार्ग असा आहे की इथून डायरेक्ट मोक्षाला जाता येत नाही, एक -दोन जन्म बाकी राहतात, असा हा मार्ग आहे. या काळात इथून डायरेक्ट मोक्ष होत नाही. हा काळ इतका विचित्र आहे की, सगळी कर्मे कॉम्प्रेस करून आणली आहेत, म्हणून दिवसभर विमानातून हिंडले, सायकल घेऊन हिंडले, भटकत राहिले तरीही कामे संपत नाहीत. त्यामुळे एक-दोन जन्मांइतकी कर्मे बाकी राहतात. म्हणूनच याला मोक्ष म्हणायचे ना? पण मोक्षाचा इथेच अनुभव येतो, आणि वेगळेपणाचे भान येते, 'मी वेगळा झालो आहे' असे भान होते.

**प्रश्नकर्ता :** आपल्या मान्यतेनुसार या जैनांच्या चतुर्थी-पचंमीसाठी कोणती तिथी बरोबर आहे? चतुर्थी की पचंमी?

**दादाश्री :** जी तुला सोयीस्कर वाटत असेल ती बरोबर, ज्यामुळे तुझ्याकडून धर्म होईल ती बरोबर, आणि अधर्म होईल ती चुकीची.

**प्रश्नकर्ता :** जैन कोणाला म्हणतात?

**दादाश्री :** जिन म्हणजे आत्मज्ञानी आणि जिनेश्वर म्हणजे तीर्थंकर, ज्यांनी जिन किंवा जिनेश्वरांची वाणी ऐकली आहे तो जैन. ज्यांनी ऐकले, श्रद्धा ठेवली आणि काही अंशी पालन केले, ते श्रावक आणि ज्यांनी पूर्णपणे पालन केले ते साधू.



# [ 25 ]
# I & My

## 'मी' कसा वेगळा होईल?

आम्ही लोणावळ्याला गेलो होतो तेव्हा एक जर्मन जोडपे भेटले होते, काय नाव होत त्यांचे?

**प्रश्नकर्ता :** सुसान आणि लॉइड.

**दादाश्री :** त्यांना मी विचारले की तुम्हाला 'I' मध्ये बुडायचे आहे की 'My' मध्ये? हे जे 'I' आणि 'My' (मी आणि माझे) याचे तलाव आहेत, त्यातील 'I'मध्ये जो बुडला तो कधीही मेला नाही आणि जो 'My'मध्ये बुडला तो कधी जिवंत राहिला नाही. तेव्हा ते म्हणाले, 'आम्हाला तर कधीही मरण येणार नाही, असे व्हायचे आहे' तेव्हा त्यांना असे समजावले की 'देअर इज नो वरी इन ''आय.'' डोन्ट वरी फॉर ''माय.'' 'आय' इज इम्मॉर्टल, माय इज मॉर्टल.' म्हणून ''आय'' आणि ''माय''ला वेगळे करा. ('मी' मध्ये काही चिंता नाही आणि 'माझे' याची चिंता करायचे कारण नाही. 'मी' अमर आहे आणि 'माझे' नाशवंत आहे. म्हणून आय आणि माय – मी आणि माझे यांना वेगळे करा.)

अर्ध्या तासातच त्यांना हे समजले आणि ते खुश झाले.

**प्रश्नकर्ता :** पण 'मी' वेगळा आहे हे कसे समजेल?

**दादाश्री :** तुमचे नाव काय?

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई.

**दादाश्री :** तुम्ही कोण आहात?

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई.

**दादाश्री :** 'आय एम चंदुभाई' आणि 'माय नेम इज चंदुभाई', या दोघात विरोधाभास आहे असे नाही का वाटत? हा चंदुभाई तर मीच आहे असे म्हणता, तेव्हा हा हात देखील तुम्ही आहात का?

**प्रश्नकर्ता :** नाही, हात तर माझा आहे.

**दादाश्री :** हे बघा, तुम्ही ज्याला 'I' मानले आहे, त्यातून प्रथम नाव काढून टाका. बाहेर ज्या ज्या वस्तू वेगळ्या दिसतात, त्यांना काढून टाका. हे नाव आपल्यापासून वेगळे आहे, असा अनुभव येतो का? जिथे जिथे 'My' आहे त्या सर्व गोष्टी काढून टाकण्यायोग्य आहेत. 'I' आणि 'My' दोन्ही वेगळेच असतात, ते कधीच एकाकार होत नाहीत. 'नाव' काढून टाकल्यावर This is my hand, This is my body, My eyes, My ears हे सर्व अवयव काढून टाकत (कमी करत) चला. सगळे स्थूल काढून टाकल्यावर My Mind, My intellect, My Chit, My Egoism (माझे मन, माझी बुद्धी, माझे चित्त, माझा अहंकार) हे सर्व काढून टाका, मग जे बाकी उरते तेच चेतन आहे. या चेतनाशिवाय काहीच राहायला नको. My देखील पूर्णपणे पुद्‌गलच आहे, परका आहे. 'I' आणि 'My' complete वेगळे आहेत. My is Temparory adjustment and 'I' is permanent adjustment.

**प्रश्नकर्ता :** 'My' ला काढण्यासाठी काय केले पाहिजे?

**दादाश्री :** काय करायचे याचा मार्ग मी तुम्हाला सांगेन, पण तुम्हाला ते जमणार नाही. ते complex आहे आणि काळ विचित्र आहे. त्यासाठी तुम्हाला माझी मदत घ्यावी लागेल. 'I' आणि 'My' मधून तुम्ही सर्व काही काढून टाकू शकणार नाही. दृष्टीगम्य काढू शकाल,

मग बुद्धिगम्य काढू शकाल. पण बुद्धिगम्यच्या पलिकडे जे आहे ते तुम्ही काढू शकणार नाही. ते ज्ञानीचेच काम आहे. अंतिम सूक्ष्मतम अहंकार तुमच्याने निघणार नाही. तिथे आमची गरज पडेल. मी तुम्हाला हे सगळे वेगळे करून देईन. मग तुम्हाला मी शुद्धात्मा आहे असा Experience (अनुभव) होत राहील. त्याचा अनुभव आला पाहिजे. आणि त्याबरोबर दिव्यचक्षूही देतो, त्यामुळे आत्मवत् सर्वभूतेषु असे दिसेल.

## 'ज्ञानी'च मौलिक स्पष्टीकरण देतात

'I' आणि 'My' यात Demarcation line (भेदरेखा) तर टाकली पाहिजे ना? एक spiritual adjustment (आध्यात्मिक ॲडजेस्टमेंट) आणि दुसरी Mechanical adjustment, (भौतिक ॲडजेस्टमेंट) असे दोन्ही वेगळे-वेगळे करावे लागतील. नाही तर आपला देश कोणता आणि विदेश कोणता हे कसे कळेल? ही Line of demarcation टाकली नाही म्हणूनच तर रोजची भांडणे होत राहतात.

'My' is complete mechanical. 'I' is not mechanical 'I' is absolute. (माझे पूर्णतः भौतिक आहे. 'मी' भौतिक नाही. 'मी' केवलज्ञान स्थिती आहे.)

'My'ला निसर्ग सगळी मदत करतो. म्हणून 'My'मध्ये हस्तक्षेप करू नका. फक्त पाहतच राहा. मशीनला तेल, पाणी, वायु मिळतच राहील. ते देखील 'टेस्टफुल' मिळेल, 'फ्री ऑफ कॉस्ट' मिळेल.

संसारात आपल्या 'I'चे वजन 'My' खाऊन टाकतो. 'I'चे पाच पाउंड आणि 'My'चे लाख पाउंड वजन झाले आहे. 'My'चे वजन कमी झाले की 'I'चे वजन वाढेल.

'I' परमात्मा आहे आणि 'My' ही माया आहे. 'My is relative to 'I'. 'I' is real. आत्म्याच्या गुणांचे या 'I'मध्ये आरोपण केले, तरीही तुमच्या शक्ती खूप वाढतील. मूळ आत्मा ज्ञानी शिवाय मिळू शकणार नाही. पण हे 'I' आणि 'My' पूर्णपणे वेगळे आहेत. असे सर्वांना,

फॉरेनमधील लोकांनासुद्धा समजले, तर त्यांचा त्रास खूप कमी होईल. ही गोष्ट फॉरेनच्या सायंटिस्टस्‌ना लवकर समजेल. हे सायन्स आहे. अक्रम विज्ञानाच्या ह्या आध्यात्मिक research चा अगदी नवीनच प्रकार आहे. 'I' आणि 'My' एकदम वेगळेच आहेत. 'I' हा स्वायत्त भाव आहे आणि 'My' हा मालकी भाव आहे.

फॉरेनचे लोक पुनर्जन्म शोधत फिरतात. त्यांना मी सांगतो की त्याऐवजी 'I' आणि 'My' वेगळे आहेत असे शोधून काढा ना! My Birth आणि My Death म्हणतात ना? आणि ट्रेनमध्ये सुद्धा My Berth (माझी जागा) म्हणता ना? (!)

व्यवहारात 'My' बोलले जाते. पण ते ड्रॅमॅटिक असले पाहिजे. 'I' ला काढून बोलले पाहिजे. 'My'भोगण्यासाठी आहे, पण Reinvite (परत बोलावण्या)साठी नाही. Complete happiness belongs to 'I' without 'My' (संपूर्ण सुख 'माझे' नसलेल्या 'मी'मध्ये आहे.)



## [ 26 ]

# स्मृती-राग-द्वेषाधीन

### तीव्र स्मृती, तिथे तीव्र राग-द्वेष

उद्या कुठला वार आहे, हे देखील आमच्या लक्षात नसते, आणि तरी पण जग चालते. कोणाला विचारले की लगेच दोन-तीन जण सांगतात की रविवार आहे. लक्षात ठेवणारे खूप लोक आहेत.

वीतराग कोणाला म्हणता येईल? तर आत्म्याशिवाय दुसरे काहीच आठवत नाही, आत्मा आणि आत्म्याची साधने याशिवाय दुसऱ्या कशाचीही आठवण येत नाही.

स्मृती जेवढी नाहीशी झाली, तेवढे वीतराग झाले. वीतरागीला कुठल्याही प्रकारची स्मृती नसते. जगाच्या विस्मृतीलाच मोक्ष म्हटले आहे.

स्मरणशक्तीसाठी संपूर्ण जग प्रयत्न करीत असते. पण स्मरणशक्ती नावाची कुठली शक्ती नाहीच. स्मरणशक्ती राग-द्वेषामुळे आहे. मला राग-द्वेष नाहीत, त्यामुळे मला स्मरणशक्ती नाही. आता आपल्याला आपल्या स्मृतीवरून कळते की या ठिकाणी राग आहे आणि या ठिकाणी द्वेष आहे. म्हणूनच लोकांनी जगाचा विसर पडावा यासाठी संशोधन केले आहे.

**प्रश्नकर्ता :** पहिल्या नंबराने पास होतो त्याला राग-द्वेष अधिक आहेत, असे म्हणायचे का?

**दादाश्री :** त्याला ज्यात जास्त इंटरेस्ट असेल, त्यात जास्त मार्क्स मिळतात. इतिहासात इंटरेस्ट असेल तर त्यात जास्त मार्क्स मिळतात. कित्येक मुलांना तर अभ्यासातले काहीच आठवत नाही. त्यावरून आपल्याला कळते की याला अभ्यासात 'इंटरेस्ट' नाही, आणि त्याला ज्यात 'इंटरेस्ट' असेल त्यातले त्याला सर्व काही आठवते. ज्याला ज्याच्यात राग (मोह, आसक्ती) असेल त्याचा तो एक्सपर्ट होतो. मला अध्यात्माचा राग होता, म्हणून मी अध्यात्मात एक्सपर्ट झालो!

कित्येकांना शास्त्रांवर खूप राग असतो, म्हणून त्यांची शास्त्रांमधील स्मृती जबरदस्त असते. जर आत्म्यावर राग उत्पन्न झाला तर त्याला संसार विस्मृती म्हणतात.

## स्मृती-विस्मृती, करणे कठीण

**प्रश्नकर्ता :** पंधरा वर्षांपर्यंत मला काही आठवले नाही, आणि आज आठवले, याला काय म्हणावे, याला कुठला राग-द्वेष म्हणावा?

**दादाश्री :** ते राग-द्वेषावर आधारित आहे. काही गोष्टी अशा असतात की त्यांची सतत आठवण येत राहते. आणि काही गोष्टी अशा असतात की त्यांचा काळ परिपक्व होतो तेव्हा फळ देतात.

**प्रश्नकर्ता :** काहीही लक्षात ठेवणे सोपे आहे पण विसरून जाणे कठीण आहे, त्याचे कारण काय?

**दादाश्री :** लक्षात ठेवणे हेही सोपे नाही आणि विसरून जाणे तेही सोपे नाही, दोन्ही कठीण आहेत. ज्याच्या लक्षात राहत नसेल त्याला लक्षात ठेवणे खूप कठीण वाटते. पण त्याला विसरून जाणे खूप सोपेच वाटते ना? आणि ज्याची फार आठवण येत असेल त्याला विसरून जाणे खूप कठीण आहे.

**प्रश्नकर्ता :** जग विस्मृत कसे करावे? कसे विसरून जावे? हा एक प्रश्न आहे.

**दादाश्री :** एका तासासाठी देखील जगाचा विसर पडणे शक्य

नाही. एक तास जग विस्मृत करण्यासाठी हजारो रुपये खर्च केले तरी देखील ते विस्मृत होणार नाही. तऱ्हेतऱ्हेच्या आठवणी येतात. जेवताना नेमकी आपल्या आजारी नातेवाईकांची आठवण येते! अरे, तुझी आठवण का बरे येते? म्हणजे स्मृतीच दुःख देते.

**प्रश्नकर्ता :** पण मग एक शंका अशी आहे की जगाचा विसर पडला तर सेल्सटॅक्स, इनकमटॅक्सच्या केसेसचा निकाल कसा करता येईल? त्यात अडचणी येतील ना?

**दादाश्री :** तसे नाही. जगाचा विसर पडला तरी सांसारिक कामे होत राहतात. उलट फार चांगल्या रीतीने, सहज होत राहतात.

## 'ज्ञानीं'ची स्मृती

ही स्मृतीच दुःख उत्पन्न करते. हे ज्ञान होण्याआधी मला खूप स्मृती होती, जबरदस्त स्मृती होती. त्यामुळे मला खूप त्रास होत असे. रात्री झोपही लागत नसे. मग शोध घेतला की कुठल्या जागी दुःख आहे? पण तसे पाहिले तर आम्ही सर्व प्रकारे सुखी होतो. पण या स्मृतीमुळेच अपार दुःख होते. आमच्या लक्षात खूप राहायचे, एकाचवेळी सर्व काही लक्षात असायचे, पण स्मृती ही तर पौद्‌गलिक आहे, चेतन नाही. मग ज्ञान झाल्यावर 'दिसायला' लागले. स्मृतीतील दर्शन नाही, तर यथार्थ दर्शन झाले.

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणता की आपल्याला स्मृती नाही, पण दहा वर्षांपूर्वी आपण काही प्रसंग किंवा उदाहरण सांगितले असेल, ते आज पुन्हा आपल्या मुखी ऐकतो तेव्हा एक्झॅक्टली त्याच प्रकारे, त्याच लिंकमध्ये, शब्दन् शब्द क्रमबद्ध अगदी टेप केल्यासारखे निघतात. तर हे काय आहे? ही कोणती शक्ती आहे?

**दादाश्री :** स्मृती राग-द्वेषाच्या आधीन असते, त्यामुळे त्यात एक्झॅक्ट नसते. आमच्या मुखातून जे निघते ते दर्शनाच्या आधारे निघते, म्हणून एक्झॅक्ट असते. आम्हाला सर्व दिसते. लहानपणी चार वर्षांचा होतो तेव्हापासून आतापर्यंतचे सर्व काही आम्ही पाहू शकतो, आम्हाला

आठवावे लागत नाही. असे चौदा वर्षांचा असतानाचे पाहू तर ते दिसते, वीस वर्षांचा असतानाचे पाहू तर ते दिसते.

आम्हाला विचारण्यासाठी आलेल्यांची फाइल तपासून आम्हाला उत्तर द्यावे लागते. या पूर्वी काय बोलणे झाले होते, आता काय आहे, या सर्व 'कनेक्शन'चा विचार करून उत्तर द्यावे लागते. प्रत्येकाची फाइल वेगवेगळी असते. म्हणून उत्तरे वेगवेगळी असतात. उत्तर त्याच्या फाइलच्या आधारे असते. जर कोणी म्हणेल की 'दादा आपण एकाच प्रकारचे उत्तर सर्वांना का देत नाही?' अरे, असे नसते. प्रत्येकाची फाइल वेगवेगळी असते, प्रत्येकाचे रोग वेगवेगळे असतात. म्हणून आमच्याकडे वेगवेगळ्या बाटल्या आणि वेगवेगळी औषधे असतात. प्रत्येकाचा क्षयोपक्षम वेगवेगळा असतो. आमच्या सैद्धांतिक गोष्टीत कुठेही फेरफार होत नाही. ती तर तिन्ही काळात कोणीही खोडू शकणार नाही. या व्यवहारिक प्रश्नांचे उत्तर मात्र प्रत्येक निमित्ताच्या आधीन असते.

तुम्ही मला ज्याची आठवण करून देता ना, ते सर्व मला दिसते. आमच्या कनुभाईंनी व्यापारातील काही विचारले तर ते सर्व देखील आम्हाला दिसते. पूल दिसतो, त्याचे सर्व खांब दिसतात, कुठे काय आहे, काय नाही ते सर्व दिसते. तुम्ही आठवण करून देता तेव्हा आम्ही उपयोग केंद्रित करतो आणि त्यामुळे सर्व काही क्रमवार दिसते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे उपयोगामुळे दिसते ना?

**दादाश्री :** आठवण करून देता तेव्हा उपयोग तिथेच केंद्रित होतो. कारण जर तिथे उपयोग केंद्रित झाला नाही तर सगळा व्यवहार बिघडेल.

## प्रशस्त राग, मोक्षाचे कारण

वेळ झाली की सर्व काही आठवते. आम्हाला अजून सत्संगावर राग (मोह, आसक्ती) आहे, म्हणून सत्संगाची वेळ झाली की जायचे आठवते. महात्म्यांवर राग असतो. या सर्व रागांना प्रशस्त राग म्हणतात. या रागाने बंधन होत नाही, पण महाविदेह क्षेत्रासाठी बंधन पडते. महाविदेह क्षेत्रात श्री सीमंधर स्वामींकडे जायचे आहे ना सर्वांना. म्हणून

आत्तापासूनच त्यांची ओळख करून घ्यायची असेल तर करून घ्या. म्हणूनच आम्ही त्यांची भक्तीपदे तुमच्याकडून गाऊन घेतो.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला या 'दादां'ची आठवण येते, ते काय आहे?

**दादाश्री :** तो प्रशस्त राग आहे. प्रशस्त राग वीतराग बनविणारा आहे. यावरच राग करण्यासारखा आहे. सगळीकडचा राग उचलून यावरच राग करायचा आहे. आत्महेतूकरिता असलेला राग आणि देहाध्यासासाठी असलेला राग, या दोन्हीत खूप फरक आहे. आत्महेतूसाठी ममता ही आत्म्याची ममता आहे. शेवटी ती मुक्ती प्राप्त करविते.

काही जण जडासारखे असतात. त्यांना पण काही आठवत नसते. समकितरहित विस्मृतीला जडता म्हणतात. ज्याचे जेवण अधिक असेल, जास्त झोपत असेल, आळशी असेल, तर त्यामुळे त्याचा मेंदू सुस्त होतो. त्याने अधोगती होते.

## आठवण? किती मोठा परिग्रह!

परिग्रह कशाला म्हणतात? तर जे आठवत राहते त्याला. अंगठी बोटात आहे की नाही, पडली की पडली नाही, ते देखील आठवत नाही, त्याला अपरिग्रही म्हणतात. त्याग केल्याने अपरिग्रही होता येत नाही. उलट त्याग करायला गेलो की अधिकच आठवत राहते.



# [ 27 ]
# निखालस

## निखालसपणा निर्भय बनवितो

तू जरी पुस्तके वाचली नाहीस आणि तुला काहीही समजत नसले तरी पण माझी हरकत नाही, पण तू निखालस (पारदर्शी) बन, खरा निखालस बन. मग निखालसपणाला शोभेल, असे सारे ज्ञान आपोआपच उत्पन्न होईल.

प्रश्नकर्ता : निखालस असलो तर व्यवहारात फार अडचण होईल.

दादाश्री : कोणी निखालस असूच शकत नाही ना! आत्मज्ञान झाल्यानंतरच तो निखालस होतो.

**प्रश्नकर्ता :** निखालस व्यक्तीला व्यवहारात बावळट समजले जाते.

**दादाश्री :** बावळट लोक निखालस असूच शकत नाहीत. लोक बावळटांना निखालस समजतात. निखालस तर वेगळाच असतो. प्रत्येक बाबतीत तो निखालस असतो, एक-दोन बाबतीत नव्हे.

**प्रश्नकर्ता :** निखालसबद्दल थोडे अधिक स्पष्टीकरण करता का?

**दादाश्री :** निखालस मनुष्य एकदम प्युअर मनुष्य असतो. तो मनुष्य, मनुष्य नसतो, सुपरह्युमन असेल तरच निखालस होता येते.

निखालस तर एकदम 'प्युअर', 'ट्रान्सपरन्ट' (शुद्ध-पारदर्शी) असा असतो. त्याच्या मनात एकही अशुद्ध विचार येत नाही. असे तर नसतेच ना कुठेही? स्वरूपज्ञान मिळाल्यानंतर हळूहळू तसे होता येते.

**प्रश्नकर्ता :** पण व्यवहारात निखालस माणसाचा लोक गैरफायदा घेतात ना?

**दादाश्री :** नाही. उलट जो गैरफायदा घेण्यासाठी आला असेल, तो शंभर फूट दूरच राहील, जवळ येऊच शकणार नाही. त्याची शक्ती निकामी होते, फ्रॅक्चर होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** निखालस म्हणजे जो स्व-स्वरूपात राहतो तो?

**दादाश्री :** स्व-स्वरूपात तर आम्ही ज्ञान दिल्यावर तुम्हीही राहता, पण त्याला निखालस म्हणत नाहीत. निखालस व्यक्तीला संसाराचा एकही विचार येत नाही. हृदय एकदम शुद्ध असते. तुम्ही तर अजून तुम्हाला विचार जे येतात, त्यात तन्मायाकार होऊन जाता. घराचे विचार येतात, व्यापाराचे येतात, विषयाचे येतात. सर्व प्रकारचे विचार येतात, तोपर्यंत मनुष्य ट्रान्सपरंट होऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** निखालस माणसाला कसले विचार येतात?

**दादाश्री :** त्यांना विचार नसतातच. त्यांचे मन फिरतच राहते. समय-समय म्हणजे समयवर्ती झालेले असते.

निखालस पुरुषाच्या सिद्धी असीम असतात. पण ते त्यांचा उपयोग करीत नाहीत. शेवटी तुम्हाला देखील असेच निखालस व्हावे लागेल ना?

कशासाठी जीवन जगायचे आहे? यावर एक निबंध लिहून आणा. त्याच्या पॉजिटिव्ह-निगेटिव्ह सर्व बाजू लिहून आणा. आपल्याला प्रगती तर करावी लागेल ना? असेच सामान्य माणसासारखे कधीपर्यंत बसून राहाल? मला तेराव्या वर्षी असामान्य होण्याचा विचार आलेला. सामान्य म्हणजे भाजी-पाला असे मला वाटत असे. सामान्य माणसाला जे त्रास

होतात, तसे कुठलेही त्रास असामान्य माणसाला होत नाहीत. सामान्य मनुष्य कोणाला मदत करू शकत नाही, तर असामान्य मनुष्य मदत करण्यासाठीच असतो. म्हणूनच जग त्याला एक्सेप्ट (स्वीकार) करते.

**प्रश्नकर्ता :** असामान्य माणसाची परिभाषा काय?

**दादाश्री :** असामान्य म्हणजे जो स्वत: जगातील सर्व लोकांना, प्रत्येक जीवमात्रांना मदतरूप होतो. स्वत: स्वतंत्र होतो, प्रकृतीपासून वेगळा होतो, तेव्हा असामान्य बनतो. सामान्य मनुष्य लाचार देखील होतो, तीन दिवस उपाशी ठेवले तर लाचार होतो. म्हणून असामान्य व्हावे. मग तर स्वत:च्या सुखाला सीमाच राहणार नाही.

आता एखादी थोर व्यक्ती तुम्हाला दिसली तर तुम्हाला लघुताग्रंथी उत्पन्न होते. तुम्ही एकदम प्रभावित होता. अरे, तो सामान्य व्यक्तीच आहे, त्याच्यामुळे प्रभावित कशाला व्हायचे?

निखालस झाल्यावर दुनियेतील कशाचीही भीती बाळगायची गरज राहत नाही. त्याचे तर ऑटोमेटिकली रक्षण होतच राहते. त्याचे भक्षण कोणीच करू शकत नाही. स्वरूप ज्ञान मिळाल्यावर त्याची पूर्णदशा उत्पन्न होईल तेव्हा कोणीही त्याचे भक्षण करू शकणार नाही, कोणी नाव सुद्धा घेणार नाही.



# [ 28 ]
# मुक्त हास्य
## जितका सरळपणा तितके मुक्तहास्य

**दादाश्री :** आपले वय काय?

**प्रश्नकर्ता :** सत्तर.

**दादाश्री :** पाहा ना, या वयात माझ्या समोर बघून असे हसत आहेत जणू बालक हसत आहे! याला सरळपणा म्हणतात. सगळ्यांचे हास्य काय कोणी हिसकावून घेतले आहे? लोक हसत का नाहीत? कारण सरळपणा नाही. म्हणून आम्ही त्यांना सांगतो की 'भाऊ, इथे सत्संगात रोज बसत जा', असे करता करता सरळपणा येईल आणि हास्य खुलेल. आरतीमुळे हास्य खुलते म्हणून तर मी आरतीचा मार्ग दाखवितो. हास्य तर नाभीतून यायला हवे. लोक तर घशातूनच हसतात. याचे काय कारण? तर आत मळ भरलेला आहे. आरतीमुळे सर्व मळ निघून जातो.

**प्रश्नकर्ता :** मुक्तहास्य कशाला म्हणावे?

**दादाश्री :** तुम्ही मुक्तहास्य पाहिले आहे का?

**प्रश्नकर्ता :** आपले हास्य पाहिले आहे ना!

**दादाश्री :** ते तुम्हाला मुक्त वाटते?

**प्रश्नकर्ता :** हो, अगदी वीतराग हास्य वाटते.

**दादाश्री :** यालाच मुक्तहास्य म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आमचे हास्य मुक्तहास्य होण्यासारखे संयोग आहेत, मग ते कशामुळे थांबले आहे?

**दादाश्री :** तुमच्या आत सगळी भुते भरली आहेत. म्हणून थांबले आहे. मुक्त पुरुषाशिवाय कोणी त्यांना काढू शकत नाहीत. मुक्त पुरुष आपल्या मुक्तहास्याने तुम्हाला मुक्तहास्य प्राप्त करवून देतात. आत तऱ्हेतऱ्हेचे आग्रह असतात, त्यामुळे रडण्याच्यावेळी रडत नाही आणि हसण्याच्यावेळी हसत नाही.

हसू का येते? हे वृद्ध काका का जास्त हसत असतात? निर्दोषता आहे म्हणून, सरळपणा आहे म्हणून. सरळ म्हणजे जसे वाकाल तसे वाकणारे, अगदी सोन्याप्रमाणे. त्यांना तासाभरात जसा आकार द्यायचा असेल तसा देता येतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे निर्दोषता वाढली की हास्य वाढते, असे असते का?

**दादाश्री :** हो, तो निर्दोषपणाचाच गुण आहे. आजचे एटिकेटवाले (शिष्टाचारवाले) लोक, जे टेबलावर हसत-हसत जेवतात त्यांना पॉलिश्ड म्हणतात. ते तर नवीनच प्रकारचे तृतीयम हास्य म्हटले जाते. असे नकली हसण्यापेक्षा गप्प बसलेले बरे. नकली बोलण्यापेक्षा कमी बोललेलेच बरे.

हे काका जेव्हापासून आले आहेत तेव्हापासून त्यांच्यात एक नवीनच प्रकारचा, अनोखा आनंद प्रकट होत आहे. ते फक्त मला आणि त्यांनाच कळते. कारण ते सरळ आहेत, म्हणून आमच्या दर्शनानेच त्यांना आनंद झाला!

## मुक्तहास्य, मुक्त पुरुषाचे

'ज्ञानी पुरुष' नेहमीच मुक्त अवस्थेत असतात, त्यामुळे समोरच्याचे अंतरंग खुलत जाते! आमचे मन मुक्त राहते, कोणत्याही अवस्थेत एक क्षणभरही ते बांधले जात नाही. 'ज्ञानी पुरुषां'च्या दर्शनानेच सर्व उल्हासित होतात, आणि त्यामुळे तर किती तरी कर्मे नष्ट होतात.

संपूर्ण वीतराग भगवंताशिवाय आणखी कोणचेही हास्य कर्मरहित नसते. असे हास्य या काळात प्रकट झाले आहे, अक्रम विज्ञानाच्या 'ज्ञानी पुरुषा'कडे प्रकट झाले आहे. (मोक्षाचे) कामच होऊन जाईल असे आहे. सर्वस्व कर्म भस्मीभूत करील असे आहे! 'ज्ञानी पुरुषां'ना केव्हाही पाहिले, रात्री दोन वाजता पाहिले तरी एकाच प्रकारचे मुक्तहास्य असते! आणि इतरांचे हास्य कषायांमुळे स्तंभित झालेले असते.

**प्रश्नकर्ता :** वैराग्य आल्यामुळे मुक्त हास्य थांबते का?

**दादाश्री :** वैराग्यात तर उदासीनता येते. उदासीनता अपूर्ण आहे, आणि मुक्त हास्य तर पूर्ण आहे.

**प्रश्नकर्ता :** आपल्याशी बोलताना कधीकधी आम्ही मुक्तपणे हसतो, त्याला मुक्तहास्य म्हणू शकतो का?

**दादाश्री :** हो, त्यावेळचे हास्य मुक्त असते. अशी प्रॅक्टिस होते, नाही तर आम्हाला 'दादा भगवानांचा असीम जय जयकार होवो' असे म्हणवून घ्यायची काय गरज आहे? त्यावेळी आतील कचरा निघून जातो आणि तुम्ही मुक्त होता.



# [ 29 ]
# चिंता : समता

## भूतकाळ, आता कोण आठवतो?

**प्रश्नकर्ता :** उद्याची काळजी केली नाही तर कसे चालेल?

**दादाश्री :** उद्या नसतोच, उद्या तर कोणी पाहिलेलाच नाही या जगात. जेव्हा पाहाल तेव्हा आजच असतो. उद्या तर अडचणींना आमंत्रण देणारा आहे. (गेलेल्या) कालचा अर्थ जो काळ निघून गेला आहे तो. भूतकाळ म्हणजे निघून गेलेला काळ. म्हणजे येणाऱ्या उद्याची चिंता करण्याचे कारणच नाही.

**प्रश्नकर्ता :** मग आधीपासूनच तिकीट का काढून ठेवता?

**दादाश्री :** तो तर एविडन्स आहे. तो कधी कधी खरा होणारही नाही. तुम्ही प्रोग्रॅम बनवता ना की 25 तारखेला मुंबईला जायचे आहे, 28 तारखेला बडोद्याला जायचे आहे? तुम्हाला ते सर्व वीजन आहेच. पण त्या वीजनने तुम्ही यथार्थ रूपात पाहत नाही. तुम्ही तर हडबडी वीजनने पाहता. यथार्थ वीजनमध्ये तुम्ही स्थिर राहून पाहू शकता. नियम असा आहे की ठराविक बाउंड्रीपर्यंत तुम्ही पाहाल तर यथार्थ वीजन मिळेल जर आज त्या बाउंड्रीच्या पलीकडचे पाहायला जाल तर आता तुम्ही ठोकर खाल. ज्याची गरज नाही ते पाहू नका. आपण सतत घड्याळाकडे पाहत राहिलो तर उलट इथे ठोकर लागेल. म्हणून या वीजनमध्ये काही हद्दीपर्यंतचेच पाहत-पाहत चालले पाहिजे.

जिथे उद्या नावाची काही वस्तूच नाही, मग त्याला काय अर्थ आहे? जो काल चालू आहे तो आज आहे आणि निघून गेलेल्या काळाला काल म्हणतात. तो भूतकाळ आहे. भूतकाळाची आठवण तर कोणी मूर्ख देखील काढत नाही आणि येणारा काल तर 'व्यवस्थित'च्या हाती आहे. म्हणून वर्तमानात राहा, फक्त वर्तमानकाळातच राहा.

## परसत्ता अधिकार, चिंतेला जन्म देते

ज्या घरात चिंता असते, तिथे सर्व अडचणी येतच राहतात. चिंता हा अहंकार आहे. हे सर्व चालविण्याची सत्ता तुमच्या हाती आहे का? ज्याची सत्ता आहे त्याची सत्ता जर आपण आपल्या हाती घेतली तर मग तो त्यात परत हात घालणार नाही. म्हणून तुम्ही सर्व त्या सत्तेवर सोडून द्या.

**प्रश्नकर्ता :** चिंता वाटू नये म्हणून काय करावे?

**दादाश्री :** परत फिरावे. किंवा इगोइजम नष्ट करावा. जर 'ज्ञानी पुरुष' असतील आणि त्यांनी ज्ञान दिले तर मात्र चिंता राहणारच नाही. चिंता करण्याचे फळ काय मिळते?

**प्रश्नकर्ता :** ते माहीत नाही.

**दादाश्री :** चिंतेच फळ जनावर गती आहे. चिंता ही अबॉव्ह नॉर्मल इगोइजम (सामान्यपेक्षा अधिक अहंकार) आहे.

**प्रश्नकर्ता :** मला तर खूप चिंता वाटते.

**दादाश्री :** तुम्हाला थोडीशीच चिंता आहे, म्हणून तर तुम्हाला इथे येण्यासाठी वेळ मिळाला. या शेठ लोकांना तर शौचाला जाण्यासाठीही वेळ मिळत नाही. एवढ्या साऱ्या चिंता असतात. दोन कारखाने झाले, आता तिसरा बनवायचा आहे! लोभ, लोभ आणि लोभच. तुम्ही किती मिळवायचे ठरवले आहे? दहा लाख रुपये?

**प्रश्नकर्ता :** जितके जास्त मिळतील तेवढे बरे.

**दादाश्री :** अजूनही तुमचे पूर्ण झालेच नाही का? हे काळे केस

पांढरे झाले तरी पण पूर्ण झाले नाही? म्हणूनच हा धोका आहे. आता मुकाट्याने त्याचा नाद सोडा आणि मजेत चहा-नाश्ता करा, जेवण करा आणि मग कामधंदा करा!

## सफलतेसाठी चिंता अवरोधक

चिंता केल्यामुळे प्रत्येक काम उशिरा होते. इथून बाहेर पडून सकाळ कधी होईल, सकाळ कधी होईल, अशी चिंता करत रात्रभर बसून राहिलात तर सकाळ लवकर होईल का? उलट उशिरा होईल. त्यापेक्षा पांघरूण घेऊन झोपा ना. चिंतेमुळे काम पुढे ढकलले जाते. भाजी मिळेल की नाही याची चिंता करत बसलात तर तीही मिळणार नाही.

ज्याचा उपाय नाही त्याची चिंता का करावी? मरणावर उपाय नाही, म्हणून त्याची कुणी चिंता करतो का?

चिंता वाटली तर तुम्ही काय करता?

**प्रश्नकर्ता :** ईश्वर स्मरण करतो.

**दादाश्री :** तुमचा कोणी अनोळखी मित्र आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही. पण ओळखीशिवाय मैत्री कशी होईल?

**दादाश्री :** तसेच ओळख असल्याशिवाय भगवंताचे स्मरण कसे होईल?

चिंता वाटायला लागली की समजून चला की काम बिघडणार आहे आणि चिंता वाटली नाही तर समजा की काम बिघडणार नाही. चिंता कार्यात अवरोधक आहे. चिंतेमुळे व्यापार बिघडतो.

**प्रश्नकर्ता :** ही चिंता कशामुळे होते?

**दादाश्री :** 'मी चंदुभाई' आहे असा आरोपित भाव आहे, म्हणून. तुम्ही 'रियल' स्वरूप जाणत नाहीत म्हणून. चिंता केव्हा होते? मनात विचार आला आणि त्यात तन्मयाकार होता तेव्हा. विचार जड आहेत

आणि स्वत: चेतन आहे. जड-चेतन यांचे मिश्रण झाले की चिंता होते. चिंता हा मनाचा परिषह आहे. परिषह म्हणजे वेदना निर्माण होणे. चिंता वाटू नये यासाठी ठरवा की मनाचे विचार हे सूक्ष्म संयोग आहेत, ते 'ज्ञेय आहेत' आणि 'मी ज्ञाता आहे' विचार तर येतीलच पण त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल. किंवा मग त्यांचे निर्माल्य करावे लागेल. विचार येतात तो निर्जीव भाग आहे. विचार केला की अंतराय पडतात. जी शक्ती आपली नाही तिथे हात कशाला घालायचा?

आम्ही हे 'अक्रम ज्ञान' देतो, त्यानंतर जर चिंता वाटली तर वकील करून आमच्यावर खटला चालवा, अशी गॅरंटी देतो. सांसारिक चिंता गेल्या म्हणजे प्रथम मोक्ष झाला. मग पूर्वीचे जे हिशोब आहेत ते चुकते झाले, तो दुसरा मोक्ष. दुसरा मोक्ष म्हणजे पूर्णाहुती.

## भ्रांतीत शांती असते का?

या जगात शांती कशी राहील? करोडो रुपये असले तरी राहणार नाही. जिथे भ्रांती आहे, तिथे शांती कशी असेल?

**प्रश्नकर्ता :** ही शांती कायम का राहत नाही? एवढा धर्म करून सुद्धा?

**दादाश्री :** कारण तुम्ही नेहमी अचेतनमध्ये राहत असता. चेतनमध्ये राहिलात तर निरंतर सुख राहील.

**प्रश्नकर्ता :** शांती मिळवण्यासाठी कसले प्रयत्न केले पाहिजेत?

**दादाश्री :** ज्यात प्रयत्न करावे लागतात, त्यात शांती नसतेच मुळी, ती तर नसती उठाठेव आहे.

जगात अनेक प्रकारची शांती असते, पण ती सर्व मूर्च्छित शांती आहे. आणि आत्मशांती तर कुठल्याही प्रकारची मूर्च्छा नसलेली शांती असते. आत्मशांतीमुळे तृप्ती होते, आणि मूर्च्छित शांतीमुळे तृप्ती होत नाही.

अशांती गेली आणि शांती प्राप्त झाली की समजावे आता कर्म बंधन होणे थांबले आहे, त्यानंतरच सर्व उलगडा होईल.

## ज्ञानींच्या सानिध्यात कशी निराकूलता!

एकदा आम्ही 'विहार लेक'ला फिरायला गेलो होतो. तिथे शयदा साहेब, त्यांच्या एका कॉर्पोरेटर मुसलमान मित्राला आमचे दर्शन करण्यासाठी घेऊन आले. त्यांची पत्नी, मुले-बाळे सर्व आली होती. ते खूप विचारवंत आणिअवलियासारखे होते. ते खाली जमिनीवर बसले, तर कुणीतरी म्हणाले, 'खाली मुंग्या चावतील तर 'दादां'च्या जवळ बसा.' त्यावर ते म्हणाले, 'दादा हजर असताना मुंग्या कशा चावतील?' मग आम्ही त्यांना आमच्याजवळ बसवले. दहा मिनिटांनी म्हणाले, 'मी इतक्या धार्मिक स्थळात फिरलो पण या दहा मिनिटात मला जी शांती मिळाली, तशी शांती कुठेच मिळाली नाही. तर याचे कारण काय?' तेव्हा मी त्यांना म्हटले, 'याचे दुसरे काही कारण नाही. आता तुम्ही अल्लाहच्या खूप जवळ बसला आहात. अल्लाहच्या जवळ गेलो तर सुख-शांती नाही का वाटणार? अल्लाह 'माझ्या' अगदी जवळ, खेटूनच बसले आहेत आणि तुम्ही माझ्याजवळ बसले आहात. म्हणजे तुम्ही खूप जवळ आलात ना? मग किती शांती वाटेल!'

'ज्ञानी पुरुषां'जवळ तर कॅश डिपार्टमेंट आहे. 'धिस इज दि कॅश बॅंक ऑफ डिव्हाइन सोल्यूशन (ही तर अलौकिक उपायांची नगद बॅंक आहे.)' ज्याचे पुण्य जागे झाले तो मला भेटतो आणि त्याचे काम होते.

**प्रश्नकर्ता :** आनंद, शांती कशाला म्हणतात?

**दादाश्री :** शांती 'रिलेटिव्ह'मध्ये असते आणि परमानंद पूर्णत्वात असतो. परमानंद म्हणजे परमतृप्ती. या देहाचे हिशोब चुकते होतात तेव्हा तृप्ती वाटते, परमानंद वाटतो. देहाचे ओझे आहे तोपर्यंत तृप्ती वाटत नाही.

## जिथे समता तिथे राग-द्वेष नाही

समता फार मोठी गोष्ट आहे. घरी बायको बोलली आणि आपण ऐकून घेतले, त्याला लोक समता म्हणतात. परंतु ती समता नाही. आत *अजंपा* (बैचेनी, अशांती, भीती) असेल तर त्याला समता कसे म्हणता येईल?

समता कशाला म्हणतात? तर फुले वाहिली तरी त्याच्यावर राग नाही आणि शिव्या दिल्या तरी त्याच्यावर द्वेष नाही. शुभ असो वा अशुभ, दोन्ही सारखेच मानतो. शुभाशुभात राग–द्वेष होत नाहीत याला समता म्हणतात. असे समान तर वीतरागीच मानू शकतात.

## समभाव–समता, फरक काय?

**प्रश्नकर्ता :** समता आणि समभाव यात काय फरक आहे?

**दादाश्री :** खूप फरक आहे. समभाव म्हणजे काय? तर तराजू एका बाजूला झुकला की दुसऱ्या बाजूला काही तरी टाकून त्याला सारखे करणे, हा बेडकांचा तोल (बेडूक ठेवून तोल सारखा ठेवण्याचा प्रयत्न करणे) किती वेळ टिकेल? तरीही समभाव हा उत्तम भाव मानला गेला आहे. बॅलेन्स ठेवण्याचा प्रयत्न करतात ना? आणि समता म्हणजे तर फुले वाहिली तरी त्याचा राग नाही आणि शिव्या दिल्या तरी द्वेष नाही, उलट त्याला आशीर्वादच देतात.

## 'समभावाने निकाल' हे निश्चित केल्यावर उलगडा

या 'अक्रम' विज्ञानात 'समभावाने फाइलींचा निकाल'– ही एक आश्चर्यकारक गोष्ट आहे. 'फाइलींचा समभावाने निकाल' करा ही आमची आज्ञा पाळण्याचा जर तुम्ही निश्चय केला की निकाल (निपटारा) करायचाच आहे', तर ते तुमच्याकडे लगेच हजर होईल. आपला निश्चय हवा की निकाल करायचा आहे, हे शब्दच ज्ञानस्वरूप आहेत. मग बाहेरचे सर्व 'व्यवस्थित शक्ती'च्या आधीन आहे. तुमची दृढ भावना असली पाहिजे की मला ही आज्ञा पाळायचीच आहे.

समभावाने निकाल करणे म्हणजे संयोगाचे अनुसरण करून काम करणे. समतेमध्ये असे नसते.

नावडती व्यक्ती आली की आत मन, बुद्धी, चित्त, अहंकार सगळे धुमाकूळ घालतात. त्यावेळी आपण म्हटले की समभावाने निकाल करायचा आहे, की मग सर्व चूप होतात. समभावाने निकाल करण्याचे

ठरविले, तेव्हापासूनच समोरच्या व्यक्तीवर त्याचा परिणाम होतो आणि तो सुद्धा शांत होतो. जर कधी खूप चिकट हिशोब असेल तर कदाचित शांत होणारही नाही! पण ते आपल्याला पाहायचे नाही, आपल्याला तर दृढ निश्चय करायचा आहे की समभावाने निकाल करायचाच आहे. कधी न कधी तो शांत झाल्याशिवाय राहणारच नाही. सर्व काही 'व्यवस्थित'नुसार होतच असते.

## समताभाव : ज्ञाता-दृष्टाभाव

**प्रश्नकर्ता :** समतेच्या आणि ज्ञाता-दृष्टा भाव यात काय फरक आहे?

**दादाश्री :** समतेच्या या स्थितीत तर डुलकी लागते, म्हणून मग टपली मारून जागे करावे लागते. याउलट ज्ञाता-दृष्टा तर कायम जागृतच असतो.

**प्रश्नकर्ता :** समता ही मनाची स्थिती आहे का?

**दादाश्री :** मनाची स्थिती तर आहे, पण मनाची अशी स्थिती केव्हा राहील? तर आत जागृती असेल, ज्ञान असेल, तरच राहील. अन्यथा मन तर नेहमीच या बाजूला किंवा त्या बाजूला झुकलेलेच असते. समता केव्हा राहते? तर आत्मा प्राप्त झाल्यावर.

जोवर 'मी चंदुलाल आहे' (असा भाव आहे) तोवर विषमता झाल्याशिवाय राहणारच नाही, आणि 'मी शुद्धात्मा आहे' याचे भान झाले की काम झालेच समजा.

## तृष्णा, तृप्ती आणि संतोष

संसारात खातो-पितो, उपभोगतो त्याने संतोष होतो, परंतु तृप्ती नाही. संतोषातून नवीन बीजे पडत राहतात. पण तृप्ती झाली की मग तृष्णा राहत नाही, निघून जाते. तृप्ती आणि संतोष यात खूप फरक आहे. संतोष तर सर्वांनाच होतो, पण तृप्ती मात्र एखाद्यालाच असते. संतोषामध्ये परत विचार येतात. खीर खाल्ली की संतोष होतो पण नंतर

परत तिची इच्छा होते. याला संतोष म्हणतात. याउलट तृप्तीत मात्र परत इच्छा होतच नाही, तिचा विचार देखील येत नाही. तृप्त व्यक्तीला तर विषयाचा एक सुद्धा विचार येत नाही. आणि हे तर कितीही समजूतदार असले, पण तृप्ती नसल्यामुळे विषयांमध्ये अडकून राहिले आहेत! वीतराग भगवंताचे विज्ञान, हे तृप्तीच मिळवून देणारे आहे.

लोक म्हणतात, 'मी खातो.' अरे, तुला भूक लागली आहे, ती तू विझवतोस ना? पाण्याची तहान बरी पण लक्ष्मीची तहान भयंकर म्हटली जाते. लक्ष्मीची तृष्णा कोणत्याही पाण्याने भागत नाही.

ह्या इच्छा कधी पूर्ण होतच नाहीत. संतोष होतो, पण तृप्ती होत नाही. संतोष सायकॉलॉजिकल (मानसिक) परिणाम आहे, तो टिकत नाही.

साधनांमध्ये तृप्ती मानणे, हे मनोविज्ञान आहे आणि साध्यात तृप्ती मानणे, हे आत्मविज्ञान आहे.



# [ 30 ]
# संयम परिणाम

## यथार्थ संयम कशाला म्हणतात?

बाह्य संयमाला भगवंताने संयम म्हटलेले नाही. तो तर उदयाधीन आहे. उदयाधीन संयमाला 'मी संयम ठेवला' असे म्हणणे, ही भ्रांती आहे.

**प्रश्नकर्ता :** खऱ्या अर्थाने संयम परिणाम कशाला म्हणतात?

**दादाश्री :** पर-परिणती उत्पन्न होतच नाही, त्याला संपूर्ण संयम म्हणतात. आणि वृत्ती आपल्या घराकडे परत जाऊ लागल्या, अंश रूपाने त्याची सुरुवात झाली की त्याला संयम म्हणतात. संयम परिणाम समकित झाल्यानंतर होतो.

विषयांच्या संयमाला संयम म्हणत नाहीत. क्रोध-मान-माया-लोभ यांच्या संयमाला संयम परिणाम म्हणतात. आणि हा जो त्याग आहे तो तर वस्तूंचा त्याग आहे, लक्ष्मीचा त्याग आहे, विषयांचा त्याग आहे, त्याला नाही म्हणता येणार नाही. पण त्याला त्याग म्हणू शकतो, भगवंतांच्या भाषेतील संयम म्हणू शकत नाही. देहाच्या संयमाला संयम म्हणू शकत नाही, तो उदयाधीन आहे. पूर्व प्रारब्धाधीन आहे. आणि संयमित मन पुरुषार्थाच्या आधीन आहे.

भयंकर विषम परिस्थितीत संयम राहिला पाहिजे.

एक ताई आली होती. तिने मला म्हटले 'रात्री माझ्या नवऱ्याने मला एक थोबाडीत मारली'... तेव्हा मी तिला विचारले, 'मग तू काय केलेस?' ती म्हणाली 'मी दुसरा गाल पुढे केला.' मी विचारले 'त्यावेळी तुझ्या आत काय परिणाम झाला?' तेव्हा ती म्हणाली, 'बिलकुल शांत. कोणताही वाईट विचार आला नव्हता. आपले ज्ञान लगेच हजर झाले.'

याला संयम म्हणतात. जग रडून मार खाते, तर ज्ञानी हसून मार खातात. भोगावे तर लागेलच ना?

## संयमामुळेच आत्मशक्ती प्रकट होते

एकदा असा संयम पाळला की त्याच्यात दोनदा संयम पाळण्याची शक्ती उत्पन्न होते. मग दोनातून चार, आणि चारातून सोळा पट शक्ती उत्पन्न होते, मल्टिप्लिकेशनचा नियम आहे हा. यात आत्मा अनंतशक्तीवाला आहे. संयमामध्ये आले की सर्व शक्ती प्रकट होत जातात.

स्वानुभव पद म्हणजे काय? आत्मा प्राप्त केल्यानंतर जेवढा संयमात राहिला तेवढे स्वानुभव पद, असे म्हणतात. ज्याला एक अंश झाले, त्याला मग सर्वांश होतो.

संयमधारीला तर भगवंताने देखील वाखाणले आहे. ज्यांनी यमराजालाही वश केले आहे, अशा संयमधारींचे तर दर्शन घेतले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** यमराजाला वश केले ते कसे?

**दादाश्री :** यमराजाला वश केले असे कधी म्हणतात तर, जेव्हा मुत्यूचे भय राहत नाही तेव्हा.

## संयमाच्या संधीचा फायदा घ्या

कोणी म्हटले की 'चंदुभाईनी हे सर्व बिघडविले.' त्यावेळी तुमच्या आतील परिणाम बदलतात. पण 'हे चुकीचे होत आहे' असे 'जाणणे' याला अर्धसंयम म्हणतात, आणि आत असे परिणाम उत्पन्नच होत नाहीत त्याला पूर्ण संयम म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** मला कोणी टोकले, रागावले किंवा शिवी दिली,

तर मी त्या बाजूची खिडकी बंदच करून घेतो, न ऐकल्यासारखे करतो. मग भले तो बोलत राहो.

**दादाश्री :** हा तर तुम्हाला संयमासाठी 'स्कोप' (संधी) मिळाला, पण त्याचा तुम्ही फायदा घेतला नाही. तुम्ही कोणाला म्हणाल की, 'तुम्ही मला रागवा आणि मी संयम ठेवेन', असे तर होणारच नाही ना! आणि जेव्हा असे नैसर्गिकपणे घडते तेव्हा आपण कान बंद करून म्हटले की, 'हट, तो तर बोलतच राहतो, त्याला अशीच वाईट सवय आहे.' असे केले तर काय फायदा? दुर्गंध आला आणि आपण नाक दाबून ठेवले तर त्यात काय संयम केला?

आम्ही पूर्वी एक बक्षीस ठेवले होते की ज्याला कुणाला पैशाची अडचण असेल त्याने आम्हाला एक थप्पड मारावी आणि पाचशे रुपये घेऊन जावे. आपल्याला फुकटात मारायला कोण तयार होईल? अरे, बक्षीस जाहीर केले तरी पण कोणी मला मारायला आले नाही. लोक म्हणायला लागले, 'तुम्हाला मारून आम्ही कुठे जाऊ?' तर असे आहे हे. म्हणून नैसर्गिकपणे मिळालेला स्कोप चुकवू नका.

आमची शक्ती संयमाच्या गुणाकाराने वाढत गेली. ज्ञान झाल्यावर तर आम्हाला अनंत संयम परिणाम असतात. म्हणून जे मिळाले ते सर्व फायदेशीर, बाहेरील उपसर्गात तर आत्म्याचा संयम जबरदस्त असतो.

## संयम हाच पुरुषार्थ

खरा संयम आत्म्याच्या उपस्थितीत उत्पन्न होतो. स्वतःच्या स्वरूपाची प्रतीती आली, की तेव्हापासून तो खऱ्या संयमात येतो. त्यानंतरच स्वतःचे दोष दिसतात, आणि त्याचे तो प्रतिक्रमण करतो, हा खरा संयम आहे. संयमालाच पुरुषार्थ म्हटले आहे. पुरुष झाल्यावर, आत्मा जाणून घेतल्यावर पुरुषार्थ होऊ शकतो. संयम पुरुषालाच लागू होतो. प्रकृतीसाठी लागू होत नाही. प्रकृती उदयकर्माच्या आधीन आहे, तिथे कसला संयम? आत्मा प्रकट झाल्यानंतरच वास्तविक संयम स्वरूपात आला असे म्हणता येईल. बाकी, हा लौकिक संयम तर व्यवहाराची प्रॅक्टिस करण्यासारखा आहे.

फक्त संयमीच जागृत असतात. संयमी पुरुष तर एका नुकसानीतून दुसरे नुकसान उत्पन्न होऊ देत नाहीत. कोणी जात असेल आणि त्याच्या अंगावर निखारे पडले आणि आत *कढापा-अजंपा* (कुढणे, क्लेश, बैचेनी, अशांती, भीती) निर्माण झाला, तर भाजणे हे एक नुकसान तर झालेच. आणि हे दुसरे भयंकर नुकसान उत्पन्न झाले. म्हणजे असे दिवाळेच काढत राहतात. एका नुकसानीतून अनंत नुकसान उत्पन्न करतात. परंतु ज्ञान त्याला झाडून काढते आणि त्यातून जे संयमसुख उत्पन्न होते त्याचे तर वर्णनच करता येणार नाही, असे आहे.

व्यवहार चांगला कधीपासून मानला जातो? जेव्हापासून संयमित होतो तेव्हापासून, असंयमीचा व्यवहार पूर्ण मानला जात नाही. 'ज्ञानी पुरुषांची' तर वाणी, वर्तन सर्व काही संयमित असते, मनोहर असते.

## लोभासमोर संयम कशा प्रकारे?

**प्रश्नकर्ता :** मानाचा संयम, लोभाचा संयम हे जरा समजवावे.

**दादाश्री :** असे आहे की, काही लोकांमध्ये मानाचा संयम काही प्रमाणात आलेला असतो. कोणी शिव्या दिल्या, अपमान केला, तर तो अर्धसंयम पाळू शकतो. पण मग लोभाच्या बाबतीत मात्र सर्व भान हरपते. तिथे असंयम जास्त प्रमाणात उत्पन्न होतो. नंतर खूप वेळाने जागृती येते, तो वन फोर्थ (एक चतुर्थांश) संयम असतो. वाण्याची लोभाची ग्रंथी मोठी असते आणि क्षत्रियाची मानाची ग्रंथी मोठी असते. ज्याची जी ग्रंथी मोठी असेल, त्यात संयम पाळता येत नाही. तिथे पुरुषार्थ धर्मात आणि पराक्रमात यावे लागेल.

परिषह किंवा उपसर्ग आले तरी आत परिणाम होऊ न देणे आणि परिणाम झालाच तर त्याला 'जाणणे' हा संयम आहे. वेदनेला 'जाणणे' हा संयम आहे. महावीर भगवंत वेदनेला 'जाणत'च होते, वेदत नव्हते, नाटकीयच वेदत होते.



# [ 31 ]
# इच्छापूर्तीचा नियम

## निसर्ग किती नियमबद्ध

जगात वस्तू संख्य आहेत आणि मनुष्यांच्या इच्छा असंख्य आहेत, अनंत आहेत. जगातील लोकांच्या इच्छांची यादी बनविली आणि जगातील सर्व लक्ष्मीची यादी बनविली तर त्याचा मेळ बसेल का?

**प्रश्नकर्ता :** इच्छा पूर्ण व्हाव्यात यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** मनाचा स्वभाव असा आहे की ते नवीन गोष्टी शोधत असते. घरासाठी नवा सोफा शोधतो. नवा फ्लॅट शोधत असतो. तब्येत चांगली असेल तर फ्लॅटची गोष्ट करतो आणि तब्येत बिघडली तर म्हणेल 'आता फ्लॅट नको.' तब्येत सुधारावी म्हणून नवस धरतो! मन तर माकडासारखा उड्या मारत राहते आणि ते सुद्धा विना शेपूट! निसर्ग काय सांगतो, ''मी तुला जे देतो त्याला करेक्ट मान, 'व्यवस्थित' आहे असे मान.'' तुझ्या सर्व इच्छा मी हळूहळू, माझ्या सोयीनुसार पूर्ण करेन. तू मरण्याआधी मी तुझ्या इच्छा पूर्ण करेन.

इच्छा मेल्यावर वस्तू मिळते. एक व्यक्ती पंचावन्न वर्षाची होती, तोपर्यंत विवाहाचा विचार करत होती आणि लोकांना सतत सांगत असे की माझ्यासाठी कोणी मुलगी पाहून द्या. आणि तो जेव्हा अठ्ठावन्न वर्षाचा झाला तेव्हा कुणीतरी सांगायला आले की 'आमची एक मुलगी आहे' 'जर तुला विवाह करायचा असेल तर बघ.' तेव्हा तो म्हणाला, 'नाही, आता माझी इच्छा मरून गेली आहे.'

आजीबाई सत्तर वर्षांच्या झाल्यावर तिच्यासाठी हिऱ्यांच्या कुड्या आणल्या तर त्याला काय अर्थ आहे?

पण निसर्गाचे हे नियम वेगळ्या प्रकारचे आहेत. उर्ध्वगतीत घेऊन जाणारे नियम वेगळे आणि अधोगतीत ओढून नेणारे नियम वेगळे. इच्छा तर सर्वांच्या पूर्ण होणारच.

निसर्गाचा नियम असा आहे की इच्छा झाली आणि वस्तू मिळाली, म्हणजे ते घसरून पडत आहेत, अधोगतीला जात आहेत. आणि इच्छा झाली की वस्तू मिळत नाही आणि वस्तू मिळाली की इच्छा राहिलेली नसते, हे उर्ध्वगतीत नेणारे आहे. ते चांगले आहे.

**प्रश्नकर्ता :** कित्येकांना तर इच्छा झाल्याबरोबर वस्तू मिळते, त्याला काय म्हणावे?

**दादाश्री :** इच्छा लगेच पूर्ण झाली तर तो असा रंगात येतो, असा रंगात येतो आणि मग मार खाऊन खाऊन मरतो, आणि अधोगतीला जातो. कारण मनाचा स्वभावच असा आहे की एकदा उड्या मारण्यासाठी जागा दिसली की तो उड्या मारतच राहतो!

हे कलियुग आहे, म्हणून इच्छा झाली आणि ती पूर्ण झाली की मग अहंकार वाढतो आणि मग गाडी उलटी चालू लागते. म्हणून या काळात तर ठोकर लागणे, हेच चांगले म्हणायचे. पुण्याच्या आधारावर इच्छा पूर्ण झाल्यावर बघा, लोक किती धुमाकूळ घालतात. इच्छेनुसार झाले म्हणून तर ही अवस्था झाली! पुण्य होते ते खर्च होऊन गेले आणि अडचणी उभ्या राहिल्या. वेडा अहंकार आहे त्यामुळेच ना? म्हणून ठोकर खात खात प्राप्ती होण्यातच या काळात फायदा आहे.

निसर्गाने ही किती सुंदर व्यवस्था केली आहे! ज्याला उर्ध्वगतीत जायचे आहे त्याला त्याच्या इच्छेनुसारच सर्व काही द्यायचे, पण त्या इच्छा संपल्यानंतर. आणि अधोगतीत जायचे असेल त्याला लगेचच वस्तू द्यायच्या. तेव्हा निसर्गाची ही गोष्ट नीट समजून घ्या.

## इच्छा तिथे अंतराय

**प्रश्नकर्ता :** इच्छेचे उद्‌भवस्थान कोणते?

**दादाश्री :** इच्छा संयोगाच्या दबावाने उत्पन्न होते. आता कोणालाच पांघरून घ्यायची इच्छा होत नाही, पण एकदम थंडी पडली तर सर्वांना त्याची इच्छा होईल. ते संयोगांच्या दबावामुळे आहे.

**प्रश्नकर्ता :** इच्छा परतंत्रता आहे. मग कसलीही इच्छा करायचीच कशाला?

**दादाश्री :** इच्छा करायची नसेल तरीही ती सुटेल असे नाही ना!

**प्रश्नकर्ता :** परब्रह्मात तर इच्छा आणि मन असे काहीच राहत नाही.

**दादाश्री :** परब्रह्मात इच्छा नसतेच. इच्छा ही परवशता आहे. या जगात निरिच्छक पुरुष असतील तर ते फक्त 'ज्ञानी पुरुष' आहेत. निरिच्छक म्हणजे ज्यांना कुठल्याही प्रकारची इच्छा होत नाही. साऱ्या जगातील सोने त्यांना दिले तरी ते त्यांच्या कामाचे नसते, विषयांचा विचारही ज्यांना येत नाही, मान-अपमानाची पर्वाच नाही, कीर्तीचे, शिष्यांचे, मंदिर उभारण्याचे जे भिकारी नाहीत, या देहाचे देखील भिकारी नसतात. ज्यांची देहाबद्दलची स्वामित्व भावना नाहीशी झाली आहे, असे 'ज्ञानी पुरुष' आपल्याला निरिच्छक बनवितात.

स्वतःच्या उपयोगात कधी राहता येते? जेव्हा सर्व इच्छा मंद होतील तेव्हा. कधी ना कधी तर मंद कराव्याच लागणार ना! किंचितमात्र इच्छा म्हणजे भीक आहे. आम्ही संपूर्ण निरिच्छक झालो आहोत, म्हणून हे ज्ञानीपद प्राप्त झाले आहे.

इच्छा पूर्ण झाल्या की अंतराय राहत नाहीत. कारण इच्छा केली तर त्याचा अंतराय पडतो.

ज्याला जी इच्छा असेल ती त्याला दिसत नाही. कारण इच्छेचे आवरण आलेले असते ना!

**प्रश्नकर्ता :** तीव्र इच्छा पूर्ण करण्याचा उपाय काय?

**दादाश्री :** ज्याची तीव्र इच्छा होते ती वस्तू मिळाल्याशिवाय राहत

नाही. दोन वर्षात, पाच वर्षात तरी मिळेल. तीव्र इच्छा स्वत:च म्हणते की ती पूर्ण होणारच. मोक्षाला जाणाऱ्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात, तेव्हाच ते मोक्षाला जाऊ शकतात.

## इच्छा, त्याचे प्रत्याख्यान

तुम्ही सर्वांनी आत पडताळून पाहिले पाहिजे की कुठल्या कुठल्या इच्छा राहून गेल्या आहेत? आधी विचारा की सिनेमा पाहायची इच्छा आहे? तर म्हणेल 'नाही'. नंतर दुसरा प्रश्न विचारा, तिसरा प्रश्न विचारा, आतूनच उत्तर मिळेल. सकाळी उठल्यावर पाच वेळा अगदी मनापासून बोला, 'या जगातील कुठलीही विनाशी वस्तू मला नको आहे.' इतके बोलून सुरुवात करावी. तरी सुद्धा इच्छा झालीच तर लगेचच प्रत्याख्यान करावे. इच्छा नसताना इच्छा झाली, प्लस झाले की या प्रकारे मायनस केले पाहिजे. मग जोखीम राहणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आत आशा-निराशा का येतात?

**दादाश्री :** आशा-निराशा, इच्छा, हे देहाचे धर्म आहेत. देह त्याच्या धर्माचे पालन करीत राहतो. आत्म्याला कसलीही इच्छा आहे का? आत्म्याला इच्छा झाली तर त्याला भिकारी म्हणावे लागेल. आत्मा प्राप्त झाल्यावर ज्या-ज्या इच्छा झाल्यासारख्या वाटतात, त्या सर्व डिस्चार्ज इच्छा आहेत, त्या निकाली इच्छा आहेत. 'चार्ज' इच्छा हे बंधन आहे.

**प्रश्नकर्ता :** इच्छा चार्ज झाली असे केव्हा म्हणता येईल?

**दादाश्री :** 'मी चंदुलाल आहे' हे नक्की आहे का तुमचे?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तर मग कर्त्याशिवाय कर्मबंधन कसे पडेल? मी 'चंदुलाल आहे' हे अज्ञान आहे आणि अज्ञानामुळे कर्तापद आहे. अज्ञान गेले की कर्तापद गेले. मग चार्ज होत नाही. फक्त डिस्चार्जच राहतो.



# [ 32 ]
# टी.व्ही. ची सवय

## ...मग महत्व कशाचे?

**दादाश्री :** रविवारी तुमच्या घराजवळच सत्संग होतो, मग येत का नाही?

**प्रश्नकर्ता :** रविवारी टी.व्ही. पाहायचा असतो ना दादा!

**दादाश्री :** टी.व्ही.चा आणि तुमचा काय संबंध? हा चष्मा लागला तरी टी.व्ही. पाहता? अहो, आपला देशच असा आहे की टी.व्ही. पाहायची गरज नाही, नाटक पाहायची गरज नाही, इथे तर सर्व काही इथल्याइथेच, रस्त्यावरच घडत असते ना?

**प्रश्नकर्ता :** त्या रस्त्यावर पोहचू तेव्हा टी.व्ही. पाहणे बंद होईल ना?

**दादाश्री :** श्रीकृष्णाने गीतेत हेच सांगितले आहे की माणसे अनर्थ (विनाकारण) वेळ वाया घालवीत आहेत. जेवण करणे, नोकरीला जाणे हे काही अनर्थपूर्वकचे नाही. पण जोपर्यंत आत्मिक दृष्टी मिळत नाही, तोपर्यंत ही दृष्टी सुटत नाही ना?

लोक दुर्गंधी चिखल अंगावर कधी चोपडतात? त्यांना जळजळ (दु:ख) होते तेव्हा. तसेच टी.व्ही., सिनेमा या सर्वांना दुर्गंधी चिखल

म्हणतात. त्यातून काही सार निघत नाही. आम्हाला टी.व्ही.ची काही अडचण नाही. प्रत्येक गोष्ट पाहण्याची सूट असते. पण एकीकडे पाच वाजून दहा मिनिटांनी टी.व्ही. (वर प्रोग्रॉम) असेल आणि पाच वाजून दहा मिनिटांनी सत्संग असेल, तर काय आवडेल? अकरा वाजता परीक्षा असेल आणि अकरा वाजता भोजन करायचे असेल तर तुम्ही काय कराल? अशी समज असली पाहिजे ना?

## टाइमपास की जीवन व्यर्थ घालविले?

या हिंदुस्तान देशात तर आठ आणे हरवले, तर आठ तास शोधत राहतील, असे पण लोक आहेत! अर्थात प्रत्येक जण आपापल्या समजुतीनुसार वेळेचा उपयोग करत असतो. हा मनुष्य देह फार मुश्किलीने मिळाला आहे. फार कीमती आहे हा देह, पण जशी समजूत असेल तसा त्याचा उपयोग करतात. समजुतीनुसारच उपयोग करतील ना? हे जे तुम्ही करता त्याला आम्ही 'चुकीचे आहे' असे म्हणत नाही. चुकीचे तर या जगात काहीच नसते. पण त्यात वेळ फुकट जातो ना? वेस्ट ऑफ टाइम आहे. क्वचितच कधी मनुष्यत्व प्राप्त होत असते पण तेही (योग्य) समज नसल्यामुळे हिसकावून घेतले जाते. आणि चार पायांचा, सहा पायांचा, आठ पायांचा देह मिळतो. भटकत राहतो आणि सगळा वेळ धुळीस मिळतो, वाया जातो.



## [ 33 ]
# लोभाची अटकण

### परसत्ता, तिथे लोभ कशाला?

**प्रश्नकर्ता :** मला लोभाची गाठ आहे, मग काय करू?

**दादाश्री :** तुम्ही म्हणा की, 'व्यवस्थित'मध्ये जे असो ते भले असो, आणि नसो तर भले नसो.

### लोभामुळे प्राप्ती की नुकसान?

**प्रश्नकर्ता :** लोभाची गाठ कधी फुटते?

**दादाश्री :** नव्याण्णव एकत्र झाले की फुटते. करोडपती शेठ असतील तरी त्यांना लोभ होत नाही असे होते का कधी? लोभी एकांगी असतो. त्याला मानाची फारशी पडलेली नसते. जर मानी व्यक्तीचा अपमान केला तर त्याला त्रास होतो आणि लोभी तर म्हणेल, 'आपल्याला आज दोनशे तर मिळाले ना, मग भले तो मला शिव्या देऊन गेला!' मान आणि क्रोध असेल तोवर त्याला लोभी म्हणत नाही. या लोभाची तर वाईट सवय लागलेली असते. लोभ्याला सुरुवातीला पाच-दहा वर्षे धन वाढल्यासारखे वाटते, पण नंतर मात्र नुकसानच होते. आणि जो मुळातच प्रामाणिक आहे त्याला कशाचीही कमतरता नसते. परंतु जर निसर्गच उलटला तर मात्र सर्वांचेच वाईट होते. पण एवढे खरे की जो प्रामाणिक आहे त्याला जरा कमी भीती वाटते.

## आत्मज्ञानाशिवाय तृप्ती नसते

लोभाचा प्रतिशब्द आहे संतोष. पूर्वजन्मी काही केलेले असते, त्यामुळे त्याला संतोष वाटतो. या जगाचे ज्ञान जरी थोडेफार समजले असेल तरी त्याला संतोष असतो, आणि आत्मज्ञान असेल तिथे तर तृप्तीच असते. अनंत जन्मांपासून जो उपभोग घेत आला असेल त्याला संतोष असतो, त्याला काहीच नको असते. आणि ज्याने उपभोगले नसेल त्याला 'याचा उपभोग घ्यावा, त्याचा उपभोग घ्यावा' असे वाटत राहते. पूर्वजन्मात राजसी सुख उपभोगले असेल तर आता तुम्हाला राज्य दिले तरी नको वाटते, उबग येते!

**प्रश्नकर्ता :** काही लोकांना लोकसंज्ञामुळे सर्व पाहिजे असते. कोणाची गाडी पाहिली की स्वत:ला पण हवी असते.

**दादाश्री :** ही लोकसंज्ञा कधी उत्पन्न होते? स्वत: आत तृप्त नसेल तर. आतापर्यंत तरी मला सुख देणारे काही भेटले नाही. लहानपणापासूनच मला रेडिओ आणण्याची सुद्धा गरज भासली नाही. हे सर्व जिवंत रेडिओच फिरत असतात ना!

## लोभ्याला-प्रत्येक गोष्टीचा लोभ

**प्रश्नकर्ता :** लोभी थोडा कंजूस असतो ना?

**दादाश्री :** नाही, कंजूस वेगळे असतात. तो तर पैसे नसल्यामुळे कंजूस बनतो, आणि लोभीच्या घरात पंचवीस हजार रुपये असतील तरी त्याचे चित्त तूप स्वस्त कसे मिळेल यातच गुंतलेले असते. जिथे-तिथे त्याच्या चित्तात लोभच असतो. मार्केटमध्ये गेला तरी कोणाकडे स्वस्त भाजी मिळेल, हेच शोधत राहतो!

लोभी कुणाला म्हणतात तर जो लोभाच्या प्रत्येक बाबतीत जागृत असतो. स्वत:कडे वस्तूची कमतरता असेल आणि शेजाऱ्याकडून आणली त्याला लोभी म्हणत नाहीत. पण स्वत:जवळ सर्व काही आहे तरी शोधत राहतो तो लोभी.



[ 34 ]

# लगाम सोडून द्या

## मग कर्तेपणाचा अध्यास सुटेल

आपल्या इथे अक्रममध्ये सामायिक, ध्यान किंवा कुठली क्रिया नसते. ते सर्व तर बाहेर व्यवहारात असते. व्यावहारिक ध्यान किंवा सामायिक म्हणजे काय, तर स्वत:साठी एक बाहेरील सीमा ठरवून घेणे आणि त्यात बाहेरच्या कोणाला आत येऊ न देणे, जो येईल त्याला हाकलून काढणे आणि सीमारेषेच्या आत कोणाला घुसू न देणे. पण त्यांना हाकलून काढले तरी ते आत घुसतातच, आणि आपल्या इथे तर जे आत घुसतात, आत जे काही होत असेल ते पाहतच राहायचे आहे. आपले सामायिक कसे आहे, तर जे विचार येतात, वाईट असो किंवा चांगले असो त्या सर्वांना 'पाहायचे.' फक्त पाहतच राहायचे आहे. जसे आपण सिनेमात पाहतो ना की लोक मारामारी करीत आहेत, भांडण करीत आहेत. पण आपण त्यात इमोशनल होत नाही ना? जणू सिनेमात आहोत तसेच. आतील सर्व सिनेमा पाहणे, हेच सामायिक आहे. अठ्ठेचाळीस मिनिटे केले तर मोठे काम होऊन जाईल.

हा लगाम सोडून देण्याचा प्रयोग आठवड्यातून एक दिवस तरी तुम्ही करून पाहा! रविवार असेल त्यादिवशी सकाळपासूनच लगाम सोडून द्यावा आणि म्हणावे, 'दादा हा लगाम तुमच्या हाती दिला.' या पाच इंद्रियांरुपी घोडयांचा लगाम तुम्ही आमच्याकडे सोपवा आणि पाहतच राहा की कसे चालले आहे. आम्ही गाडीला खड्ड्यात पडू

देणार नाही किंवा काही होऊ देणार नाही. कारण तुम्हाला तर लगाम पकडता येत नाही. उतार आला की लगाम सोडून देता आणि चढण आली की लगाम खेचत राहता, त्यामुळे घोडे देखील धापा टाकून थकून गेले आहेत! आणि त्यांची तोंडे रक्तबंबाळ झाली आहेत! म्हणूनच श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितले की तू आत बस आणि रथ चालविण्याचे काम माझ्यावर सोपव. श्रीकृष्णाने लगाम पकडला तेव्हा कुठे अर्जुनाची गाडी सरळ चालली! आम्ही तुम्हाला आठवड्यातून एक दिवस लगाम सोडायला सांगतो. कदाचित चूक झाली तर 'दादा मी परत लगाम पकडला, त्याबद्दल माफी मागतो, आणि आता पकडणार नाही', असे म्हणून परत लगाम सोडून द्यावा. सुरुवातीला चूक होईल, प्रॅक्टिस व्हायला जरा वेळ लागेल. मग दुसऱ्या, तिसऱ्यावेळी करेक्टनेस येईल. पण त्याच्यापुढे जाण्यासाठी, त्यापुढचा प्रोग्राम पाहायचा असेल तर 'चंदुभाई काय बोलतात ते पाहत राहायचे की ते बरोबर आहे की नाही?'

## 'ज्ञानी'चा प्रयोग कसा!

आम्हा 'ज्ञानींचा' प्रयोग कसा असतो की प्रत्येक क्रिया 'आम्ही' पाहतो. म्हणूनच या वाणीला मी रेकॉर्ड म्हणतो ना? ही रेकॉर्ड बोलत राहते तिला आम्ही पाहत राहतो की कशी वाजते आणि कशी नाही! आणि जग त्यात तन्मयाकार होत असते. संपूर्ण निर्तन्मायाकार होणे याला केवलज्ञान म्हणतात.

जग पाहते तसेच हे अज्ञानीपण पाहतात पण त्यांचे पाहणे कामी लागत नाही. कारण त्यांचा बेसमेंट (आधार) अहंकार आहे. 'मी चंदुलाल आहे' हा त्याचा बेसमेंट आहे. आणि आपला बेसमेंट 'मी शुद्धात्मा आहे' हा आहे. त्यामुळे आपले 'पाहणे' केवलज्ञानाच्या अंशात जाते. जितक्या अंशापर्यंत आपण आपल्याला स्वत:ला वेगळे पाहिले, वाणीला वेगळे पाहिले, हे चंदुभाई काय करतात ते पाहिले, तितक्या अंशापर्यंत केवलज्ञान उत्पन्न झाले. आम्हाला कोणी शिव्या दिल्या ते देखील आमच्या ज्ञानातच असते. ही रेकॉर्ड काय बोलते, ते माझ्या ज्ञानातच असते. रेकॉर्ड चुकीचे बोलली असेल तर तेही आमच्या ज्ञानातच

असते. आम्हाला सतत जागृती राहत असते. आणि संपूर्ण जागृती हे केवलज्ञान आहे. व्यवहारात लोकांना व्यावहारिक जागृती राहते, ती तर अहंकारामुळे राहते. पण ही तर शुद्धात्मा झाल्यावरची जागृती आहे. ही अंश केवलज्ञानाची जागृती आहे आणि म्हणूनच कल्याणकारी आहे.

आतील मशिनरीला सैल सोडायचे नाही (दुर्लक्ष करायचे नाही). आपल्याला त्याची देखरेख करायची की कुठे कुठे घासली जात आहे, काय होत आहे, कोणाबरोबर वाणी कठोर बोलली गेली. बोललो त्याला हरकत नाही, पण आपण 'पाहत' राहावे की अरेरे! चंदुभाई कठोर बोलले.

**प्रश्नकर्ता :** पण बोलत नाही तोपर्यंत चांगलेच आहे ना?

**दादाश्री :** 'बोलणे', 'न बोलणे' हे आता आपल्या हाती राहिले नाही. तुम्ही तर मोठे जनरल मॅनेजर आहात म्हणून तुम्हाला समजावले की तुम्ही लगेच समजून घेता.

## चार्ज-डिस्चार्जचे सायन्स

डिस्चार्ज कशाला म्हणतात? एक मोटार आहे, तिला चावी दिली की ती चालते, चावी देतेवेळी त्याला चार्ज म्हणतात. मग तिला डिस्चार्ज होण्यास ठेवली, तर ती आपल्या ताब्यात राहील का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग ती आपल्या ताब्यात राहत नाही. जेवढी चावी दिली असेल तेवढीच ती चालेल. अर्धी दिली असेल तर अर्धी चालेल आणि एक चतुर्थांश दिली असेल तर तितकी चालेल आणि पूर्ण चावी दिली असेल तर पूर्ण चालेल. तिला आपण थांबवू शकत नाही. याला डिस्चार्ज म्हणतात. तसेच ही सारी वाणी डिस्चार्ज होत असते. या तीन बॅटऱ्या डिस्चार्ज होत राहतात. वाणीची, वर्तनाची आणि मनाची, तुमची इच्छा नसली तरी विचार सतत डिस्चार्ज होतच राहतात. आवडत असो वा नसो, पण विचार सतत डिस्चार्ज होतच राहतील. एका बाजूला या तीन बॅटऱ्या डिस्चार्ज होत असतात आणि नवीन तीन बॅटऱ्या चार्ज होत असतात. नवे

मन तयार होत राहते, नवी वाणी रेकॉर्ड होतच राहते. जोवर स्वत:ला स्वत:च्या स्वरूपाचे ज्ञान नाही, कुठला बेसमेंट (आधार) नाही तोपर्यंत नव्या बॅटऱ्या चार्ज होतच राहतात. आणि मग त्या डिस्चार्ज होत राहतात. अर्थात या सर्व केवळ बॅटऱ्याच आहेत. या तीन बॅटऱ्या संपत जातात आणि नवीन बॅटऱ्या तयार होत जातात. आणि 'मी चंदुलाल आहे' हा आरोपित भाव आहे तोपर्यंत अज्ञानामुळे बॅटऱ्या बनत राहतात. आणि आपल्याला आता 'मी शुद्धात्मा आहे' हे भान आहे त्यामुळे आपल्या नवीन बॅटऱ्या चार्ज होत नाहीत. जुन्या तर डिस्चार्ज होतच राहतील प्रत्येकाच्या, अज्ञानींच्या, ज्ञानींच्या, जनावरांच्या, सर्वांच्याच डिस्चार्ज होत राहतील. या डिस्चार्जमध्ये काही मेहनत करावी लागत नाही. डिस्चार्ज स्वभाव म्हणजेच आपोआप डिस्चार्ज होत राहणे. आता तुम्ही ठरवले की हात हलवायचा नाही, पण हलतोच. कारण ही सर्व मशीनरी डिस्चार्ज होत राहिली आहे. लोक या डिस्चार्जला बदलायला जातात, ते कसे होईल? कदाचित चार्ज होताना चार्जला बदलणे शक्य आहे. हा डिस्चार्ज जेव्हा आपल्या इच्छेनुसार असतो तेव्हा लोकांचा अहंकार वाढतो की सर्व काही माझ्या इच्छेनुसारच होत आहे. आणि मग जेव्हा स्वत:च्या इच्छेविरुद्ध झाले की म्हणतात 'देवाने मला असे केले, माझी कर्मे वाईट आहेत.' असे सगळे उलट-सुलट बोलत राहतात. इच्छेनुसार झाले तोही डिस्चार्ज आहे, इच्छेनुसार नसेल तर तोही डिस्चार्ज आहे. त्याचा स्वभाव तो डिस्चार्ज आहे हे सूचित करते. ते दोन प्रकारे होते- एक आवडणारे आणि दुसरे न आवडणारे. जगातील लोकांना यात राग-द्वेष उत्पन्न होतात. आवडेल त्यावर राग आणि न आवडेल त्यावर द्वेष! म्हणजे राग-द्वेष आणि 'मी चंदुलाल आहे' हे अज्ञान, एवढ्यावरच हे सारे जग चालले आहे. ज्याला जैन लोक राग-द्वेष आणि अज्ञान म्हणतात आणि वेदांती मळ, विक्षेप आणि अज्ञान म्हणतात.

## डिस्चार्ज स्वरूपांना निर्दोष पाहा

बाहेरील गोष्टी तुम्ही पाहता ही वेगळी गोष्ट आहे, पण जेव्हा तुमच्याच आतील सर्व तुम्ही पाहत राहाल त्यावेळी तुम्ही केवलज्ञान सत्तेत असाल, पण ते अंश केवलज्ञान असेल, सर्वांश नाही. आत वाईट विचार

आले त्यांना पाहायचे, चांगले विचार आले त्यांना पाहायचे, चांगल्याचा राग नाही आणि वाईटाचा द्वेष नाही. चांगले-वाईट पाहाण्याची आपल्याला गरज नाही. कारण मूळ सत्ताच आपल्या ताब्यात नाही. म्हणून ज्ञानी काय पाहतात? संपूर्ण जगाला निर्दोष पाहतात. कारण ते सर्व डिस्चार्जमध्ये होत आहे, त्यात त्या बिचाऱ्यांचा काय दोष? तुम्हाला कोणी शिव्या दिल्या तो डिस्चार्ज, बॉस तुम्हाला त्रास देत असेल तर तोही डिस्चार्जच आहे. बॉस तर निमित्त आहे. जगात कोणाचाही दोष नाही, जे दोष दिसतात ती स्वत:चीच चूक आहे आणि तेच ब्लंडर्स आहेत आणि त्यातूनच हे जग उभे राहिले आहे. दोष पाहण्याने, उलटे पाहण्याने वैर बांधले जाते.

## ड्रॅमॅटिकमध्ये कर्तापद नाही

यथार्थ दर्शन झालेले नसते आणि तेव्हा या जगातील लोक जसे पाहतात, लौकिक दर्शनाने पाहतात की 'हे माझे मेव्हणे लागतात, हे माझे मामा लागतात, हे माझे काका लागतात', अशा प्रकारे 'माझे' म्हटल्याने राग (मोह, आसक्ती) होतो. आणि 'हे' स्वरूपज्ञान मिळाल्यावर 'माझे' म्हणायचे, पण ते ड्रॅमॅटिक (नाटकीय) असते. त्यात ड्रॅमॅटिक भाव असतो. गोष्ट छोटी आणि सरळ आहे, फक्त ती समजून घेतली पाहिजे!

हे मन, वाणी आणि वर्तन की जे डिस्चार्ज होत राहिले आहे त्याला आता आपण फक्त पाहतच राहायचे आहे. डिस्चार्ज आपल्या सत्तेत नाही. तिथे जर तुम्ही ढवळाढवळ करायला जाल तर काही फायदा होणार नाही. 'तुम्हाला' तर 'चंदुभाई' काय करीत आहेत तेवढेच पाहायचे आहे. महावीर भगवंत फक्त हेच करीत असत. जे स्वत:चे पुद्गल होते, त्यात काय चालले आहे तेच पाहत असत. फक्त एक पुद्गलालाच पाहत असत. दुसरे काहीच पाहत नसत. किती समंजस होते ते! ज्यांचे नाव घेतले की आनंद होतो!!

**प्रश्नकर्ता :** पण संसारात ड्रॅमॅटिकमध्ये सुद्धा स्वत:ला काही करावे तर लागतेच ना?

**दादाश्री :** ड्रॅमॅटिकमध्ये करावे लागत नाही, सर्व काही होतच राहते. आणि काहीही करण्यासारखे नाहीच, आपोआप होतच राहते! झोपेच्यावेळी झोप येते, जाग येण्याच्यावेळी जाग येते, सर्व होतच राहते. यात 'करावे लागेल, किंवा करण्यासारखे आहे' असेही बोलू शकत नाही आणि 'करायचे नाही किंवा करण्यासारखे नाही' असेही बोलू शकत नाही, कारण कर्तेपणा आपल्यात नाहीच. आत्मा अकर्ता आहे.

## संयम, अंतिम दशेचा

**प्रश्नकर्ता :** पण व्यवहारात जी कर्मे करायची असतात ती तर समोर येतीलच ना?

**दादाश्री :** ते सर्व तर आपोआप चालतच राहील. आपण चंदुभाईंना सांगावे, 'चंदुभाई ऑफिसची वेळ झाली. का जात नाही?' बस एवढीच चेतावनी द्यावी. ते होतच राहते. डिस्चार्ज म्हणजे होतच राहते. कोणाशी उलटे बोलले गेले तर 'समोरच्याला दुःख होईल असे नाही बोललात तर बरे', असे तुम्ही चंदुभाईला सांगायला हरकत नाही. तरी पण उलटे बोलले गेले तर चंदुभाईला सांगावे 'तुम्ही अतिक्रमण का केले? मुलाला दुःख होईल असे बोललात म्हणून तुम्ही प्रतिक्रमण करा.' आणि मग मुलाच्या नावाने प्रतिक्रमण करावे. बस एवढेच समजून घ्यायचे आहे.

'काय होत आहे' हे न पाहणे याला असंयम म्हटले आहे आणि 'काय होत आहे' ते पाहत राहणे याला संयम म्हटले आहे!

हा अंतिम संयम आहे, याला ज्ञानींचा संयम म्हणतात, पण या जगातील लोक तर देहाच्या संयमाला संयम म्हणतात. त्या सर्व स्थूल गोष्टी आहेत आणि 'ह्या' तर संयमाच्या अंतिम गोष्टी आहेत. ज्याला 'हा' संयम आला, त्याचा देह तर नियमानेच हळूहळू संयमित होत जातो. म्हणूनच ह्या चरम संयमात यायला हवे.



## [ 35 ]
# कर्माची थियरी

### व्यवहारात कर्म कोणते? धर्म कोणता?

समोरासमोर समाधानपूर्वक हिशोब करणे याला धर्म म्हणतात.

समोरासमोर समाधानपूर्वक हिशोब न करणे याला कर्म म्हणतात.

भाजीत मीठ जास्त झाले, तरी ती खाऊन घेणे, तो धर्म आहे आणि 'खारट झालीय, असे का केलेस?' म्हटले की ते कर्म झाले.

### जगाने कर्ता थियरीच समजून घेतली

**प्रश्नकर्ता :** कर्माची थियरी जैनिझमध्ये नाही आणि गीतेत आहे, तर असे का?

**दादाश्री :** कर्माची थियरी जैनिझम आणि इतर धर्मांनीसुद्धा एक्सेप्ट केली आहे. जे लोक पुनर्जन्म मानतात, ते सर्व कर्माची थियरी मानतात.

कर्माची थियरी समजून घ्या. आत्म्याची कर्ता थियरी सर्व पाहतात. त्यांनी माझा अपमान केला, तर ते कर्ता आहेत अशी थियरी पाहिली. पण हे माझ्या कर्माच्या उदयामुळे होत आहे, अशी थियरी पाहिली नाही. बरेच जण बोलतात की 'माझे कर्मे मला नडत आहेत', पण ती थियरी त्यांनी पाहिलेली नाही. 'कर्म काय आहे?' हे जर समजले असते तर समोरच्यावर 'हे माझ्याशी असे का वागले!' असा आरोप केलाच नसता.

कर्मामुळे जीवांची तडफड होत आहे. शिवाय वर म्हणतात 'यांनी मला असे केले आणि तसे केले.' यामुळे कर्मे डबल होत जातात. जर मूळ हकीकत समजून घेतली की 'हे कशामुळे झाले?' घरातील माणसे त्रास देतात, तो स्वत:चाच हिशोब आहे, भोगतो त्याची चूक आहे' असे समजले तर तडफड कमी होईल.

**प्रश्नकर्ता :** संसाराचे चक्र कर्माच्या थियरीनुसार चालते ना?

**दादाश्री :** नाही, त्यात कर्माची थियरी नाही.

**प्रश्नकर्ता :** कर्म म्हणजे काय? कर्माच्या थियरीवर बसून राहिलो तरी समाधान होत नाही. भगवंताला कर्ता मानले तरी पटत नाही. म्हणजे मग काही तरी वेगळेच असले पाहिजे, जे या सर्वांना 'रेग्युलर' (नियमित) ठेवतो. तर ते काय आहे?

**दादाश्री :** ते सर्व तर 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स'च्या आधारावर चालते. सर्व जगाला हीच शक्ती चालविते. हे शब्द पटकन समजणार नाहीत. खूप सूक्ष्मतेने विचार केले तर समजेल.

## कर्माचा कर्ता कोण?

**प्रश्नकर्ता :** कर्म म्हणजे काय? त्याचे मूळ कोणते? कर्म कशामुळे बांधले जाते?

**दादाश्री :** कर्ताभावामुळे कर्म बांधले जाते. 'मी करतो' हा कर्ता भाव आहे. करते कोणी तरी दुसरेच आणि हा आरोप करतो की 'मी केले'. कॉलेजमध्ये पास होतो तो दुसऱ्या शक्तीच्या आधारे, आणि म्हणतो, 'मी पास झालो.' हा आरोपित भाव आहे, त्याने कर्मे बांधली जातात. 'मी चंदुलाल आहे' हेच कर्म आहे.

**प्रश्नकर्ता :** मग कर्म कोण करतो? कर्मबंधन आत्म्याला होते की पुद्‌गलला?

**दादाश्री :** जर तू ज्ञानी आहेस तर तुझी कर्मे नाहीत आणि अज्ञानी आहेस तर तुझी कर्मे आहेत.

असे आहे, 'आत्मा कर्माचा कर्ता आहे' असे कोणी मानत असेल तर ती चूक आहे. वास्तवात आत्मा कर्माचा कर्ता नाही. आत्मा जर कर्माचा कर्ता असेल तर तो कधी सुटूच शकणार नाही. जर आत्मा कर्माचा कर्ता असता तर मोक्षाला गेलेले सिद्ध भगवंतसुद्धा तिथे कर्मे बांधत राहिले असते. कर्म बांधणाराही कोणी नाही आणि सोडविणाराही कोणीच नाही, जो आहे तो तूच आहेस.

**प्रश्नकर्ता :** आत्मा 'शुद्धात्मा' आहे, तर मग कर्म कोणाला लेपायमान करतात?

**दादाश्री :** करणाऱ्याला.

**प्रश्नकर्ता :** जर पुद्‌गल करीत असेल तर ते तर इथेच असते ना?

**दादाश्री :** कर्म पुद्‌गलही करीत नाही आणि आत्माही करीत नाही. हा जो आत्म्याच्या उपस्थितीमुळे अहंकार उत्पन्न होतो, तो अहंकारच कर्म करतो. तो अहंकारच म्हणतो की, 'हे मी केले, मला सुख मिळाले, माझ्यावर दुःख कोसळले, मला ज्ञान झाले, मला अज्ञान झाले' हे सर्व अहंकारच करत असतो. अहंकार गेला म्हणून 'स्वतः' 'ते' रूप झाला. लोकांना समजावे म्हणून वीतरागांनी म्हटले आहे की आत्मा व्यवहाराने कर्ता आहे, निश्चयाने अकर्ता आहे. 'बाय रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट' आत्मा कर्माचा कर्ता आहे. तेसुद्धा दिसणाऱ्या कर्मांचा तो कर्ता नाही, तर भाव कर्माचा कर्ता आहे. ही दिसणारी कर्मे तर निसर्ग, 'व्यवस्थित शक्ती' करते.

'बाय रियल व्ह्यू पॉइंट' आत्मा स्वभावकर्माचा कर्ता आहे.

स्वतःमध्ये रॉंग बिलीफ (चुकीची मान्यता) उत्पन्न होते की मी 'चंदुलाल आहे!' म्हणून या रॉंग बिलीफमुळे कर्मे बांधली जातात. पुद्‌गल एकटे कर्म करू शकत नाही. आत्म्याची उपस्थिती हवी. आत्म्याच्या उपस्थितीमुळे जो अहंकार उभा होतो, तोच काम करतो. अहंकार जर फ्रॅक्चर झाला की मग सगळे संपते. हा अहंकार कर्मे बांधतो आणि निसर्ग ती सोडवितो, टाइमिंग मिळते, दुसरे एविडन्स

मिळतात, तेव्हा निसर्ग ती कर्मे सोडवितो. ती कर्मे जेव्हा सुटत असतात, तेव्हा अहंकार त्यांना भोगतो आणि पुन्हा नवीन कर्मे बांधतो.

## तो अहंकार कोण काढतो ?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आपल्याला असे म्हणायचे आहे का की, आत्मा पुद्‌गला द्वारे कर्म बांधतो आणि पुद्‌गला द्वारे कर्म सोडवितो ?

**दादाश्री :** नाही, तसे नाही. आत्मा तर त्यात हस्तक्षेप करीतच नाही. खरे तर आत्मा मुक्तच आहे, स्वतंत्र आहे. आत्म्याच्या विशेष भावामुळेच हा अहंकार उत्पन्न होतो आणि तो कर्म बांधतो, आणि तोच कर्म भोगतो. 'तुम्ही शुद्धात्मा आहात' पण बोलता की मी 'चंदुभाई' आहे. जिथे स्वतः नाहीच, तिथे आरोप करणे की 'मी आहे', त्याला अहंकार म्हणतात. परक्या स्थानाला स्वतःचे स्थान मानतो, हा अहंकार आहे. हा अहंकार सुटला तर स्वतःच्या स्थानी येता येते.

**प्रश्नकर्ता :** अहंकार स्वतःच्या प्रयत्नाने सुटतो की नैसर्गिकपणे सुटतो ?

**दादाश्री :** पूर्णपणे सुटत नाही, स्वतःच्या प्रयत्नाने काही प्रमाणात सुटू शकतो. जसे कपड्यांवरील मळ काढण्यासाठी साबणाने धुतले, तर साबणाचा मळ राहतो. साबणाचा मळ काढण्यासाठी टिनोपॉल टाकले तर टिनोपॉलचा मळ राहतो. पण अंतिम मळ आपोआप सुटू शकत नाही. अंतिम मळ काढण्यासाठी 'ज्ञानी पुरुष' लागतील. तोपर्यंत नैसर्गिक रूपाने आदळत-आपटत अहंकार तुटत जातो.

## अज्ञान तिथे अविरत कर्मबंधन

**प्रश्नकर्ता :** आम्ही तर आता क्षणोक्षणी कर्म बांधत असतो ना ?

**दादाश्री :** फक्त क्षणोक्षणीच नाही तर रात्री झोपेतसुद्धा कर्म बांधत असता. दिवसा तर मानता की मी कर्म बांधतो, पण रात्रीदेखील बांधत असता. कारण झोपेतही 'मी चंदुभाई आहे', हे विसरले जात नाही.

## जिथे ज्ञान, तिथे कर्मबंधन नाहीच

**प्रश्नकर्ता :** कर्मबंधन होऊ नये यासाठी कुठला मार्ग आहे?

**दादाश्री :** स्वभाव-भावात येणे हा. 'ज्ञानी पुरुष' स्वतःच्या स्वरूपाचे भान करवून देतात, त्यानंतर कर्मबंधन होत नाही. मग नवीन कर्मे चार्ज होत नाहीत, जुनी डिस्चार्ज होत राहतात.

**प्रश्नकर्ता :** खाणे-पिणे हा जो शरीराचा धर्म आहे, त्यात जी कर्मे बांधली जातात, ती कशी सुटतील?

**दादाश्री :** स्वरूप ज्ञानानंतर कर्मे बांधली जातच नाहीत. मग खा-प्या, फिरा, चश्मा लावा तरी पण कर्मे बांधली जात नाहीत.

**प्रश्नकर्ता :** खाण्या-पिण्यात जीवांची हिंसा होतेच ना?

**दादाश्री :** जोवर स्वतः हिंसक आहे, तोवर प्रत्येक क्रियेत हिंसा होतच असते. 'मी चंदुलाल आहे' हा आरोपित भाव आहे, तोच हिंसक भाव आहे. आणि जेव्हा स्वतः आत्मा झाला, तेव्हा मग अहिंसक झाला, त्यानंतर त्याला हिंसेचा दोष लागत नाही. हे तर स्वरूपाचे भान नाही, म्हणून निव्वळ हिंसाच आहे. फक्त दृष्टीच बदलायची आहे.

## प्रायश्चित्तामुळे हलके कर्मबंधन

**प्रश्नकर्ता :** आपण हृदयापासून अहिंसक असलो तर शारीरिक धर्म व कर्तव्ये पार पाडताना कर्मे बांधली जात नाहीत, असे आपले म्हणणे आहे का?

**दादाश्री :** नाही. ती तर बांधली जातातच. जोवर तुमच्यात आरोपित भाव आहे की 'मी चंदुलाल आहे' आणि तुमच्या मनात भाव आहे की 'मला हिंसा करायची नाही.' तरी हिंसा झाली तर त्याचे फळ तर नक्कीच मिळेल, पण कसे मिळेल? तुम्हाला लहानसा दगड लागून ते कर्म संपते. आणि दुसऱ्या कुणाचा असा भाव आहे की 'हिंसा केली पाहिजे' तर त्याला भला मोठा दगड लागेल. हिंसा दोघांकडून सारखीच होते, पण भावात फरक असल्यामुळे कर्मफळात फरक पडतो.

**प्रश्नकर्ता :** आम्ही शरीर धर्माचे आचरण करतो तर त्याचे प्रायश्चित्त करावे लागते?

**दादाश्री :** हो. आणि जोपर्यंत 'मी आत्मा आहे' असे भान होत नाही, तोपर्यत प्रायश्चित्त केले नाही तर कर्मे अधिकच चिकटतात. प्रायश्चित्त केल्यामुळे कर्मांच्या गाठी हलक्या होऊन जातात. नाहीतर त्या पापाचे फळ फार वाईट येते. मनुष्यत्व पण निघून जाते, आणि जरी मनुष्य जन्म मिळाला तरी त्याला सर्व प्रकारच्या अडचणी येतात. खाण्या-पिण्याच्या अडचणी, आणि मान-मरातब तर कधी दिसतही नाही, सतत अपमान. म्हणून हे प्रायश्चित्त किंवा इतर सर्व क्रिया कराव्या लागतात. याला परोक्ष भक्ती म्हणतात. जोवर आत्मज्ञान होत नाही, तोवर परोक्ष भक्ती करण्याची आवश्यकता आहे.

## कर्मबंधन मनुष्यगतीतच

**प्रश्नकर्ता :** जर रोजच्या क्रियांचे प्रायश्चित्त केले नाही तर मोठ्या अवधीत त्याचा ढीग होईल ना?

**दादाश्री :** नाही, ढीग होत नाही. कर्मे बांधली गेली की मग संपूनही जातात. उदाहरणार्थ पाशवतेची कर्मे बांधली गेली असतील तर तो पशुयोनीत जातो आणि तिथे ती कर्मे संपवून टाकते. कर्माचा ढीग होत नाही. एका जन्माची कमाई जनावर गतीतील पाच-सात जन्म घेऊन संपवतो.

**प्रश्नकर्ता :** जनावर गतीत पुन्हा कर्मे बांधली जातात ना?

**दादाश्री :** नाही. तेथे कर्मे बांधली जात नाहीत. फक्त मनुष्यच कर्म बांधू शकतो. देवी-देवता देखील कर्म बांधत नाहीत. दुसऱ्या सर्व गती तर केवळ (कर्म) सुटण्यासाठीच असतात.

**प्रश्नकर्ता :** हे तिर्यंच (जनावर) गतीतील जीव आहेत, ते हिंसक आहेत, त्यांच्यात कषाय आहेत, तरीही ते कर्म बांधत नाहीत?

**दादाश्री :** नाही, कुठलेही जनावर कर्म बांधत नाही, माणूस सोडून.

**प्रश्नकर्ता :** मनुष्य योनीत जी कर्मे बांधली ती तिर्यंच गतीत भोगावी लागतात?

**दादाश्री :** हो, इथे बिनहक्काचे कोणाचे काही घेतले असेल बिनहक्काचे भोग घेतले असतील, तर ती सर्व पाशवी कर्मे म्हटली जातात. ती कर्मे पशुयोनीत जाऊन भोगावी लागतात.

**प्रश्नकर्ता :** भोगल्यानंतर परत मनुष्ययोनीत येतो का?

**दादाश्री :** हो, मनुष्ययोनीतच येतो. देवगतीत गेला तरी भोगून परत मनुष्ययोनीत येतो. फक्त मनुष्यगतीतूनच सर्व ठिकाणी जाण्याचा अधिकार आहे. मनुष्यगतीत चार्ज आणि डिस्चार्ज दोन्ही होतात, तर दुसऱ्या गतीत फक्त डिस्चार्ज होतात. ही मनुष्य गतीच टेस्ट एक्झॅमिनेशन (चाचणी परीक्षा) आहे. जर फेल झालात कर तिर्यंचगतीत जाल, नरकगतीत जाल आणि पास झालात तर मनुष्यगतीत राहाल आणि खूप चांगले मार्क्स मिळाले तर देवगतीत जाल. आणि पाचवी गती, मोक्ष देखील मनुष्य देहातूनच होते.

**प्रश्नकर्ता :** तिर्यंचगतीतून तिर्यंचगतीत किंवा दुसऱ्या गतीत जाताना मध्ये मनुष्यगतीच्या स्टेशनवर थांबावे लागते?

**दादाश्री :** नाही, तिर्यंचमधून तिर्यंच असे आठ जन्मांपेक्षा जास्त होत नाही. मग परत मनुष्य जन्माचे स्टेशन येते.

**प्रश्नकर्ता :** माणसांमध्ये जी समज आहे ती तिर्यंच (जनावर)मध्ये पण आहे, तरी देखील ते कर्म का बांधत नाहीत?

**दादाश्री :** तिर्यंचांची समज लिमिटेड आहे आणि मनुष्याची समज अनलिमिटेड आहे. तिर्यंचांचे मनही मर्यादित असते, म्हणून ते कर्म बांधू शकत नाहीत.

## कर्म, किती तरी जन्मांची शिल्लक

**प्रश्नकर्ता :** आता जी कर्मे आहेत ती अनंत जन्मांची आहेत का?

**दादाश्री :** प्रत्येक जन्म अनंत जन्मांचे सार रूप असतो. सर्व जन्मांची (कर्मे) एकत्र नसतात. कारण नियम असा आहे की परिपाक काळ (पिकण्याची वेळ) झाल्यावर फळ पिकलेच पाहिजे. नाही तर कितीतरी कर्मे राहून जातील!!

## हिशोब कसा चुकता करायचा?

**प्रश्नकर्ता :** मागील जन्मात कोणाशी वैर बांधले असेल तर ते कुठल्यातरी जन्मात त्याला भेटून चुकते करावे लागते ना?

**दादाश्री :** नाही, तसे नाही. अशी परत फेड होत नाही. वैर बांधले गेले की आत राग-द्वेष होतात. मागील जन्मात मुलाशी वैर बांधले असेल तर आपल्याला प्रश्न पडेल की ते वैर कुठल्या जन्मी संपेल? आम्ही असे परत कधी भेटू? तर तसे नाही, या जन्मात मुलगा मांजर बनून येईल. त्याच्यासाठी तुम्ही दूध पुढे ठेवले तर ते तुमच्याच तोंडावर नखे मारून निघून जाईल! असे आहे हे सर्व! अशा तऱ्हेने तुमचे वैर चुकते केले जाते. परिपाक काळाचे नियम आहेत, म्हणून थोड्या काळातच हिशोब पूर्ण होतो.

हे जे आम्ही तुम्हाला विचारतो की अनंत जन्मांपासून तुम्ही मोक्षासाठी काही केले आहे का? याचा अर्थ असा की या जन्मात तुमच्या अनंत जन्मांचे सार काय आहे? आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत राहतात हेच ना?

ही जी भोगावी लागतात तीच कर्मफळे आहेत. दुसरे काही नाही. कर्म दिसू शकत नाही. कर्मफळ दिसू शकते. कोणी थप्पड मारली, किंवा डोके दुखले, पोट दुखले, लकवा झाला, त्यालाच लोक कर्म म्हणतात, पण असे नाही. काही लोक मानतात की देहाशी संग केल्यामुळे (देहधारण केल्यामुळे) ही तडफड होते. पण वास्तवात तसे नाही. देह काही कुसंगी नाही. त्याची समज जर अशी सरळ वळली तर मोक्षाला जाण्यासाठी मदत करील. चुकीची समज असल्यामुळेच हे सर्व आहे.

'मी चंदुभाई आहे' असे मानून जे जे केले जाते, त्याने संसार उभा राहिला आहे.

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा मनुष्य पडतो, भाजतो, तर तेव्हा समोर कोणी निमित्त तर नसते, मग त्यामागे कुठले कर्म असेल?

**दादाश्री :** समोरच्याचे नुकसान करण्याचा भाव पूर्वजन्मात केला, तितकेच आपले नुकसान होते, आणि तसा भाव केला नसेल तर त्याचे कोणी नुकसान करत नाही.

सगळी माणसे लुटली जात असतील पण तिथे जर कोणी पवित्र मनुष्य असेल तर त्याला कोणी लुटू शकणार नाही. लुटणारेही लुटू शकत नाहीत. इतके सेफसाइडवाले आहे हे जग!

## आश्रव, निर्जरा : संवर, बंध

**प्रश्नकर्ता :** कर्म संपविणे, याचा अर्थ काय समजावा?

**दादाश्री :** कर्माचे मूळ काय आहे? तर राग-द्वेष. जैनीझमने म्हटले आहे की 'मोक्षाला जायचे असेल तर राग-द्वेष आणि अज्ञान गेले तर मोक्ष प्राप्त होईल. आणि वेदांताने सांगितले आहे की 'मळ, विक्षेप आणि अज्ञान' गेले तर मोक्ष प्राप्त होईल. अज्ञानाच्या बाबतीत दोघांचे एकमत आहे. राग-द्वेषाचा आधार अज्ञान आहे. अज्ञान गेले तर सर्व कर्मे संपत जातील. अज्ञान कशामुळे जाते? ज्ञानामुळे. निज स्वरूपाच्या अज्ञानामुळेच मोक्ष थांबला आहे.

कर्म करणारा कोण असेल? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** आत्मा.

**दादाश्री :** आत्मा काय क्रियावादी असेल? हे खूप समजून घेण्यासारखे आहे. एक देखील कर्म कोणी संपवू शकत नाही. *संवर* (नवीन कर्मे बांधणे बंद होणे) झाले की कर्म संपतात. इथे तर *आश्रव* (कर्म येणे) चालू आहे मग कर्मे कशी संपतील? कर्मे संपविणे आणि *आश्रव* होत राहणे ह्या दोन गोष्टी विरोधाभासी आहेत. कर्मे संपवायची असतील तर *संवर* असले पाहिजे. पण आधी जीवाजीवामधील फरक जाणल्याशिवाय काहीही निष्पन्न होणार नाही. अशुभकर्मे भोगेल आणि शुभकर्मे बांधेल, एवढे होऊ शकते. पण कर्मबंधने होण्याची थांबत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** *आश्रव* कसा होतो?

**दादाश्री :** मनात वाईट विचार येणे, याला उदयभाव म्हणतात. त्या विचारात आत्मा तन्मयाकार झाला तर त्याला *आश्रव* झाला असे म्हणतात. जर त्या अतिक्रमणाचे लगेच प्रतिक्रमण झाले तर ते पुसले जाते आणि प्रतिक्रमण झाले नाही तर कर्मबंधन होते.

एखादा जन्म वाया गेला तर काही हरकत नाही, पण इथे तर दुसऱ्या शंभर जन्मांचे बंधन बांधून घेतले जाते, त्याला हरकत आहे.

**प्रश्नकर्ता :** *संवर* म्हणजे काय?

**दादाश्री :** *संवर* म्हणजे कर्म चार्ज होणे थांबणे. 'मी चंदुलाल आहे' असे भान आहे तोवर *आश्रव* आणि *बंध* (कर्मबंधन) दोन्ही होत राहतात आणि 'मी शद्धात्मा आहे' असे ध्यान राहिले की *संवर* होतो. तुम्हाला 'मी शुद्धात्मा आहे' याचे ध्यान कितीवेळा राहते?

**प्रश्नकर्ता :** आपण ज्ञान दिल्यापासून निरंतर राहते.

**दादाश्री :** त्यामुळे आता तुम्हाला *बंध* पडणार नाहीत. *संवर* राहील आणि आधीच्या *आश्रवाची* निर्जरा होत राहील. आता नवे कर्मबंध होणार नाहीत. कर्म *निर्जरा* तर जीवमात्राला होतच राहते. स्वरूपाचे ज्ञान नसले तरी *निर्जरा* होते आणि त्याबरोबरच बंधही पडत राहतो. आणि स्वरूप ज्ञानानंतर फक्त *निर्जराच* होत राहते. दुसऱ्या शब्दात सांगितले तर चार्ज होणे बंद होते, म्हणून मग फक्त डिस्चार्जच शिल्लक राहतो. ज्या भावांनी कर्मबंधन पडले होते, त्याच भावांनी *निर्जरा* होते. फक्त एवढेच की तुम्हाला *निर्जरा* होतेवेळी संवर राहतो, *अबंध* (बंधनरहित) परिणाम राहतात आणि दुसऱ्यांना बंध पडतो.

शुद्ध उपयोगीचे एकही कर्म बांधले जात नाही.

**प्रश्नकर्ता :** एकाच वेळी बंध छेदू शकतो?

**दादाश्री :** हो होऊ शकतो. शुद्ध उपयोगामुळे होऊ शकतो. या अक्रम विज्ञानामुळे निरंतर शुद्ध उपयोग राहणे शक्य आहे.

**प्रश्नकर्ता :** वास्तविक तपश्चर्या कोणती? कर्माची *निर्जरा* महावीर भगवंतांनी सांगितली आहे, ती काय आहे?

**दादाश्री :** जोवर *संवर* होत नाही, तोवर *सकाम* (मोक्षाच्या हेतूने) *निर्जरा* होत नाही. *संवर* असले तर *सकाम निर्जरा* होतच राहते. गाई-म्हशीं या सर्वांना *अकाम निर्जरा* होतच राहते. *संवर* उत्पन्न झाला तरच *सकाम निर्जरा* होते.

**प्रश्नकर्ता :** *बंध* आणि अनुबंध काय आहेत ते समजवावे.

**दादाश्री :** अनुबंधामुळे आपली कर्मे उदयास येतात. कविराज आणि तुमची भेट झाली, ती अनुबंधामुळे झाली. आणि त्याक्षणी परत (नवीन) *बंध* पडतो. म्हणून धोका कुठे आहे, ते समजून घेतले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** *बंध* आणि अनुबंध कशामुळे होतात?

**दादाश्री :** 'मी चंदुलाल आहे, याचा कर्ता आहे', त्यामुळे.

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे *बंध* पडतो की अनुबंध?

**दादाश्री :** अनुबंध पडतो.

**प्रश्नकर्ता :** मग बंध कसा पडतो?

**दादाश्री :** अनुबंध पडला की तीच जुनी परंपरा चालत राहते. कर्तापद राहिले तर परत बंध पडतो. आणि त्यात जर बदल झाला आणि 'मी शुद्धात्मा आहे' आणि कर्ता 'व्यवस्थित' आहे, हे समजले की मग *बंध* पडत नाही. अनुबंध आहे तरी देखील *बंध* पडत नाही.

## शुभाशुभाचे थर्मामीटर

**प्रश्नकर्ता :** शुभकर्म आणि अशुभकर्म ओळखण्याचे थर्मामीटर कोणते?

**दादाश्री :** शुभ कर्मे उदयास आली की आपल्याला गोडी वाटते. शांती वाटते, वातावरण शांत वाटते, आणि अशुभ कर्मे उदयास आली की कटुता निर्माण होते, मनाला चैन पडत नाही. अशुभ कर्मे त्रास देतात आणि शुभ कर्मे आनंद देतात.

**प्रश्नकर्ता :** बऱ्याच वेळा असे होते की आम्ही अशुभ कर्मे बांधत असतो आणि त्याचवेळी बाहेर शुभ कर्मांचा उदय असतो!

**दादाश्री :** हो, असे होऊ शकते. समजा आता तुमच्या शुभ कर्मांचा उदय असेल पण आत अशुभ कर्मे बांधली जात असतील!

## स्थूलकर्म-सूक्ष्मकर्म

**प्रश्नकर्ता :** हे कर्म नवे आहे की जुने, हे कसे समजेल?

**दादाश्री :** कर्म केले किंवा नाही केले, ते तर कोणीही पाहू शकत नाही. ते तर भगवंत, की ज्यांना केवलज्ञान झाले आहे, तेच जाणू शकतात. या जगात तुम्हाला जी कर्मे दिसतात, त्यातील कणभरही कर्म नवीन नाही. या कर्मांचे ज्ञाता-द्रष्टा राहाल तर नवीन कर्मे बांधली जाणार नाहीत आणि तन्मयाकार झालात तर नवीन कर्मे बांधली जातील. आत्मज्ञानी झाल्यानंतर मात्र कर्मे बांधली जात नाहीत.

या कलियुगात जे उपचार केले जातात ते उपचार, ती औषधे चुकीची आहेत. एक मनुष्य दान देत राहतो, धर्माची भक्ती करत राहतो, मंदिरात पैसे देतो, दिवसभर असे काही तरी करतच राहतो. त्याला जगातील लोक काय म्हणतात की, 'हा धर्मनिष्ठ आहे'. पण त्या माणसाच्या मनात काय विचार चालत असतात की, 'कसे गोळा करू आणि कसे उपभोगू!' मनात तर त्याला बिनहक्काचे हिसकावून घेण्याचीच इच्छा असते. या कलियुगात लोकांना बिनहक्काचे हिसकावून घेण्याची फार इच्छा असते. बिनहक्काचे भोगण्यासाठीच लोक तयार असतात! आता बाहेर तर मोठीमोठी दाने देत राहतो, धर्माचेच आचरण करत असतो, पण आत बिनहक्काची लक्ष्मी आणि विषय भोगण्याचे विचार करत असतो, म्हणून भगवंत त्याचा एक पैसाही जमा करत नाही. त्याचे कारण काय? कारण हेच की ही सर्व स्थूल कर्मे आहेत. आणि या स्थूल कर्मांचे फळ इथल्या इथेच मिळून जाते. लोक ह्या स्थूल कर्मांनाच पुढील जन्माचे कर्म मानतात. पण त्याचे फळ तर इथल्या इथेच मिळून जाते. आणि सूक्ष्म कर्म की जे आत बांधले जात असते, ज्याचा लोकांना पत्ताही नसतो, त्याचे फळ पुढील जन्मात मिळते.

आज कोणी चोरी केली तर ते स्थूल कर्म आहे. त्याला त्याचे फळ याच जन्मात मिळून जाते. उदा. त्याला अपयश मिळते, पोलीस मारतात, ही सर्व फळे त्याला इथल्या इथेच मिळतीलच. दानशूर दान देतात, तर लोक त्यांची स्तुती करतात की 'वाह! काय दानशूर शेठ आहेत!' आणि शेठ तर मनात बिनहक्काचे उपभोगण्याचे विचार करीत असतो. म्हणजे आत सूक्ष्म कर्मे करतात ती. हे जे स्थूल कर्म दिसते, स्थूल आचरण दिसतो, ते 'तिथे' कमी येत नाही. 'तिथे' तर सूक्ष्म विचार काय आहे? सूक्ष्मकर्म काय आहे? इतकेच 'तिथे' कामी येते. सारे जग तर स्थूल कर्मावरच ॲडजस्ट झाले आहे. हे सगळे साधू, संन्यासी त्याग करतात, तप करतात, जप करतात, पण ते सर्व तर स्थूलकर्म आहे. त्यात सूक्ष्म कर्म कुठे आहे? पुढील जन्माकरिता सूक्ष्मकर्म त्यात नाही. हे जे करतात, त्या स्थूल कर्मांचे यश त्यांना इथेच मिळते. आचार्य महाराज प्रतिक्रमण करतात, सामायिक करतात, व्याख्यान देतात, प्रवचन करतात, पण तो तर त्यांचा आचार आहे, ते स्थूल कर्म आहे. पण आत काय चालले आहे ते पाहायचे असते. आत जे चार्ज होते ते 'तिथे' कामी लागेल. आता ज्या आचाराचे पालन करतात, तो डिस्चार्ज आहे. बाह्याचार पूर्णपणे डिस्चार्ज स्वरूपच आहे. तिथे हे लोक सांगतात की 'मी सामायिक केले, ध्यान केले, दान दिले.' त्याचे यश तर तुम्हाला इथेच मिळेल. त्यात पुढच्या जन्माचे काय देणेघेणे? भगवंत काही असे कच्चे नाहीत की तुझे असे घोटाळे खपवून घेतील. बाहेर सामायिक करत असेल आणि आत माहीत नाही काय करत असेल? एक शेठ सामायिक करण्यासाठी बसले होते, तेव्हा बाहेर कुणीतरी दरवाजा ठोठावला, शेठानीने जाऊन दरवाजा उघडला, तर एक भाऊ आले होते, त्यांनी विचारले, 'शेठ कुठे गेलेत?' तेव्हा शेठानीने उत्तर दिले 'उकिरड्यावर!' शेठजींनी आत बसल्याबसल्या हे ऐकले आणि आत तपासून पाहिले तर खरोखर ते उकिरड्यावरच गेले होते. अर्थात आत तर सर्व वाईट विचारच चालू होते आणि बाहेर सामायिक करत होते. भगवंत असा घोटाळा चालवून घेत नाहीत. आत सामायिक असेल आणि बाहेर सामायिक नसेल तरी त्याचे 'तिथे' चालेल. हे बाहेरचे देखावे मात्र 'तिथे' चालणार नाहीत.

स्थूलकर्म म्हणजे काय ते मी तुला समजावतो तुला एकदम राग आला. तुला रागवायचे नव्हते तरी राग आला, असे घडते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो घडते.

**दादाश्री :** तर जो राग आला, त्याचे फळ इथल्या इथे लगेच मिळते. लोक म्हणतील, 'जाऊ द्या ना ह्याला, हा आहेच फार रागीट.' अरे, एखादा त्याला थप्पडदेखील मारतील. म्हणजे अपयश होते किंवा आणखी कुठल्या तरी प्रकारे त्याला इथले फळ मिळून जाते. राग येणे हे स्थूल कर्म आहे. आणि राग आल्यावर तुझा आजचा आतला भाव काय आहे की 'रागवायला तर हवेच', तर तो पुढील जन्माचा पुन्हा रागावण्याचा हिशोब आहे. तुझा आजचा भाव आहे की रागवायला नको, तुझ्या मनात पक्के आहे की रागवायला नकोच, तरी पण रागावले गेले तर तुला पुढच्या जन्मासाठी बंधन होत नाही. या स्थूल कर्मात तुला राग आला तर त्यामुळे या जन्मात तुला मार खावा लागेल, तरी देखील तुला पुढील जन्मासाठी बंधन होणार नाही. कारण सूक्ष्म कर्मात तुझा निश्चय आहे की रागवायला नकोच. आणि दुसरी एखादी व्यक्ती कोणावरही रागवत नाही. पण त्याच्या मनात तर वाटत असते की 'रागावल्यावरच हे लोक सरळ होतील, असे आहेत.' तर मग तो पुढील जन्मी रागीट होतो! म्हणजे बाहेर जो राग येतो, ते स्थूल कर्म आहे आणि त्यावेळी आत जो भाव होतो ते सूक्ष्मकर्म आहे. स्थूलकर्माचे बंधन मुळीच पडत नाही, जर हे नीट समजले तर! म्हणून हे सायन्स मी नवीन प्रकारे दिले आहे. आतापर्यंत जगाला हेच ठसवून सांगितले गेले आहे की स्थूलकर्मांमुळे बंधन होते आणि म्हणून तर लोक सतत घाबरत राहतात.

आता घरात पत्नी आहे, लग्न केलेले आहे आणि मोक्षाला जायचे आहे, तर मनात येत राहते की 'मी तर लग्न केले आहे, तर आता मोक्ष कसा मिळवू शकतो?' अहो, पत्नी बाधक नाही, तुमचे सूक्ष्मकर्म बाधक आहे. ही तुमची स्थूलकर्मे अजिबात बाधक नाहीत. हे मी उघड केले आहे, हे सायन्स जर उघड केले नाही तर आत भीती-भीती आणि भीतीच वाटत राहील. आत *अजंपा, अजंपा, अजंपा* राहील! ते साधू म्हणतात

की आम्ही मोक्ष मिळवू. अहो, तुम्ही कसा मोक्ष मिळवाल? काय सोडायचे आहे हे तर तुम्हाला माहीतच नाही. तुम्ही तर स्थूलला सोडले आहे, डोळ्यांनी दिसते, कानांनी ऐकता येते, ते सोडले आहे. त्याचे फळ तर तुम्हाला याच जन्मात मिळेल, हे सायन्स नवीनच प्रकारचे आहे! हे तर अक्रम विज्ञान आहे, ज्यामुळे लोकांना सर्व प्रकारची सुविधा होते. पत्नीला सोडून पळून जाता येते का? आणि पत्नीला सोडून पळून गेले तर मोक्ष मिळेल, असे शक्य आहे का? कोणाला दु:ख देऊन स्वत:ला मोक्ष मिळणे संभव आहे का? म्हणून पत्नी-मुलांबद्दलची सर्व कर्तव्ये पार पाडा. आणि पत्नी जे जेवण वाढेल ते निवांतपणे जेवा, पण ते सर्व स्थूल आहे हे समजून घ्या! स्थूलच्या मागे तुमचा असा अभिप्राय असायला नको की ज्यामुळे सूक्ष्मात चार्ज होईल. म्हणून तर मी तुम्हाला पाच वाक्ये दिली आहेत. आत असा अभिप्राय राहता कामा नये की 'हे बरोबर आहे, मी जे करतो, जे उपभोगतो, ते बरोबर आहे.' असा अभिप्राय नसावा. बस, एवढा तुमचा अभिप्राय बदलला की समजा सर्व काही झाले.

मुलामध्ये वाईट गुण असले तर आई-वडील त्याला रागावतात आणि सगळ्यांना सांगत फिरतात की 'माझा मुलगा तर असा आहे, नालायक आहे, चोर आहे.' अरे, तो जे करतो त्याला सोड आणि आता त्याचे भाव बदल ना! त्याचे आतले अभिप्राय बदल ना!! त्याचे भाव कसे बदलायचे, ते आई-वडीलांना येतच नाही. कारण सर्टिफाइड आई-वडील नाहीत. सर्टिफीकेट नाही आणि आई-वडील होऊन बसलेत! मुलाला जर चोरीची सवय लागली असेल तर आई-वडील त्याला सतत खडसावत राहतात, मारतात की 'तुला अक्कल नाही, तू असे करतोस, तसे करतोस.' असे छळतात. आई-वडील असे एक्सेस (गरजेपेक्षा जास्त) बोलतात. कधीही एक्सेस बोललेले हेल्प करत नाही. म्हणून मग मुलगा काय करतो? मनात ठाम ठरवतो की 'बोलू देत त्यांना, मी तर असेच करणार.' असे केल्याने तर उलट आई-वडील मुलाला आणखीनच चोर बनवितात. द्वापार, त्रेता आणि सत्युगात जी हत्यारे होती त्याचा आज कलियुगात लोक उपयोग करू लागले आहेत. मुलाला बदलण्याची पद्धत वेगळी आहे. त्याचे भाव बदलायला हवेत. त्याच्यावर प्रेमाने हात फिरवून म्हणावे, 'इथे बस बेटा,

ओरडू दे ना तुझ्या आईला, ती ओरडते पण तू जशी चोरी करतोस तसेच कोणी तुझ्या खिशातील पैशांची चोरी केली तर तुला आवडेल का? त्यावेळी तुला किती दु:ख होईल? मग तसेच दु:ख समोरच्यालाही होणार, नाही का? अशा प्रकारे पूर्ण थियरी मुलाला समजवावी लागेल. एकदा त्याच्या मनात ठसले पाहिजे की हे चुकीचे आहे. तुम्ही त्याला मारत राहता, त्यामुळे तर मुले हट्टाला पेटतात. तेव्हा फक्त पद्धतच बदलायची आहे.

इथे तर बाप पोलिसासारखा असतो, घरात बायको हसू शकत नाही, मुले हसू शकत नाहीत. तोंड उघडू शकत नाहीत. एवढा तर त्याचा धाक असतो. असा धाक असावा का? आपण काय वाघ-सिंह आहोत? आपला धाक असता कामा नये. एका डोळ्यात धाक असला पाहिजे आणि दुसऱ्या डोळ्यात प्रेम. धाक एवढ्यासाठी की मुले वाईट मार्गाला, उलट दिशेने जाऊ नयेत. गाडीत देखील साखळी ओढण्याचे साधन ठेवलेले असते ना, काही खाली पडले तर गाडी थांबवायला? पण सिगारेटचे पाकीट पडले आणि त्यासाठी जर आपण साखळी ओढली तर तो गुन्हाच म्हणायचा ना? गुन्हा नाही का?

सर्व जगाला स्थूल कर्मच समजले आहे. सूक्ष्म कर्म समजलेलेच नाही. सूक्ष्म समजले असते तर ही दैना झाली नसती!

एका शेठने पन्नास हजारचे दान केले, तेव्हा त्यांच्या मित्राने विचारले, 'एवढे सारे पैसे दिले?' तेव्हा शेठ म्हणाले 'मी तर एक पैसाही दिला नसता. पण इथल्या मेयरच्या दबावामुळे मला द्यावे लागले.' आता याचे फळ 'तिथे' काय मिळेल? पन्नास हजाराचे दान दिले, हे स्थूलकर्म, त्याचे फळ इथल्या इथेच शेठला मिळून जाते. लोक 'वाहवा' करतात. त्याचे गुणगान करतात आणि शेठने आत सूक्ष्मकर्मात काय चार्ज केले? तर 'एक पैसाही दिला नसता.' त्याचे फळ त्याला पुढच्या जन्मात मिळेल. पुढच्या जन्मी शेठ एक पैसाही दान करू शकणार नाही. आता इतकी सूक्ष्म गोष्ट कोणाला समजेल?

**प्रश्नकर्ता:** दादाजी, सूक्ष्मकर्म आणि स्थूलकर्माचे कर्ता वेगवेगळे आहेत का?

**दादाश्री :** हो, दोन्हींचे कर्ते वेगळे आहेत. ही जी स्थूलकर्मे आहेत ती डिस्चार्ज कर्मे आहेत. या बॅटऱ्या असतात ना, त्या चार्ज केल्यावर डिस्चार्ज होत राहतात ना? आपल्याला डिस्चार्ज करायच्या नसल्या तरी डिस्चार्ज होतच राहतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तसेच ही स्थूलकर्मे डिस्चार्ज कर्मे आहेत. आणि आत जी दुसरी नवीन चार्ज होत असतात ती सूक्ष्म कर्मे आहेत. या जन्मात जी चार्ज होत राहिली आहेत ती पुढल्या जन्मी डिस्चार्ज होत राहतील. आणि या जन्मात मागील जन्माच्या बॅटऱ्या डिस्चार्ज होत आहेत. एक मनाची बॅटरी, एक वाणीची बॅटरी आणि एक देहाची बॅटरी - या तिन्ही बॅटऱ्या आता डिस्चार्ज होत आहेत आणि आत तीन नव्या बॅटऱ्या चार्ज होत आहेत.

हे मी बोलतो, तर तुम्हाला असे वाटते की 'मी'च बोलतो आहे. पण नाही ही तर रेकॉर्ड बोलत आहे! ही तर वाणीची बॅटरी डिस्चार्ज होत आहे. मी बोलतच नाही, आणि या जगातील सर्व लोक तर काय म्हणतात की 'मी कसा बोललो, मी किती चांगले बोललो!' ते सर्व कल्पित भाव आहेत. ते फक्त इगोइजमच करत असतात. इगोइजम गेला तर मग दुसरे काय राहिले? हा इगोइजमच अज्ञान आहे आणि हीच भगवंताची माया आहे. कारण करत असतो कोणी दुसराच, आणि स्वत:ला असे वाटते की 'मीच करत आहे.'

ही सूक्ष्मकर्मे जी आत चार्ज होतात, ती मग कंप्युटरमध्ये जातात. एक व्यष्टि कंप्युटर आहे आणि दुसरा समष्टि कंप्युटर आहे. सूक्ष्मकर्मे आधी व्यष्टिमध्ये जातात आणि तिथून मग समष्टि कंप्युटरमध्ये जातात. मग समष्टि काम करत राहते. दुसरी सर्व सूक्ष्मकर्मे सुद्धा चार्ज होत असतात, पण त्याची फार चिंता नाही, पण 'मी चंदुभाई आहे' असे रियली स्पिकिंग बोलण्याने कर्मे बांधली जातात. 'मी कोण आहे' एवढेच जरी समजून घेतले तर तेव्हापासूनच सर्व कर्मांपासून सुटका होते.

म्हणून 'हे' सरळ आणि सोपे विज्ञान दिले आहे, नाहीतर करोडो

उपायांनीसुद्धा एबसोल्यूट होता येईल असे नाही. आणि 'हे' तर बिलकुल 'थियरम ऑफ एबसोल्यूटिसम' आहे.

## वाईट कर्मांपासून सुटका

**प्रश्नकर्ता :** आम्ही वाईट कर्मे करतो पण त्यातून सुटण्याची हिम्मत होत नाही.

**दादाश्री :** हिम्मत होत नाही. सध्या वाईट कामांचा बोजाच एवढा वाढला आहे, की हिम्मत कशी होईल? म्हणून एकदा दिवाळेच काढून टाकावे. मग उधारी चुकती करावी. उधारी तर चुकती करावीच लागेल ना? मी तुम्हाला त्याचा मार्ग सांगेन.

**प्रश्नकर्ता :** माणसाला माहीत आहे की मृत्यूनंतर दुसरा जन्म आहे, तरी देखील वाईट कर्मे का करतो? चांगली कर्मे करण्याचा मार्ग कोणता?

**दादाश्री :** स्वतःच्या इच्छेविरुद्ध वाईट कर्मे करावी लागतात. सकाळी उठल्यापासून तुमच्या सत्तेत काहीच नसते. सर्व काही परसत्तेच्या हाती आहे. आणि ही परसत्ता दुसऱ्या एका शक्तीच्या हाती आहे, जिला आम्ही 'व्यवस्थित शक्ती' असे म्हणतो. ही व्यवस्थित शक्ती काय करते? तर तुमच्या पुण्याचा उदय झाला की सर्व अनुकूल संयोग एकत्र करून देते आणि पापाचा उदय झाला की ती सर्व अनुकूल संयोग विस्कटून टाकते. म्हणजे सर्व काही परसत्तेतच चालले आहे, मग चांगली कर्मे असोत वा वाईट! जोवर परमार्थ सम्यक् दर्शन होत नाही, तोवर जीव परसत्तेतच राहतो.

## कर्मे, पाप-पुण्याची

**प्रश्नकर्ता :** पाप आणि कर्म हे एकच आहेत की वेगळे?

**दादाश्री :** पुण्य आणि पाप दोन्हींना कर्म म्हटले जाते. पण पुण्याची कर्मे त्रासदायक नसतात, आणि पापाची कर्मे आपल्या इच्छेनुसार होऊ देत नाहीत आणि त्रासदायक असतात.

**प्रश्नकर्ता :** ज्यांना भौतिक सुखे मिळतात, त्यांनी कुठल्या प्रकाराची कर्मे केलेली असतात म्हणून त्यांना ती मिळतात?

**दादाश्री :** कोणी दु:खी असेल त्याला सुख देणे, यामुळे पुण्य बांधले जाते आणि परिणाम स्वरूप तसे सुख आपल्याला मिळते. कोणाला दु:ख दिलेत तर तुम्हाला दु:ख मिळेल. तुम्हाला जे आवडेल ते तुम्ही द्या.

पुण्य दोन प्रकारचे आहे. एका पुण्याने भौतिक सुखे मिळतात, आणि दुसरे एक अशा प्रकारचे पुण्य आहे की जे आपल्याला खरे स्वातंत्र्य प्राप्त करविते.

## निंदेचे कर्मबंधन

कोणाचीही निंदा करता कामा नये. अरे, त्यांच्या बाबतीत काही बोलताही कामा नये. त्यामुळे भयंकर दोष लागतो. त्यातूनही इथे सत्संगात, परमहंसांच्या सभेत तर कोणाच्या बाबतीत थोडे सुद्धा बोलता कामा नये. एका थोड्याश्या विपरित कल्पनेमुळे ज्ञानावर केवढे मोठे आवरण पडते, तर मग महात्म्यांची टीका, निंदा केली तर केवढे मोठे आवरण पडेल? सत्संगात तर दुधात साखर जशी विरघळून जाते तसे मिळून मिसळून गेले पाहिजे. ही बुद्धीच आत ढवळाढवळ करीत असते. आम्ही सर्वांचे सर्व काही जाणतो तरी देखील कोणाबद्दल एक अक्षरही बोलत नाही. एक अक्षर देखील उलटे बोलण्याने ज्ञानावर मोठे आवरण येते.

'याने माझी फसवणूक केली' असे म्हटले तर त्याने भयंकर कर्म बांधले जाते. त्यापेक्षा दोन थोबाडीत मारल्या तर त्याने कमी कर्म बांधले जाईल. तसे तर जेव्हा फसण्याची वेळ येते, आपल्या कर्माचा उदय होतो तेव्हाच आपली फसवणूक होते. त्यात समोरच्याचा काय दोष? त्याने तर उलट आपले कर्म संपवून दिले, तो तर निमित्त आहे.

## कर्माला छेदणारी सत्ता

**प्रश्नकर्ता :** कर्माचे फळ तर भोगावेच लागते ना?

**दादाश्री :** हो. कर्माचा नियमच तसा आहे.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी' यातून सोडवू शकतात का?

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुष' तर तुमची कर्मे भस्मीभूत करून टाकतात. पण त्यात दोन प्रकारची कर्मे असतात, एक बर्फाच्या रुपात गोठलेली असतात, आणि दुसरी पाणी किंवा वाफेच्या स्वरूपात असतात. ज्ञानी, पाणी किंवा वाफेच्या रूपात असलेली कर्मे नष्ट करतात. पण बर्फ रूपात असलेली कर्मे भोगावीच लागतात! तरी पण स्वरूप ज्ञान दिल्यानंतर त्या कर्मांच्या भोगात फरक पडतो, सुळाचा वार सुईसारखा वाटतो. 'ज्ञानी पुरुष' कारणस्वरूपात असलेल्या कर्मांचा नाश करतात, पण आज जी कर्मे कार्यस्वरूपात आहेत, बर्फ रूप झाली आहेत, ती तर भोगावीच लागतील.

## प्रभु स्मरणामुळे मदत

**प्रश्नकर्ता :** आपली कर्मे आपल्याला तारतात किंवा बुडवतात, मग त्यासाठी प्रभु स्मरण कशाला करावे?

**दादाश्री :** प्रभु प्रकाशक आहेत, सर्व प्रकाशक आहेत. जर त्यांचे स्मरण केले नाही तर प्रकाश मिळणार नाही, एवढीच अडचण आहे. बाकी, त्यांना दुसरे काही देणेघेणे नाही. जर आपल्याला प्रकाश हवा असेल, तरुन जाण्यात किंवा बुडताना मदत हवी असेल तर प्रभु स्मरण केले पाहिजे. त्यांचे स्मरण केले तर तुम्हाला थोडाफार तरी प्रकाश मिळाल्याशिवाय राहणार नाही. त्यामुळे तुमची कर्मे चांगली होतील. पण प्रभु स्मरण अगदी मनापासून झाले पाहिजे. त्यात अशी थापेबाजी चालत नाही, की प्रभु वरती आहे. वरती तर कोणी बापही नाही. आत बसलेले आहेत तेच प्रभु आहेत.

## भगवंतांना देखील कर्मबंधन

**प्रश्नकर्ता :** पृथ्वीवर जे जे भगवंत होऊन गेले, ऋषभदेव, महावीर, नेमीनाथ हे सगळे कर्माच्या बंधनात आले होते ना?

**दादाश्री :** सगळेच कर्माच्या बंधनात आलेले, म्हणूनच आईच्या पोटी जन्म झाला. कोणतेच भगवंत असे नाहीत की जे आईच्या पोटी जन्मले नाहीत. जे भगवंत होऊन गेले, त्यांनी दोन-तीन जन्मांआधी

आत्म्याचे ज्ञान प्राप्त केले होते, मग शेवटी भगवंत झाले. ज्यांना आत्म्याचे लक्ष प्राप्त झालेले असेल, ते दोन-तीन जन्मात भगवंत होऊ शकतात. सरळ सरळ मोक्षात जायचे असेल तर तसेही जाता येते आणि जगत कल्याण करायचे असेल तर भगवंत होता येते, दोन्हीपैकी एक होते.

## ज्ञानी पुरुषांची दिव्यकर्मे

शास्त्रकारांनी ज्ञानींच्या प्रत्येक कर्माला दिव्य कर्म म्हटले आहे. कारण ते स्वतः संपूर्ण निर्‌अहंकारी, संपूर्ण अकर्ता पदात बसलेले असतात, म्हणून वीतराग म्हणविले जातात. या काळात तर संपूर्ण वीतराग नसतात. आम्ही वीतराग आहोत पण संपूर्ण नाही. आम्ही जगातील सर्व जीवांशी वीतराग आहोत, फक्त आमच्या जगत कल्याण करण्याच्या कर्मावर आम्हाला राग (मोह, आसक्ती) असतो. जगत् कल्याणाची खटपट करण्यासाठी आमच्यात थोडा राग राहिला आहे. तो देखील कर्म खपविण्यापुरताच आहे. तसे तर आम्हाला आमचा मोक्ष निरंतर वर्ततच असतो. ज्ञानींना काळ, कर्म आणि माया स्पर्श करू शकत नाही. द्रव्य-क्षेत्र-काळ-भाव आणि भव यापासून अप्रतिबद्धपणे वावरतात ते ज्ञानी.

## कर्माचे स्वरूप

लोक म्हणतात की कर्मे चिकटलेली आहेत. परंतु कर्मे तर स्त्री जातीचीही नाहीत, आणि पुरुष जातीचीही नाहीत. ती तर नपुंसक आहेत आणि तुम्ही स्वतः परमात्मा आहात!

खरे तर कर्मे जड नाहीत आणि चेतनही नाहीत, पण निश्चेतन-चेतन आहेत. कर्मांची फळे मिळतात, कारण आत आत्मा विराजमान आहे म्हणून. निश्चेतन-चेतनाला शुद्ध चेतनाचा स्पर्श झाला की कर्म चार्ज होत असते. स्वतःचे स्वरूप जाणले की कर्मे बांधणे बंद होते.

**प्रश्नकर्ता :** आत्मा आणि कर्म यांचा सबंध कसा आहे?

**दादाश्री :** रिलेटिव्ह संबंध आहे.

**प्रश्नकर्ता :** कर्मे आत्म्याला अडकवितात की आत्मा कर्माला बांधतो?

**दादाश्री :** कर्मे आत्म्याला अडकवितात. पुद्‌गलाची शक्ती इतकी अधिक आहे, की बघा ना, आत परमात्मा कसे अडकून पडले आहेत.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याने ठरवले तर तो कर्मे संपवू शकतो?

**दादाश्री :** स्वत: बांधला गेलेला आहे, मग कसा सुटू शकेल? जर आत्मा स्वभावात आला तर कर्मे संपतील. स्वभावात आल्यानंतर मात्र कशीही कर्मे असली तरी ती नष्ट करून टाकतो. 'ज्ञानी पुरुष' एका तासातच कर्मे नष्ट करतात. म्हणूनच तुम्हाला आत्म्याचे निरंतर लक्ष प्राप्त होते, नाही तर प्राप्त होणारच नाही.

कर्मे पुद्‌गल स्वभावाची आहेत आणि ते त्यांचे पर-परिणाम दाखवतच राहतील. आपण 'शुद्धात्मा' आहोत, हा स्व-परिणाम आहे. पर-परिणाम ज्ञेय स्वरूप आहे आणि 'आपण' ज्ञाता स्वरूप आहोत.

## कर्म आणि 'व्यवस्थित'

**प्रश्नकर्ता :** आपण ज्याला 'व्यवस्थित' म्हणता, ते कर्मानुसार आहे?

**दादाश्री :** कर्मामुळे जग चालत नाही. 'व्यवस्थित शक्ती' जग चालविते. तुम्हाला इथे कोण घेऊन आले? कर्म? नाही. तुम्हाला 'व्यवस्थित'ने आणले. कर्म तर आत पडलेलेच होते. मग त्याने काल का आणले नाही आणि आजच का आणले? 'व्यवस्थित' काळ, क्षेत्र आणि संयोग यांना एकत्र करतो. सर्व संयोग एकत्र आले, तेव्हा तुम्ही इथे आलात. कर्म तर व्यवस्थितचा एक अंश आहे.

## भावबीजापासून सावधान

भगवंत म्हणतात, 'तू परमात्मा आहेस. द्रव्य-भाव यापासून स्वतंत्र आहेस. प्रत्येक संयोगपासून स्वतंत्र आहेस.' पण लोक संयोगांना अधिक चिकटून बसले आहेत. आपल्या हातात एक बीज असेल आणि दुसरे बीज खाली जमिनीवर पडले असेल तर त्या दोन्हीत काही फरक नाही का?

म्हणजे भगवंत म्हणतात की हातातील बीज हळूच कुठेतरी ठेऊन द्या. पण खाली पडलेल्या बीजाला शोधा. कारण दुसरे सायंटिफिक

सरकमस्टेन्शियल एविडेन्स त्याला मिळाले तर ते उगवेल आणि बीज जमिनीवर पडले की त्याला दुसरे एविडेन्स मिळतीलच, म्हणून तिथे सावध राहा. जराही मोड आला असेल तर त्याला लगेच उपटून फेकून द्या नाहीतर त्याचा वृक्ष होईल.

सध्या आत जे वेडे-वाकडे भाव येतात, ती पडलेली बीजे आहेत. तुम्हाला तर आता जीव-जंतू मारायचे नाहीत, तरी देखील जंतू तुमच्या पायाखाली चिरडले गेले तर समजा की ते पडलेले बीज आहे. तिथे जागृत होऊन प्रतिक्रमण करावे.

जगात यज्ञ चालूच असतो, त्यात सर्व कर्मांचा होम करत राहतात आणि नवीन कर्मे बांधली जातात.

## कर्म विलय झाल्याची प्रतीती

**प्रश्नकर्ता :** कर्मसंस्काराचा विलय झाला, हे कसे समजेल?

**दादाश्री :** ज्यांच्या संदर्भात आपले कर्म असेल तिथे राग किंवा द्वेष राहिला नाही, तर समजावे आपले कर्म विलीन झाले आहे आणि जर आपल्याला त्याबद्दल आवड किंवा नावड वाटत असेल तर समजावे की कर्माची सत्ता अजून चालू आहे.

## पुद्‌गलाचे कर्मबंधन कसे पडते?

**प्रश्नकर्ता :** परमाणू आणि कर्मबंधन या दोघांची लिंक काय आहे? कर्मबंधन कसे पडते?

**दादाश्री :** आत्म्याची चैतन्यशक्ती अशी आहे की रॉंग बिलीफमुळे विकल्प होतात. 'हा मी आहे, हा मी आहे' यामुळे रॉंग बिलीफ उभी राहते, आणि तेच कर्मबंधन आहे. जसे आरशात पाहिले की लगेच फोटो दिसतो, तसेच परमाणू सक्रिय असल्यामुळे विकल्प झाल्याबरोबर लगेच तसेच सर्व परमाणू उत्पन्न होतात. मूळ परमाणू 'तत्वस्वरूप' आहेत. पण जेव्हा एकत्र येतात तेव्हा ते अवस्था स्वरूप होतात. हे सर्व सक्रियाचे चमत्कार आहेत. आत्म्याला हे पुद्‌गल तत्त्वच गोंधळात टाकते. त्याची

सक्रियताच गोंधळात टाकते. पुद्‌गलाची सक्रियता अशी आहे की स्वत: अजीव आहे तरी जीव आहे असे भासते. जसे ही चिमणी आरशात स्वत:च्या प्रतिबिंबाला चोच मारते ना, तसे!

## गाढ कर्मांपासून सुटका

**प्रश्नकर्ता :** गाढ कर्मे असतात, त्यामुळे आपल्याला दु:ख भोगावे लागते का?

**दादाश्री :** आपणच कर्मे केलेली, त्यामुळे आपलीच चूक आहे. इतर कोणाचाही दोष या जगात नाही. इतर सर्वे तर फक्त निमित्त असतात. दु:ख तुमचे आहे आणि समोरच्याच्या निमित्ताद्वारे दिले जाते. सासरा वारल्याचे पत्र पोस्टमन देऊन जातो त्यात पोस्टमनचा काय दोष?

**प्रश्नकर्ता :** गाढ कर्म कशाला म्हणतात?

**दादाश्री :** मन-वचन-काया यांच्या पूर्ण एकाग्रतेने केलेली कर्मे की ज्यात दुसरा कुठलाही विरोधाभासी भाव नसतो, त्यामुळे भयंकर गाढ कर्मे बांधली जातात. 'इथे' आत्म्यासाठी केलेली अशी गाढ कर्मे दोन-तीन जन्मात आपली सुटका करवितात. आणि सांसारिक गाढ कर्मे परिपक्व व्हायला दीर्घ कालावधी लागतो. म्हणूनच हा संसार उभा आहे ना?!

एखादा साधा मनुष्य पहिल्यांदाच खिसा कापायला जाईल तर लगेच पकडला जाईल, कारण त्याचे कर्म लगेचच विपाक (पक्व) होते आणि त्या कर्मापासून त्याची सुटका होते. पण अट्टल चोर पकडला जात नाही. आता लोक तर जो आधी पकडला गेला त्यालाच गुन्हेगार म्हणतील. पण निसर्ग त्याच्या फेवरमध्ये असतो. ज्याची कर्मे हलकी असतील त्याला त्याचे कर्मफळ देऊन ऊर्ध्वगतीत घेऊन जातो, आणि जो अट्टल असेल तो पकडला जात नाही. म्हणून ती त्याची अधोगतीत जाण्याची निशाणी आहे.

## गाढ कर्म म्हणजे काय?

काही कर्मे तर अशीच उडून जातात. काही पश्चात्ताप केल्याने उडतात. आणि जी पश्चात्ताप करूनही भोगावी लागतात, त्या कर्मांना

चिकट-गाढ कर्मे म्हटले जाते, ती भोगावीच लागतात. जैन लोक त्यांना निकाचित कर्म म्हणतात. कोणी आपल्यावर थुंकले असेल तर त्यावर पाणी टाकले की ते लगेच धुतले जाते आणि कोणी असे थुंकले असेल की साबण लावून घासत राहिलो, धुवत राहिलो तरी जात नाही. काही कर्मे अशी अत्यंत गाढ असतात.

**प्रश्नकर्ता :** 'समभावाने निकाल' करण्याचा दृढ निश्चय केला असूनही भांडण होतेच, ते का?

**दादाश्री :** किती ठिकाणी असे होते? शंभरेक ठिकाणी?

**प्रश्नकर्ता :** एकाच ठिकाणी होते.

**दादाश्री :** मग ते निकाचित कर्म आहे. हे निकाचित कर्म कशाने धुतले जाते? आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याखान केल्याने. त्याने कर्म हलके होते. त्यानंतर ज्ञाता-द्रष्टा राहता येते. त्यासाठी सतत प्रतिक्रमण करावे लागते. जितक्या फोर्सने ते निकाचित झाले असेल, तेवढ्याच फोर्सने केलेल्या प्रतिक्रमणाने ते धुतले जाते.

**प्रश्नकर्ता :** या निकाचित कर्मांसमोर पुरुषार्थ कसा केला पाहिजे?

**दादाश्री :** त्यात अत्यंत जागृती ठेवावी लागते. निसरड्या जागी कसे सावध राहता? जंगलात वाघ-कोल्हे दिसले तर किती जागृती असते? तशीच यातही जागृती राहिली, तरच सुटता येईल.

## निष्काम कर्म कसे केले जाते?

**प्रश्नकर्ता :** पुनर्जन्म होतो, तो आसक्तीचा परिणाम आहे की कर्माचा परिणाम?

**दादाश्री :** कर्माच्या परिणामामुळे आसक्ती होते आणि आसक्तीमुळे पुनर्जन्म होतो. आसक्ती ही 'स्टेपिंग' आहे.

**प्रश्नकर्ता :** निष्काम कर्म केले तरी पुनर्जन्म होतो?

**दादाश्री :** निष्काम कर्म केले तरी पुनर्जन्म बंद होईल असे नाही. स्वरूपज्ञान झाल्यावरच पुनर्जन्म थांबतो.

**प्रश्नकर्ता :** निष्काम कर्मामुळे कर्मे कशी काय बांधली जाणार?

**दादाश्री :** 'मी चंदुभाई आहे' म्हणून निष्काम कर्म करायला जाल तर कर्माचे बंधन पडेलच. निष्काम कर्म केल्याने हा संसार चांगल्या प्रकारे चालतो. खरे तर निष्काम कर्म, 'मी कोण आहे?' हे निश्चित झाल्याशिवाय होऊच शकत नाही. जोवर क्रोध-मान-माया-लोभ आहेत, तोवर निष्काम कर्म कसे होऊ शकेल?

स्वतःच मानतो की 'मी निष्काम कर्मे करतो', पण वास्तवात त्याचा कर्ता कोणी दुसराच आहे. ज्या-ज्या प्रकारच्या क्रिया होतात त्या सर्व डिस्चार्जच असतात. 'मी निष्काम कर्म करतो' असे मानतात, तेच बंधन आहे. निष्काम कर्माचा कर्ता आहे, तोवर बंधन आहे.

कृष्ण भगवंतांनी लोकांना दुसरा मार्ग दाखविला की ज्यामुळे भौतिक सुखे मिळतात. निष्काम कर्म कशाला म्हणतात? तर आपल्या घरची कमाई येते, जमिनीची कमाई येते, त्याशिवाय हा छापखाना काढला आहे, त्यातून कमाई होईल. अशा तऱ्हेने वर्षभरात वीस-पंचवीस हजार मिळतील, असे मानून चाललो आणि मग पाच हजारच मिळाले तर वाटते की वीस हजाराचे नुकसान झाले. आणि जर काही धारणाच ठेवली नसेल तर? निष्काम कर्म म्हणजे कर्म केल्यानंतरच्या परिणामांची इच्छा न करता करत राहणे. कृष्ण भगवंतांनी खूप सुंदर सांगितले आहे, पण कोणाकडून तसे होऊ शकत नाही ना? माणसाचे सामर्थ्यच नाही ना? या निष्काम कर्माला यथार्थपणे समजणे फार कठीण आहे. म्हणूनच कृष्ण भगवंतांनी सांगितले होते की माझ्या गीतेचा सूक्ष्मतम अर्थ समजणारा कोणी एखादाच असेल.

**प्रश्नकर्ता :** निष्काम भावाने कर्म केले तर कर्मबंधन होणार नाही ना?

**दादाश्री :** निष्काम भावाने कर्म करा, पण 'तुम्ही चंदुभाईच आहात' आणि 'मी चंदुभाई आहे' ही तुमची बिलीफ (मान्यता) आहे, तोवर निष्काम भावाने केलेल्या कर्माने पुण्य कर्म बांधले जाईल. कर्म तर बांधले जाईलच. कर्ता झाला की कर्मबंधन झाले.

**प्रश्नकर्ता :** निष्कामी कसे होता येईल?

**दादाश्री :** परिणामाचा विचार न करता काम करत राहा. साहेब मला रागावतील, ओरडतील असा विचार न करता काम करत राहा. परीक्षा देण्याचा विचार केला असेल तर मग 'पास होईन की नाही, पास होईन की नाही', असा विचार न करता परीक्षा देत जा.

कृष्ण भगवंतांची एकही गोष्ट समजली नाही आणि वर म्हणतात की कृष्ण लीलावाले होते! अहो, तुम्ही लीलावाले की श्रीकृष्ण लीलावाले? कृष्ण तर वासुदेव होते, नरातून नारायण झाले होते!

## आत्मा अनादि काळापासून शुद्धच!

वीतरागांनी सांगितले, की कर्म आणि आत्मा दोन्हीही अनादि काळापासून आहेत. म्हणजे त्याची कधी आदि (सुरुवात) झाली नाही, म्हणजे कर्माच्या आधारानेच भाव उत्पन्न होतात आणि भावाच्या आधारानेच ही कर्मे उत्पन्न होतात, आणि असे सतत चालतच राहते. आत्मा तिथल्या तिथेच असतो.

## करणे, करविणे आणि अनुमोदन देणे

**प्रश्नकर्ता :** करणे, करविणे आणि अनुमोदन देणे यात काय फरक आहे?

**दादाश्री :** असे आहे की, अनुमोदन देणाऱ्यास भयंकर दोष लागतो. करवितो त्याचा सेकंडरी दोष आहे आणि करणाऱ्याचा थोडासाच दोष आहे. करणाऱ्याचा खास दोष नाही. हे कसाई बकऱ्याला कापून विकतात, त्याचा त्यांना जो दोष लागतो, त्यापेक्षा जे लोक म्हणतात की, 'आम्हाला मांसाहार केला पाहिजे, नाही तर अन्न कमी पडेल', अशी जी *प्ररूपणा* (प्रतिपादन) करतात, त्यांना अधिक दोष लागतो. कसाई तर बिचारे स्वतःच्या पोटासाठी करतात. आणि हे कट्टर अहिंसा धर्म पाळणारे लोक बकरे (!) कापतात, ते कशा करिता कापतात?

**प्रश्नकर्ता :** हे समजले नाही.

**दादाश्री :** हे बकरे कापणारे कसाई तर चांगले आहेत की एका

झटक्यात हलाल करून मारून टाकतात, पण हराम करत नाहीत. आणि ते तर हराम करतात, त्रास देऊन देऊन मारतात. कोणी पाचशे रुपये उधार घेतले असतील, तर बारा महिन्यात चारशे रुपये तर त्याचे व्याजच झालेले असते! शिवाय बुद्धीने मारतात, त्यांना बंदुकीची गरज नाही. दुकानात ग्राहक आले की म्हणतील 'अलाहाबादचा खूप चांगला माल आहे.' तो बिचारा भोळा ग्राहक, ते खरे मानून घेऊन जातो. शेठला वाटते की हा तर अडाणी आहे तर ठोकून द्या ना इथेच. म्हणजे ते बुद्धीने गोळी मारतात! हे तर भयंकर रौद्रध्यान म्हटले जाते. यांची काय दैना होईल? शेठ अशी काही ट्रिक (युक्ती) करतात की साऱ्या जिल्ह्याचे सगळे शेतकरी शेठच्या घरी पैसे घेऊन येतात. व्याजावर व्याज आणि त्यावरील व्याज चुकविता चुकविताच शेतकरी मृतप्राय होतात आणि शेठ दीड-दीडशे किलोचा होऊन फिरत असतो! काळ बदलला की याच किलोची चटणी बनेल! कृपाळूदेव काय म्हणतात की जे मांस वाढवण्यासाठी खातात, ते सर्व मांसाहार करत आहेत. भोजन जिवंत राहण्यासाठी आहे. त्याऐवजी इथून फुगतो, तिथून फुगतो आणि मोठ्या टरबूजासारखा होतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अनुमोदन करणाऱ्याचाच गुन्हा जास्त मानला जातो का?

**दादाश्री :** अनुमोदन दोन प्रकारचे असते. एक तर अनुमोदन देणाऱ्याच्या आधारानेच सर्व क्रिया होतात. आणि दुसऱ्या प्रकारच्या अनुमोदनात तो फक्त हो, हो म्हणतो, 'होय साहेब, होय साहेब' म्हणतो. त्यात फार दोष नाही. कोणी क्रिया करत असेल आणि त्यात तुम्ही 'हो बाबा, मला चांगले वाटले, चांगले आहे' म्हणालात तर त्याला काही फार महत्त्व नाही. तुम्ही तसे म्हटले नसते तरी ते तर करणारच होते. आणि जी क्रिया अनुमोदनेनेच होत असेल, अनुमोदन नसेल तर क्रिया होणार नाही, असे असेल तर त्याचा फार मोठा दोष आहे. ज्याच्या अनुमोदनेमुळे जग चालते ती सर्वात किमती अनुमोदना.



## [ 36 ]
# भाव, भाव्य आणि भावक

### भावकच भावाचा कर्ता

**प्रश्नकर्ता :** भाव करविणारा कोण आहे? भाव आत्मा करतो का?

**दादाश्री :** आत 'भावक' आहेत, ते भाव करवितात. आत्मा भाव करीत नाही. लोक समजतात भावकर्म चिकटलेले आहेत. खरे तर भाव करणारे आत बसलेले आहेत. आत्मा कधीच भाव करीत नाही.

**प्रश्नकर्ता :** ते भावक कोण आहेत?

**दादाश्री :** ते फक्त भावक नाहीत. क्रोधक आहे, क्रोध करविणारा. लोभक आहे, लोभ करविणारा. निंदक आहे, करायची नसली तरी तो निंदा करवितो. यात आत्मा काहीच करत नाही. जर आत्म्याने भाव केला तर त्याची काय दशा होईल? मग तर तो संपलाच म्हणायचा ना? हे भाव करविणारे दुसरेच आहेत. त्यांचे नाव भावक आहे. भावक भाव करवितात. त्यावेळी 'आत्मा' भाव्य होतो, 'त्याला' ते चांगले वाटते. स्वत:च्या स्वरूपाचे भान नसल्यामुळे असा परिणाम होतो.

### भावामध्ये एकाकार झाला, तर भाव्य

*'महींला भावके भाव्य भळे तो,*
*चितरामण नवुं थाय ज छे स्तो!'* – नवनीत

(आतील भावकांमध्ये जर भाव्य एकाकार झाला, तर नवीन चित्रण होतेच.)

आत जे भाव होतात त्यात भाव्य एकाकार होतो. त्यातून नवे चित्रण होते. आत्मा भाव्य आहे आणि आत भावक भाव करवितात. भाव होतात त्यात काय हरकत आहे? भाव्य जर त्या भावात एकाकार झाला नाही आणि फक्त पाहतच राहिला की, 'अरे! आतील भावक असेही भाव करवितात!' भावक भले कसेही भाव करवोत, पण 'आपण' त्यांना पाहत राहिलो तर आपल्याला बंधन होणार नाही. हे अंतिम विज्ञान आहे.

## भावकाचे स्वरूप

**प्रश्नकर्ता :** आपल्याला कसे समजेल की भावकाने हा भाव करविला? हे जरा सविस्तर सांगावे.

**दादाश्री :** आपण मुंबईतील वस्तीत राहत असू आणि एकाएकी बाहेर जावे लागले आणि तिथे वाळवंट आले, जिथे एकही झाड नाही, सावली नाही, तिथे असे भाव होतात की, 'कुठे बसावे, कुठे गार वाटेल, कुठे आसरा घ्यावा?' असे भाव आतील भावक करवितात. ते सर्व आतच बसलेले आहेत. आणि सर्व जग या मोक्षपंथावरून चालले आहे. हा तर पूर्ण प्रवाहच आहे आणि सर्व जीव प्रवाहाच्या रूपात चालतच आहेत. तेव्हा मार्गाने जाता-जाता वेगवेगळे भावक येतात.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा झाला की शाता-अशाता (देहाचा सुख परिणाम-देहाचा दु:ख परिणाम) वेदनीय झाली?

**दादाश्री :** नाही, नाही. शाता-अशाता वेदनीय नाही, वेदनीयला तर वेदनीयच म्हणतात. आणि हे तर भावक आहेत. वेगवेगळे भाव करवीत असतात. आपल्याला घाबरायचे नसेल, आपण निर्भय असू, परंतु जर सापाला जाताना पाहिले की लगेच भीतीचा भाव करवितात. करवितात की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, करवितात. तर मग त्याला विकल्प म्हणतात का?

**दादाश्री :** नाही, विकल्प म्हणत नाहीत. साप गेला आणि त्यात तन्मयाकार झाला तर भावक भयाचा भाव करवितो. तो भयाचा भावक आहे.

## भावकाचा आधार संसारीज्ञान

हे जे सांसारिक ज्ञान आहे, ते भावक करवेल असे ज्ञान आहे. जर मूळ ज्ञान असेल तर भावक काहीच करणार नाहीत. 'मूळ ज्ञान' म्हणजे 'मी शुद्धात्मा आहे' असे भान होणे, त्यानंतर भावकांचे काही चालत नाही. जोवर मूळ ज्ञान होत नाही, तोवर भावकच आदळ-आपट करवीत राहतात. इथून धक्का मारतात आणि तिथूनही धक्का मारतात, फुटबॉलसारखे आपटत राहतात.

**प्रश्नकर्ता :** हे भावक अंत:करणाच्या कुठल्या भागात असतात? मनात असतात का?

**दादाश्री :** नाही. भावक तर अंत:करणापासूनही वेगळे आहेत! ते अंत:करणात येत नाहीत. अंत:करण तर भावक सांगतील तसे चालते. भावक आत्म्याला मूर्च्छित करतात, म्हणून आत्मा भाव्य होतो. मग हे अंत:करण सुरू होते. आणि जर 'मी शुद्धात्मा आहे' असे भान राहिले तर लाखो भावक आले तरी हरकत नाही. आत भावक एकटाच नाही. क्रोधक, लोभक, निंदक, चेतक असे किती तरी 'क' आत आहेत. 'क' म्हणजे करविणारे आहेत. आत तर सारे ब्रह्मांड आहे!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे भावक आत्मा मूर्च्छित होईल असे भाव उत्पन्न करतात?

**दादाश्री :** नाही, तसे नाही. भावक असे काही उत्पन्न करतात की त्यामुळे आत्मा मूर्च्छित होतो. मूर्च्छित म्हणजे स्वत:च्या स्वरूपाचे भान हरपून बसतो. जसे इथे एखादा गॅस पाइप फुटला तर मनुष्य बेशुद्ध होतो ना? तसेच भावक आत्म्याला भाव करवितात, त्याचा परिणाम होतो. परिणाम कोणावर होणार नाही? तर ज्याला स्वत:च्या स्वरूपाचे भान आहे त्याच्यावर होणार नाही. नाही तर हे सांसारिक ज्ञान आत्म्यावर परिणाम केल्याशिवाय राहत नाही. या संयोगांचा दबाव इतका जास्त असतो की आत्म्यावर परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. जेव्हा 'मी शुद्धात्मा आहे' हे कळेल तेव्हा भावकांचा जोर राहणार नाही. सामान्य समजूत अशी आहे की आत्मा भाव करतो, त्यामुळे काळ, भाव आणि

कर्म बांधले गेले आहेत. पण आत्म्याने भाव केला तर झालेच की, सर्व संपलेच. मग तर तो कशाचा तरी भिकारी आहे, असे सिद्ध होईल.

भावक भाव करवितात आणि भावकच आत्म्याला भाव्य बनवितात.

**प्रश्नकर्ता :** हे भावक परमाणूच्या रूपात आहेत की गाठीच्या रूपात आहेत?

**दादाश्री :** परमाणू रूपात आहेत. ते पुद्गल परमाणू आहेत.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा झाला की स्वत:ला आवडेल असे झाले तर आत्मा त्यात तन्मयाकार होतो?

**दादाश्री :** हो. आणि जर त्याला आवडले नाही तर तन्मयाकार होत नाही. म्हणजे तो भाव्य झाला नाही तर काहीच होत नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे तन्मयाकार झाला नाही तर चित्रण होणार नाही?

**दादाश्री :** तन्मयाकार झाला नाही तर काहीच हरकत नाही, पण तो तन्मयाकार झाल्याशिवाय राहतच नाही. स्वरूपाचे ज्ञान झाले असेल तरच 'तो' तन्मयाकार होत नाही.

## भावक, समसरणानुसार बदलत राहतात

हे भावकदेखील बदलत राहतात. दहाव्या मैलावर भावक असे असतील, तर अकराव्या मैलावर नवीनच प्रकारचे असतात, बाराव्या मैलावर आणखीनच नव्या प्रकारचे असतात. कारण 'आपण' सर्व गतीशील आहोत. म्हणजे कोणी कर्ताच नाही. या जगात आत्माही कर्ता नाही. आणि पुद्गलही कर्ता नाही. जर पुद्गल कर्ता असता तर पुद्गलाला भोगावे लागले असते आणि आत्मा कर्ता असता तर आत्म्याला भोगावे लागले असते. आत्मा भोगत नाही आणि पुद्गलही भोगत नाही, अहंकार भोगतो.

**प्रश्नकर्ता :** हे जे सर्व उत्पन्न झाले आहे, ते मूलत: स्वत:च्या आशयातूनच उत्पन्न झाले आहे ना?

**दादाश्री :** नाही, नाही. आशय वगैरे काही नाही. हे तर 'फसलो

रे, बाबा' असे झाले आहे, स्वत:च्या आशयात असते तर मात्र तो 'स्वत:' गुन्हेगार मानला जाईल, 'स्वत:' कर्ता झाला असे म्हटले जाईल!

**प्रश्नकर्ता :** आत्मज्ञान झाले नव्हते, त्याच्याआधी हे जे सर्व उत्पन्न झाले, ते आशयातूनच ना?

**दादाश्री :** त्या आशयामुळे आपल्याला असे वाटते खरे की, जे आशय आहेत त्यांचे हे फळ आहे. पण ते आशय कर्ता नाहीत. आपल्याला असे वाटते की हे आशय आपलेच असावेत, म्हणूनच हे सर्व झाले. जसा आशय असतो तसे होते. तो तर नियमच आहे की असे तिकीट काढले म्हणजे तो कलकत्त्याला पोहोचेल. आशय म्हणजे तिकीट काढण्यासारखे आहे.

लोक तर अहंकाराने म्हणतात की मला असे आशय उत्पन्न झाले म्हणून हे झाले. संसार सतत प्रवहन करीत आहे. एका व्यक्तीने भगवंतांना विचारले, 'भगवंत मी असे काय करु की ज्याने माझा मोक्ष लवकर होईल?' तेव्हा भगवंत म्हणाले 'तुझी भवस्थिती अजून परिपक्व झालेली नाही. मोक्षासाठी अजून खूप वेळ आहे तुला.' म्हणजेच अठराव्या मैलावर मोक्ष असेल तर अकराव्या मैलावर असलेला मोक्षाला कसा जाईल? तू 'ज्ञानी पुरुषा'जवळ बसून राहिलास तरी तुझे काही होणार नाही. पण तू एक विशिष्ट (मैलाच्या) बाऊंड्रीवर आलास आणि 'ज्ञानी पुरुष' भेटले तर तुझे कल्याण होईल.

हे जे भाव करवितात ते आतील भावक आहेत. हे सायन्स फार उच्च प्रकारचे आहे. 'जवेरीबाजारात' असलो तर वेगळे भाव होतात, 'दारुखानात' वेगळे भाव होतात आणि 'चोरबाजारात' (मुंबईतील वस्त्यांची नावे) वेगळे भाव होतात.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे, कारण प्रतिक्षण भाव बदलत असतात.

**दादाश्री :** जे बदलतात ते भावक आहेत, आत्मा नाही. 'शुद्धात्म्या'त राहील त्याला 'डोंगरी' पण बाधक नाही, 'दारुखाना' पण बाधक नाही, 'जवेरीबाजार' पण बाधक नाही आणि 'चोरबाजार' पण बाधक नाही.

हा 'रिलेटिव्ह' ज्ञानाचा आधार आहे म्हणून जसे स्थान बदलते तसे भावही बदलतात. हे इंद्रियज्ञान आहे आणि इंद्रियज्ञानामुळे भाव बदलतात. स्वरूपाचे भान आले की त्यानंतर भावकांचे काहीही चालत नाही.

अर्थात हा सर्व परमाणूंचा परिणाम आहे. जसा मैल बदलतो तसे परमाणूही बदलतात. आणि मोक्षमार्गातील प्रवाहात हळूहळू पुढे जात राहतात.

**प्रश्नकर्ता :** शेवटी कुठलाही भावक परमाणू राहतच नाही ना? ज्ञानींमध्ये हे 'क' असतात का?

**दादाश्री :** आमच्या दशेत भावकाचा परमाणू देखील राहत नाही. आम्ही ज्या जागी बसलो आहेत, त्या जागी तुम्ही आलात तर तुमचेही भावक राहणार नाहीत, मग आत कोणी बोंबा मारणारा राहणार नाही, शुद्धात्म्याच्या स्पष्ट वेदनात आले की 'क' राहत नाहीत. हे सायन्स फक्त समजून घेतले पाहिजे. हे ज्ञान स्वत:च क्रियाकारी आहे. ही सूक्ष्म गोष्ट समजली तरच मोक्ष होईल.

## भावात एकाकार झाले नाही तर मुक्ती

भगवंतांनी तप कशाला म्हटले आहे? लोक तापतात (त्रास सहन करतात) त्याला भगवंत तप म्हणत नाहीत. याला तर लोक-तप, लौकिक तप म्हणतात. मोक्षासाठी अलौकिक तप लागते. आत भावक सर्व प्रकारचे भाव करवितात त्यावेळी असे तप असावे की 'स्वत:'चे जराही चुकता कामा नये. महावीर भगवंतांनी देखील हेच तप केले होते. शेवटपर्यंत तपात तापले व ज्ञानाने पाहतच राहिले, आणि 'स्वत:' परिणामांपासून मुक्त राहिले!

**प्रश्नकर्ता :** असे परिणाममुक्त कसे राहता येईल?

**दादाश्री :** आत सर्व भावक आहेत, स्वत: जर भाव्य झाला तर भाव होतो आणि अडकून पडतो. तू तर परमात्मा आहेस, म्हणून भावांना जाण. आणि भावांचा जर तू ज्ञाता-द्रष्टा राहिलास तर तू अडकणार नाहीस. जर भावक नसतील तर तू स्वत: परमात्माच आहेस. हे भावक कोण आहेत? तर पूर्वी केलेली गुन्हेगारी, हेच भावक आहेत, त्यामुळे

बीज पडतात. भावक आणि भाव्य एकाकार झाले की योनीमध्ये बीज पडते. आणि त्यातून संसार उभा होतो. जर भावक आणि भाव्य एकाकार झाले नाहीत, तिथे जर 'स्वत:' स्ट्राँग राहिला, 'स्वत:' भाव्य बनला नाही, तर अनुबंध उदयास येईल पण कर्मबंध न पडताच *निर्जरा* होईल.

आम्ही 'ज्ञान' देतो, त्यानंतर आत 'चेतक' बसवून देतो. मात्र तुम्ही आता त्याला मजबूत करून घेतले पाहिजे. 'विषय विकारात सुख आहे', तिथे चेतकची गरज आहे. जसे पोलीस दंडूके मारून एखादे काम करवून घेतात तसे नाइलाजाने विषयभोगाचे आराधन असले पाहिजे. या चेतकाला इतके मजबूत केले पाहिजे. तरच तो विषयाला विरोध करील. नाही तर चेतक शक्तीहीन होऊन जाईल. हे 'क' तर फार बलवान असतात.

संसारात अडकण्याची वेळ आली की चेतक चेतावणी देतात! स्वरूपज्ञान मिळाल्यावर आत आलोचना, प्रतिक्रमण, चेतक वगैरेंची नवीन केंद्रे स्थापित होतात आणि 'क'च्या वंशावळची केंद्रे बंद होऊ लागतात.

## व्यापक-व्याप्य

**प्रश्नकर्ता :** व्यापक-व्याप्य, हे समजावून सांगा ना.

''व्यापक ने 'व्यवस्थित' खोळे छे,
दिव्यचक्षू एनी ल्हाणी माणे छे.'' - नवनीत

**दादाश्री :** कविराज काय म्हणतात की व्यापकाला 'व्यवस्थित' शोधत आहे! सारे जग 'व्यवस्थित शक्ती' चालवीत आहे आणि निरंतर 'व्यवस्थित'च ठेवते. त्याला कोणी बदलू शकत नाही. आणि 'व्यवस्थित' कधीही 'अव्यवस्थित' करीत नाही. हे तर मोठ्या रकमेला मोठ्या रकमेने भाग देतात. असे वाटते की, 'स्वत:चाच मुलगा का इतके चुकीचे वागतो, नुकसान करतो?' अरे, जितकी वजनदार तुझी रक्कम असेल तेवढ्याच रकमेने भाग जाईल ना? छोट्या रकमेचा छोट्या रकमेने आणि मोठ्या रकमेचा मोठया रकमेने भाग जातो, परंतु भाग जातोच.

**प्रश्नकर्ता :** व्यापक म्हणजे ईश्वर?

**दादाश्री :** इथे या भक्तीपदात व्यापकचा अर्थ वेगळा आहे. सर्वव्यापक हा शब्द वेगळा आहे आणि या भक्ती पदातील शब्द वेगळा आहे. जसे भावक, चेतक आहेत तसेच व्यापक आहेत. आत्मा व्याप्य आहे आणि आत व्यापक भरलेले आहेत. हे व्यापक आत्म्याला व्याप्य करवितात. आत अनेक प्रकारचे व्यापक बसलेले आहेत. व्यापक म्हणजे व्यापकता करणारा, आणि व्याप्य म्हणजे, जसे या मडक्यात लाईट आहे आणि त्याला बाहेर काढला तर तो बाहेरच्या बाजूला व्याप्य होतो. जितकी जागा मिळेल तितक्या जागेत तो व्याप्य होतो. फक्त स्कोप मिळाला पाहिजे. आणि व्यापकचा अर्थ काय? सर्वात, जीवमात्रात व्यापकाप्रमाणे राहिला आहे. तो व्यक्त झाल्यावर, स्वरूपज्ञान प्राप्त झाल्यानंतर व्याप्यप्रमाणे राहतो. खरे तर आत्मा व्याप्यप्रमाणेच आहे, पण भक्तांनी त्याला व्यापक म्हटले, तरच काम होईल.

## प्रमेय-प्रमाता

आत्मा प्रमाता आहे. मग प्रमेयचा अर्थ काय? या मजुरांचे प्रमेय किती असेल? तर त्यांचा मेन्टेनन्स (खर्च) निघेल, मुलाबाळांचे शिक्षण होईल, एवढा. म्हणजेच थोडाफार शिकण्याचा भाव आणि थोडाफार संसाराचा भाव. इतके त्याचे प्रमेय असते. आणि तेवढ्या भागात त्याचा आत्मा प्रमाताप्रमाणे राहतो. प्रमेयानुसार प्रमाता होतो. असे करत करत प्रमेय वाढत-वाढत शेठला दहा बंगले, कारखाने, गाड्या, पैसे वगैरेचा संसारभाव वाढत जातो, तसतसे त्याचे प्रमेय मोठे झाले असे म्हटले जाते. तसतसा त्याचा प्रमाता वाढतो. शेवटी, वास्तवात प्रमाता कोणाला म्हटले जाते? संपूर्ण ब्रह्मांडात आत्मा प्रकाशित होतो तेव्हा त्याला वास्तविक प्रमाता म्हटले जाते. संपूर्ण ब्रह्मांड प्रमेय आहे. प्रमेयाचा भाग किती? तर लोक विभाग आहे तेवढाच, अलोक विभाग नाही. अलोकात प्रमाता नाही. आत्मा प्रमेयानुसार प्रमाता बनतो.



# [ 37 ]
# क्रियाशक्ती : भावशक्ती

## क्रियाशक्ती परसत्तेच्या आधीन

**दादाश्री :** तुम्हाला अजून शंभर जन्म घ्यायचे आहेत की लवकर मोक्षाला जायचे आहे? तर मग 'ज्ञानी पुरुष' तशी चिठ्ठी लिहून देतील. ज्ञानी हवे ते करू शकतात. कारण ते कशाचेही कर्ता नसतात. 'ज्ञानी पुरुषां'ना मोक्षदाता म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** ते तर मार्ग दाखवतील, पण मग करायचे तर आपल्यालाच असते ना?

**दादाश्री :** क्रियाशक्ती स्वत:च्या हातात नाही. फक्त भावशक्तीच स्वत:च्या हातात आहे. फार झाले तर आपण असे करू शकतो की मला दादांच्या आज्ञेचे पालन करायचे आहे, असा भाव करू शकतो. दुसरे काही करू शकत नाही. फक्त एक भावशक्तीच वापरण्याची सूट आहे. लोक तर म्हणतील, 'मी सुरतला जाऊन आलो.' अरे, गाडी सुरतला गेली की तू गेला? मग म्हणतो 'मी थकलो!' त्या ऐवजी गाडी सुरतला गेली, सुरत आले आणि मी उतरलो, असे म्हटले तर थकवाही येणार नाही. 'मी करतो' ही भ्रांती आहे. कर्तापद हे भ्रांतीपद आहे, असे तुम्हाला कधीच समजले नाही का?

**प्रश्नकर्ता :** नाही समजले.

**दादाश्री :** कर्तापद पूर्णपणे भ्रांतीपद आहे. जर कर्तापद कधी

असते ना, तर दाढी वगैरे सर्व मनासारखे केले असती. आणि डोक्यावर वैराण (टक्कल) तर कोणी होऊच दिले नसते ना? डोक्यावर 'माथेरान', म्हणजे डोक्यावर केसांचे रानच होऊ देतील, परंतु इथे तर काही ठिकाणी रान झाले आहे आणि काही ठिकाणी वैराण झाले आहे. स्वत:च्या हातात सत्ता नाहीच. एक दाढ जरी दुखत असेल तरी आरडाओरडा करतो.

## भावानुसार फळ मिळते

आपल्या हातात एकमात्र भाव करण्याशिवाय दुसरी कुठलीच ताकद नाही. आपला भाव देखील व्यक्त होता कामा नये. भाव केला म्हणजे त्यामागे अहंकार आहेच. फक्त स्वत:ला मोक्षाला जाण्यासाठी लागणाऱ्या अहंकाराशिवाय अन्य कुठल्याही प्रकारचा अहंकार करण्यासारखे नाही. जगत्कल्याणाचाही अहंकार करण्यासारखा नाही. सर्व निमित्तच आहेत. कुणी कर्ता नाही. निमित्त का म्हणायचे? निमित्त कसे बनतात? कोणी भाव केला की 'मला सगळ्यांना सरळ करायचे आहे', तर त्याचा भाव निसर्गात जमा होतो, नोंदला जातो. मग जेव्हा सरळ करण्याची वेळ येते तेव्हा निसर्ग त्या भाव करणाऱ्या निमित्ताजवळ सगळे संयोग एकत्र करून देतो. आणि त्या भाव करणाऱ्या माणसाचे त्या भावानुसार सर्व होऊन जाते.

जग भाव आणि अभाव करतच असते. भाव-अभावच राग-द्वेष आहेत. आम्ही स्वरूपज्ञान देतो, त्यानंतर तुम्हाला भावाभाव होत नाहीत, आम्ही दोन्ही बंद करतो. पण पूर्वीचा जो भाव आहे, तो फुटतो तेव्हा तुम्हाला वाटते की हा असा भाव का होत आहे? वास्तवात तो भाव नाही, ती इच्छा आहे.

## भाव आणि इच्छा, यात काय फरक?

**प्रश्नकर्ता :** भाव कशाला म्हणावे?

**दादाश्री :** खरा भाव कशाला म्हणतात? तर जो दिसतो तो नाही, तर आत योजना आखल्या जातात त्याला भाव म्हणतात. आणि तो पुढील जन्मात रूपकात (प्रत्यक्षात) येतो. भावामुळे योजना बनते, पण स्वत:ला ते कळत नाही.

**प्रश्नकर्ता :** इच्छा म्हणजे काय? मनुष्याला इच्छा का होते?

**दादाश्री :** इच्छा तर ज्वारीला कणीस यावे यासारखे आहे. बीज पडले असेल तरच असे होते. ज्या गोष्टीचा आपल्याला भाव असतो, त्याची इच्छा उत्पन्न होते. इच्छा हा परिणाम आहे आणि भाव कॉजेस आहेत. सर्व इच्छा इफेक्ट आहेत. आपण ठाम ठरविले पाहिजे की मला जगातील कुठलीही वस्तू नको आहे, ज्यामुळे आत सील (पूर्णपणे बंद) होऊन जाईल. स्वरूपज्ञान झाल्यानंतर ज्या इच्छा होतात, त्या इफेक्ट आहेत. आणि सर्व इफेक्टस भोगाव्या लागतात.

## संयोगांचे मूळ, भाव

**प्रश्नकर्ता :** संयोग आणि भाव यात काय फरक आहे?

**दादाश्री :** खूप फरक आहे. संयोग स्थूल वस्तू आहे आणि भाव तर फार सूक्ष्म वस्तू आहेत. तरी पण भावांना देखील संयोगच म्हटले जाते.

म्हणूनच महावीर भगवंतांनी म्हटले, 'शेषा मे बाहिराभाव सव्वे संजोग लख्खणा' बाकी सर्व बाह्यभाव आहेत. त्यांना कसे ओळखावे? तर संयोग एकत्र होतात त्यावरून, त्यांच्या लक्षणांवरून ओळखले जाते की माझे बाह्यभाव कशा प्रकारचे होते.

हे जे तुम्ही मला भेटलात ते कुठल्याप्रकारचे बाह्यभाव केल्यामुळे?

**प्रश्नकर्ता :** सत्संगाचे.

**दादाश्री :** म्हणूनच हा सत्संगाचा संयोग आला आणि दारु पिण्याचा बाह्यभाव केला असता तर?

म्हणजेच भावाच्या आधारावर आपल्याला संयोग जुळतो. हा जो संयोग जुळला आहे तर 'मी काय भाव केला असेल?' याचा शोध घेऊन त्याला मूळापासूनच उपटून काढतात. 'ज्ञानी' भावावरून मूळ शोधून काढतात आणि त्या मूळाला उपटून काढतात.

## भाव वेगळे-विचार वेगळा

**प्रश्नकर्ता :** भाव निर्माण होतात आणि विचार येतात, यात काय फरक आहे?

**दादाश्री :** जगातील लोकांची भाव याबद्दलची जी समजूत आहे, तशी वस्तुस्थिती नाही. मला जिलबीवर खूप भाव आहे, असे म्हणतात, म्हणजे भाव शब्दाचा प्रयोग कुठेही करतात. खरे तर भाव डोळ्यांनी पाहता येत नाहीत. लोक ज्याला भाव म्हणतात त्या तर इच्छा आहेत.

विचार आणि भाव यांचे काही देणेघेणे नाही.

**प्रश्नकर्ता :** विचार येणे आणि भाव उत्पन्न होणे, यात डिमार्केशन (फरक) करता येत नाही.

**दादाश्री :** जे विचार येतात, ते सर्व डिस्चार्ज स्वरूप आहेत आणि भाव चार्ज आहेत. स्वत: जर ज्ञानात राहत असेल तर कितीही विचार आले तरी हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** या जन्मात जे भाव होतात, त्याचे याच जन्मात फळ मिळते?

**दादाश्री :** नाही. किती तरी गोष्टी एकत्र आल्यावर भाव द्रव्य स्वरूपात येतो. भावाचे द्रव्य स्वरूप होता होता तर किती तरी टाईम लागतो. कर्माचा परिपाक झाला की फळ मिळते.

आपण दूध घेऊन आलो, म्हणजे खीर तयार झाली असे म्हणता येणार नाही. तर चूल पेटवावी लागेल, पातेले ठेवावे लागेल, दूध ढवळत राहावे लागेल, तेव्हा खीर बनेल.

## किंमत, भावाचीच

संसारात वस्तू बाधक नाही. तुमचे भाव बाधक आहेत. भगवंतांनी सांगितलेले की द्रव्य असेल तर भाव उत्पन्न होईल. पण असे चांगल्या काळात होत असे. दान देताना मनात उल्हास असायचा की 'असा संयोग पुन्हा येवो.' आणि या काळात तर द्रव्य वेगळे आणि भाव वेगळा. दान

देताना आत भाव असा असतो की 'मी तर दान दिलेच नसते, पण नगरशेठच्या दबावामुळे मी दिले.' म्हणजे मन वेगळे, वाणी वेगळी आणि वर्तन वेगळे. म्हणूनच अधोगतीचा पाया रचतात. अशी कावेबाजी आहे म्हणून.

भगवंताच्या दर्शनाला जातात तेव्हा दर्शनाबरोबरच चपला आणि दुकानांचेही दर्शन करतात! द्रव्य भगवंताकडे आणि भाव चपलांकडे किंवा दुकानांकडे! भगवंत काय म्हणतात की द्रव्यानुसार तुझा भाव नसेल तर तू धर्म केलाच नाही, आणि तरी मी 'धर्म करतो' असे मानणे यालाच प्रपंच म्हणतात. त्यामुळे भयंकर अधोगतीत जाशील. वीतरागांच्या मार्गात कोणाचा थोडासाही घोटाळा चालत नाही.

भावाचीच तर किंमत आहे. सध्या भावपूर्वक काही होतच नाही ना? भजी बनविली पण भावपूर्वक बनविली असतील तर त्याची किंमत फार उच्च आहे. लोकांनादेखील भाव ओळखता येत नाही. हे लोक तर अभावपूर्वक चांगले भोजन दिले तरी चवीने खातात. आणि भावपूर्वक भाकरी दिली तर तोंड वाकडे करतात. खरे तर भावपूर्वक दिलेली भाकरी पाण्याबरोबर सुद्धा खावी. आम्ही तर भावपूर्वक दिलेले विषही पिऊन टाकू! किंमत भावाला आहे. भावपूर्वक व्यवहार चालेल तर सत्‌युगच आहे. मालक-नोकर भावपूर्वक राहतील तर किती छान वाटेल! भाव तर राहिलाच नाही. अरे, हे मंत्र जरी भावपूर्वक म्हटले तरी चिंता जातील, असे आहे. भावक्रिया, ही जिवंत क्रिया आहे, मग भले ती निश्चेतन चेतनाची असेल. आणि भावरहित क्रिया, ही मृत क्रिया आहे.

कोणाला भोजन दिले, या जैन साधूंना भोजन दिले तर भावपूर्वक द्यायला हवे. कित्येक लोक तर साधू महाराजांना भावपूर्वक देतही नाहीत. साधू महाराज तर वीतराग भगवंताच्या मार्गातील आहेत. तेव्हा त्यांना सांभाळून घेतले पाहिजे ना! आत आत्मा आहे. त्यांना लगेच समजते की हा भावपूर्वक देत आहे, विनयपूर्वक देत आहे की नाही. आपल्या घरी सोईचे नसेल तर अतिथीला भाजी-पोळी खाऊ घाला, पण भाव बिघडू देऊ नका. व्यवहार तर उच्च असला पाहिजे ना? क्रमिक मार्गात या भावाचीच किंमत उच्च मानली गेली आहे.

'आपल्याकडून कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख होऊ नये.' एवढेच वाक्य जरी समजले तरी खूप झाले.

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत कुठल्याही जीवाला दु:ख न देता जीवन जगणे हे खूप कठीण आहे.

**दादाश्री :** कठीण आहे म्हणून असे तर म्हणता येणार नाही ना की दुसऱ्यांना दु:ख देऊनच मला जगायचे आहे. तुमची भावना तर अशीच असायला हवी की मला कोणालाही दु:ख द्यायचे नाही. आपण भावनेसाठी जबाबदार आहोत, क्रियेसाठी नाही.

## प्रतिपक्षी भाव

सर्व जग प्रतिपक्षी भावनेतून कर्म बांधते. स्वरूपज्ञानीला प्रतिपक्षी भाव नसतात. परिणाम होतो पण कर्म बांधले जात नाही! आणि जेव्हा पराक्रम उभा राहतो तेव्हा तर परिणामही होत नाही. परिणाम होतो म्हणजे कोणी शिवी दिली तर 'हा मला असे बोललाच का?' असे वाटते. पण पराक्रम काय म्हणतो की, 'तुझी चूक असेल म्हणूनच तो बोलला आणि नुकसान झाले तर व्यापार करता येत नाही म्हणून नुकसान झाले.' याप्रकारे स्वत: स्वत:शीच वार्तालाप केला तर स्वत:ची ओळख होते, परिचय होतो. 'स्वत:'च्या गादीवर, शुद्धात्म्याच्या गादीवर बसण्याचा परिचय होतो. हे तर गादीवरून लगेच उठतात! अनादिकाळाचा परिचय आहे म्हणून, आणि भोगणे अजून बाकी आहे म्हणून!!

तुमच्या चुकीमुळे, पाप जागे झाले (उदयास आले) की हा वर फिरणारा पंखा तुमच्या अंगावर पडतो. हिशोब तुमचाच आहे.

मन बिघडणे कशाला म्हणतात? फक्त मनच नाही तर संपूर्ण अंत:करण बिघडते. संपूर्ण पार्लमेंटचा प्रस्ताव पास झाला की प्रतिपक्षी भाव उत्पन्न होतो. 'समोरच्याला असे करू, तसे करू' असे वाटते. म्हणजे हे फक्त मनामुळेच नाही. मन तर ज्ञेय आहे, वीतरागी स्वभावाचे आहे. मन बिघडले तर प्रतिक्रमण करावे. अंत:करणाच्या पार्लमेंटचा प्रस्ताव होणे आणि मन बिघडणे, या दोन वेगळ्या गोष्टी आहेत.

ऑफिसात परमिट घेण्यासाठी गेले, पण साहेबाने दिले नाही तर मनात येते की 'साहेब नालायक आहेत, असे आहेत, तसे आहेत'. आता त्याचे फळ काय मिळेल, हे त्याला माहीत नसते. म्हणून हा भाव बदलून टाकावा, प्रतिक्रमण करून घ्यावे. याला आम्ही जागृती म्हणतो.

कोणत्याही देहधारीबद्दल वेडेवाकडे बोलले गेले, तर ते टेप होऊनच जाते. कोणी थोडेसे जरी छेडले तरी प्रतिपक्षी भावाची रेकॉर्ड वाजल्याशिवाय राहतच नाही.

**प्रश्नकर्ता :** तसा भावही उत्पन्न होता कामा नये ना?

**दादाश्री :** तुम्ही कोणाला छेडले तर समोरच्याला प्रतिपक्षी भाव झाल्याशिवाय राहणारच नाहीत. समोरचा बलवान नसेल तर बोलणार नाही, पण त्याच्या मनात तर राहील ना? तुम्ही बोलणे बंद केले तर समोरच्याचे भाव बंद होतील.

आम्हाला कुठल्याही संयोगात प्रतिपक्षी भाव उत्पन्न होत नाहीत. कधी ना कधी या स्टेजवर आल्याशिवाय गत्यंतरच नाही.

आमच्या डोळ्यात इतर कुठलेही भाव दिसत नसतात, म्हणून तर लोक दर्शन करतात. कोणत्याही प्रकारचा वाईट भाव डोळ्यात वाचला जाता (दिसता) कामा नये. तेव्हा ते डोळे पाहिल्याबरोबरच समाधीचा अनुभव येतो! ज्याला काही हवे आहे, मानपान-क्रोध-लोभ-मोह, तर त्यांच्याकडे पाहून उल्हास वाटत नाही.

## भावाचा फॉर्म

तुमचा भाव हजर असला पाहिजे. मग दुसरे सर्व एविडेन्स एकत्र येतील. तुमचा भाव हजर नसतो, त्यामुळे काही एविडेन्स वाया जातात.

तुम्हाला लग्न करायचे असेल तर लग्न करण्याचा भाव हजर ठेवा, आणि लग्न करायचे नसेल तर न करण्याचा भाव हजर ठेवा. जसा भाव हजर ठेवाल तसे संयोग एकत्र होतील. कारण भाव हजर असणे हा 'वन ऑफ द एविडेन्स' (अनेक संयोगातील एक संयोग) आहे.

म्हणजे हे कसे आहे? एखादा आळशी शेतकरी असेल आणि तो शेतात गेलाच नसेल, बी पेरलेच नसेल, तर मग पाऊस काय करील? पाऊस तर पडेल पण शेतकऱ्याला त्याचा काहीच फायदा होणार नाही. आणि दुसऱ्या एखाद्या शेतकऱ्याने बीजे पेरुन ठेवली असतील तर पाऊस पडताच लगेच ती उगवतील.

**प्रश्नकर्ता :** ज्याचा एकच भाव असेल, भाव बदललाच नसेल, तरी पण त्याला संयोग जुळले नाहीत तर त्याचा भाव नष्ट होतो का?

**दादाश्री :** हो, असेही घडते. असे कधी तरीच घडते. तो भाव पूर्वीचा कच्चा भाव म्हटला जातो, डगमग भाव म्हटला जातो. नाही तर असे होणार नाही. जसे सडलेले बी पेरले तर ते उगवत नाही, तसेच कच्च्या भावाचे होते. ते आपल्याला समजते. तो डळमळीत भाव असतो. 'बी पेरू की नको? बी पेरू की नको?' असे वाटत राहते. असे कधीतरीच होते.

आणि ही तर मुख्य गोष्ट सांगितली की आपण आपला भाव ठेवला पाहिजे, तर मग त्यानुसार सर्व मिळेल. आपल्याला दुकान टाकायचे असेल तर ठरवले पाहिजे की मला दुकान टाकायचे आहे. मग संयोग आज, नाही तर सहा महिन्यांनी तरी येतीलच. परंतु आपण तयारी ठेवली पाहिजे, भाव तयार ठेवला पाहिजे. आणि बाकी सर्व 'व्यवस्थित शक्ती'च्या सत्तेत आहे.

नवीन भाव आपण उत्पन्न करायचा नाही. नवीन भाव तर आत्म्याला होतच नाही ना! आत्मा प्राप्त झाल्यावर आपली भावकर्मे बंद होतात. हे तर पूर्वीचे भाव आहेत, त्यांना भूतभाव म्हणतात, भूतभाव येतात आणि कार्य होऊन जाते आणि त्याचा आपण निकाल करून टाकतो. आणि भावी भाव तर आपण करत नाही. वर्तमान भाव तर आपला स्वभाव भावच असतो, तो आहे! इंद्रियज्ञान सर्व भावना उत्पन्न करते आणि अतीन्द्रियज्ञान भावना उत्पन्न करीत नाही. शुद्धात्मा भावना उत्पन्न करीत नाही.

## भावच मुख्य एविडेन्स

अज्ञानदशेत आत्मा भावस्वरूप आहे, भावात्मा आहे. आणि

ज्ञानदशेत ज्ञानात्मा आहे. भावात्म्याजवळ फक्त भावसत्ताच असते, त्याचाच तो उपयोग करतो. इतर काही करत नाही. केलेले भाव निसर्गात जातात. मग निसर्ग, पुद्‌गलमिश्रित होऊन त्याचे फळ देतो. हे खूप गूढ शास्त्र आहे. तुम्ही एक खराब विचार केला की लगेच बाहेरचे परमाणू आतील परमाणूंशी हिशोब जुळवून जॉइंट होऊन आत दाखल होतात. आणि तो हिशोब जुळतो आणि तसेच फळ देऊन जातो, असेच काही जात नाही. यात आत्मा काहीच करीत नाही. आणि बाहेर असा कोणी ईश्वर नाही की जो तुम्हाला फळ देण्यासाठी येईल. ही 'व्यवस्थित शक्ती'च तुमचे सर्व चालवते. त्यात आत्मा काहीच करत नाही, आत्मा खात नाही, पीत नाही, भोग भोगत नाही, फक्त भावाचा कर्ता आहे. आत्मा स्वभावाचा कर्ता झाला तर काही हरकत नाही. पण इथे तर विभावाचा कर्ता आहे, म्हणून संसार उभा राहिला आहे. स्वभावाचा कर्ता झाला की मोक्ष होतो.

शंभर राण्या असतील, पण राजाला आत भाव उत्पन्न होऊ लागले की मला तर ब्रह्मचर्याचाच भाव ठेवला पाहिजे, हे अब्रह्मचर्य असता कामा नये, असा विचार करत करत भावस्वरूप झाला, तर पुढच्या जन्मात किती सुंदर ब्रह्मचर्य लाभेल! ब्रह्मचर्याचे पालन करणे हे स्वत:च्या हातात नाही. परंतु भाव केला आहे, त्याचे फळ येईल.

तीर्थंकरांना ज्ञान झाल्यावर अंतिम भाव उत्पन्न होतो, जगत्‌कल्याण करण्याचा. स्वत:चे कल्याण झाले, आता दुसऱ्यांचे कल्याण कसे होईल, असे भाव उत्पन्न होतात. भावाच्या फळ स्वरूपात भावात्मा तसाच होतो. प्रथम भावात्मा तीर्थंकर बनतो, मग द्रव्यात्मा तीर्थंकर बनतो. ते सुद्धा निर्विकल्पाचे फळ नाही, तर विकल्पाचे फळ आहे, भावाचे फळ आहे.

**प्रश्नकर्ता :** आपल्यासारखे योगी पुरुष या सर्व सूक्ष्म परमाणूंच्या क्रिया पाहू शकतात?

**दादाश्री :** पाहू शकतात, म्हणून तर हे पझल सॉल्व्ह होऊ शकते. नाही तर हे पझल कुठल्याही तऱ्हेने सॉल्व्ह होऊ शकणार नाही.

लोक म्हणतात की यांनी त्याला पॉइजन (विष) दिले म्हणून हा माणूस मेला. पण हे खरे नाही. प्रथम अंत:करणात पॉइजन दिले जाते. हे सूक्ष्म स्वरूपातील पॉइजन आहे आणि ते स्थूल स्वरूपातील पॉइजन आहे. प्रथम आत क्रिया होते आणि मग बाहेर होते. आपण जे जेवण जेवतो त्याबाबत आपण रोज असे सांगत नाही की हेच जेवण बनवा, आणि सांगितले तरी त्यानुसार सर्व होतही नाही. हे तर आतील परमाणू जे मागत असतात ते बाहेर 'व्यवस्थित शक्ती' मिळवून देते. हे सर्व 'व्यवस्थित' च्या अनुसारच प्रबंधित होत असते. आत जेव्हा कडू रसाची गरज असेल तेव्हाच कारल्याची भाजी मिळते. तेव्हा हे दुर्देवी ओरडतात की 'आज कारल्याची भाजी का केली?' हेही विज्ञान आहे.

आम्ही म्हटले, 'माइंड इज इफेक्टिव, स्पीच इज इफेक्टिव, बॉडी इज इफेक्टिव (मन परिणामकारक आहे, वाणी परिणामकारक आहे, शरीर परिणामकारक आहे) तर आता हे परिणामकारक कसे बनतात? यावर तर खूप, खूप विचार आले पाहिजेत.

आपल्याला दु:ख होते तो मनाच्या परमाणूंचा इफेक्ट (परिणाम) आहे. त्यात कोणाचा दोष नाही. फक्त इफेक्ट आहे. बाहेरून कोणी दु:ख देत नाही. बाहेरचे तर फक्त निमित्त आहेत. प्रथम आत होते, तरच मग बाहेर होते. म्हणून आम्हाला अंतरंगावरून समजते की थोड्या वेळाने असे होणार आहे. आम्हाला तसे दिसते.

एवढे तर तुम्हाला समजते ना की विष खाण्यामुळे माणूस मरतो, त्यात ईश्वराची गरजच नाही. त्याला मारण्यासाठी ईश्वराला यावे लागत नाही. हे परमाणूच मारतात. खरे तर मारणारे आतच असतात. पण स्थूलमध्ये दिसले नाहीत तर जग चालणारच नाही ना! ही जी भ्रांती आहे ती सर्व स्थूलमुळेच आहे! स्थूल विष तर चांगला, डॉक्टर उल्टी करवून काढून टाकतो, परंतु सूक्ष्मात असेल तर कितीही उल्टी करवून घेतली, तरी माणूस मरतोच. हे विज्ञान जाणून घेण्यासारखे आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जे काही आपल्याला मिळते, ते आधीच सूक्ष्म रुपात पडलेले असते, म्हणूनच मिळते?

**दादाश्री :** मग आणखी कोण देणारा आहे? तुम्हाला एवढी भाजी वाढली तरी दोन फोडी तरी ताटात उरतातच ना? त्याचे कारण काय? अरे, एक दाणा तरी ताटात पडून राहतो की नाही? आत जितका हिशोब असेल तेवढेच खाल्ले जाईल. बाकी सर्व परके!

आपण चांगले भाव केले तर त्याची चांगली फळे मिळतात व वाईट भावाची वाईट फळे मिळतात. आणि भावाभाव केला नाही आणि 'मी शुद्धात्मा आहे' असे झाले, की कर्ता बंद झाला. मग जुनी (कर्मे) फळ देऊन निघून जातात आणि नवीन येत नाहीत. हे विज्ञान आहे, धर्म नाही.

जोवर विज्ञानात येत नाही तोवर योग्यता प्राप्त करण्यासाठी धर्म आहे. नाही तर विज्ञान हे विज्ञान आहे, ते थेट मुक्ती देते!

## द्रव्य-भाव

**प्रश्नकर्ता :** भाव उच्च आहे की द्रव्य?

**दादाश्री :** भाव श्रेष्ठ आहे असे भगवंतांनी म्हटले आहे. द्रव्य उलटे सुद्धा असू शकते, ते पाहिले जात नाही, भावच पाहिला जातो.

द्रव्य-भाव समजणे खूप कठीण आहे. हा जो भोवरा फिरतो, त्याची दोरी उलगडत जाते, ते द्रव्य आहे आणि दोरी पुन्हा लपेटली जाते तो भाव आहे.

शुद्धात्म्यामध्ये कोणत्याही प्रकारचा भाव नाही. 'प्रतिष्ठित आत्म्या'च्या भावाला भाव म्हणतात. प्रतिष्ठित आत्मा तर ज्ञानी आणि अज्ञानीला देखील असतो. ज्याला स्वरूपज्ञान झालेले नाही, त्याच्या मनावर 'मला प्रतिक्रमण करायचेच आहे' असा दृढ परिणाम झाला असेल, आणि त्याने तो भाव दृढ केला तर द्रव्य उत्पन्न होते आणि द्रव्यातून भाव उत्पन्न होतात.

**प्रश्नकर्ता :** भावमन आणि द्रव्यमन म्हणजे काय?

**दादाश्री :** प्रतिष्ठित आत्म्याने (भाव) केले की भावमनाची

सुरुवात होते आणि त्यातून मग द्रव्यमन रूपकात येते. लोक जे भावाभाव म्हणतात ते तर प्रतिष्ठित आत्म्याचे आहेत. शुद्धात्म्याला भाव होतच नाहीत. जे दिसते ते सर्व डिस्चार्ज आहे. चार्ज तर दिसतच नाही, कळतही नाही. भाव शोधून मिळेल असे नाही. फार थोडे लोक भाव समजू शकतात. पण मग ते हे शुद्धात्माचे भाव आहेत असे समजतात, त्यामुळे गडबड होते.

ज्ञानाशिवाय भाव समजू शकेल असे नाही. भाव तर अत्यंत गहन, गहन, गहन-असे लाख वेळा गहन म्हटले तरी त्याच्या गहनतेचा अंत येईल असे नाही.

कोणी म्हटले की, मी हे कार्य करण्यासाठी खूप भाव केले आहेत. त्याला भगवंत काय म्हणतात? ते मनाचे दृढ परिणाम आहेत. त्याला भाव म्हणत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** द्रव्यभाव म्हणजे काय?

**दादाश्री :** जे स्वतः धर्म करतात त्यांची बीजे पडतात. म्हणून गणधरांनी म्हटले की द्रव्यभाव करा. पण या काळात द्रव्य वेगळे आणि भावही वेगळे असतात. व्याख्यान ऐकायला बसला असेल, त्या द्रव्याला फार पुण्यशाली म्हटले जाते, पण तिथे बसल्याबसल्या तऱ्हेतऱ्हेचे भाव करतो की असा फायदा करीन, तसे करीन, वगैरे. पूर्वीच्या काळात द्रव्यभाव खरा असायचा. जसे द्रव्य तसा भाव. कोणाला पट्टी बांधताना तो त्यात एकाकार व्हायचा. याला द्रव्यभाव भरला असे म्हटले जाते. परंतु आजचे लोक तर पट्टी बांधतात, पण मनात विचार करतात यात मी का अडकलो? द्रव्यभावासहितचे वर्तन, हे खरे बीज टाकते.

द्रव्यकर्म म्हणजे फळ प्राप्त होणे आणि भावकर्म म्हणजे बीज टाकणे. द्रव्यातून भाव आणि भावातून द्रव्य असे चालतच राहते.

चोरी करताना चांगला भाव ठेवला तर पुण्यफळ प्राप्त होते. म्हणजे असा भाव केला की 'मला का चोरी करावी लागते आहे?' तर त्याने पुण्य बांधले जाते.

सामायिक करतो, पण मग वाळूचे घड्याळ पाहत राहिला तर उलटे भावबीज पडेल.

तू जी द्रव्यक्रिया करतोस, ती तर 'व्यवस्थित शक्ती' करवित आहे, त्यात तुझे काय? भगवंत म्हणतात 'आम्ही द्रव्यक्रियेकडे लक्ष देत नाही.' या काळात द्रव्याचे काही सांगता येत नाही, म्हणून सरळ भाव केला तर पुढे जाता येईल.

## भावमन : प्रतिष्ठित आत्मा

**प्रश्नकर्ता :** भावमनालाच आत्मा म्हणतात?

**दादाश्री :** भावमनाला आत्मा म्हटले तर मग भटकावेच लागेल ना? क्रमिक मार्गात भावमनालाच आत्मा म्हटले आहे आणि आपल्याकडे, अक्रममध्ये भावमन आणि द्रव्यमन दोन्हीही संपवून टाकली आहेत.

**प्रश्नकर्ता :** भावमन म्हणजे 'प्रतिष्ठित आत्मा'च ना?

**दादाश्री :** भावमन म्हणजे प्रतिष्ठित आत्मा नाही. भावमनातून नवा प्रतिष्ठित आत्मा उत्पन्न होतो. द्रव्यमन, हे खरे तर प्रतिष्ठित आत्मा आहे. द्रव्यमन म्हणजे डिस्चार्ज-मन आणि भावमन म्हणजे चार्ज-मन.

सर्व जग द्रव्याला तोडत राहते, म्हणजेच क्रियांमध्ये बदल करतात. आपल्या अक्रम विज्ञानाने तर द्रव्य आणि भाव, दोन्हींना बाजूला सारून ठेवले आहे, क्रम वगैरे काहीच नाही, सरळ-डायरेक्ट एका तासातच समकित होऊन जाते. नाही तर लाखो जन्मांतही समकितचा पत्ता लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** त्यात फळाचा अनुभव तर येतोच ना?

**दादाश्री :** अनुभव आला नाही तर काही कामाचाच नाही. आपण साखर तोंडात ठेवली तर अनुभव व्हायलाच हवा. 'साखर गोड आहे' असे वाचत राहिल्याने अनुभव येत नाही. 'मी आत्मा आहे, मी आत्मा आहे', असे म्हटल्याने काही होत नाही. आत्म्याचा अनुभव प्रतिक्षण होत असेल तरच ते कामाचे.

**प्रश्नकर्ता :** अनुभव आल्यावर रटण्याची गरज आहे का?

**दादाश्री :** रटण्याची, किंवा काही करण्याचीही गरज नाही. अक्रम विज्ञान समजून घेण्याची गरज आहे. एकदा समजून घेतले की मग कायमची मुक्ती होते. नवीन कर्म चार्ज होणार नाही, असे हे विज्ञान आहे.

द्रव्यमन पूर्णपणे फिजीकल आहे आणि भावमन भ्रांतीतून उत्पन्न होते. भ्रांती आहे तोपर्यंत भावमन आहे. मागील जन्मांची भावकर्मे या जन्मात द्रव्यकर्मांचे आठ चक्षू (आवरण) आणतात. त्या चक्षूंच्या आधारे भाव केला जातो, भावाच्या आधारे पुद्‌गल परमाणूंना पकडते आणि मग त्याचा परिणाम द्रव्यरूपात होतो. हे पूर्ण विज्ञानच आहे.

**प्रश्नकर्ता :** जीवनाच्या अंतिम क्षणातील भावाच्या आधारे पुद्‌गल परमाणूंना पकडते?

**दादाश्री :** लगेच पकडते. हा जो भाव केला तो भ्रांतीभाव आहे. स्वभावभाव नाही. बाहेर जे शुद्ध परमाणू आहेत त्यांना विश्रसा म्हटले जाते. मनात भ्रांतीभाव झाल्यावर ते प्रयोगसाच्या प्रवाहात येतात आणि जेव्हा परिणमित होतात तेव्हा मिश्रसा होतात, ते मग कडू-गोड फळे देऊन जातात. आता हा देह मिश्रसा परमाणूंचा बनलेला आहे. ते (परमाणू) परिणाम करून जातील. आत्म्याचे लक्ष बसले, स्वभावभावात आला की मग नवीन बीजे पडत नाहीत.

कर्मांचे उदय कोणालाच सोडत नाहीत. 'व्यवस्थित'च्या जाळ्यात अडकल्यावर चारी बाजूंनी चिमटे बसतात, सरकमस्टेन्सेसचे चिमटे बसतात. मनाला जे आवडते त्यात रुची उत्पन्न होते. स्वतःला आवडत नाही पण मनाला तर आवडते ना? म्हणून त्यात स्वतः तन्मयाकार होतो. मनाचा स्वभाव असा आहे की जोपर्यंत त्याच्या मनासारखे होत नाही, तोपर्यंत त्याला संतोष होत नाही, आणि मनासारखे झाले की संतोष होतो. संसाराच्या एक्झिबीशनमध्ये प्रवेश करण्यासारखे नाहीच.

## प्रतिभाव

**प्रश्नकर्ता :** प्रतिभाव कशाला म्हणतात?

**दादाश्री :** तुम्ही काही चुकीचे बोललात आणि नंतर तुम्हाला

आतून असे वाटले की 'हे चुकीचे झाले आहे, असे बोलायला नको होते', त्याला प्रतिभाव म्हणतात. तुम्ही जे बोलता, त्यासाठीच तुम्ही 'असे बोलता कामा नये', असा जो भाव करता त्याला प्रतिभाव म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जागृतीच प्रतिभाव आहे ना?

**दादाश्री :** आत जागृती असेल तर प्रतिभाव होतो. गोळी सुटल्यावर मनात येते की 'सोडायला नको होती.' हा प्रतिभाव आपला पुरुषार्थ मानला जातो.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानींना कसे प्रतिभाव असतात?

**दादाश्री :** आम्हाला प्रतिभाव होत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** या गोळी सुटण्याच्या घटनेत ज्ञानींना काय वाटते? आतील परिणती कशी असते?

**दादाश्री :** निसर्गत:च आत गोळी सुटतच नाही. मग भाव करण्याचा प्रश्नच राहत नाही. आणि छोट्या छोट्या गोळ्या सुटल्या तर त्यांना पाहत राहतात की, 'अहोहो! हे फटाके फुटत आहेत.' त्यांना भाव म्हणत नाहीत. आत शरीरात तर खूप प्रकारच्या गोळ्या फुटत राहतात, त्यांना भाव म्हणत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** डिस्चार्जमध्ये तन्मयाकार झाला तर मग दुसरे भाव पडतात ना?

**दादाश्री :** हो, ही सर्व जोखीम तर आहेच ना? प्रतिक्रमण केले की शुद्ध होते. प्रतिक्रमण करणे हा देखील परभाव आहे. त्याने पुण्य बांधले जाते, तो स्वभाव नाही. पुण्य बांधले जाते, पाप बांधले जाते, हे सर्व परभाव आहेत. जेवढा समभावाने निकाल झाला, तेवढा कमी झाला.

म्हणजे अज्ञानीला प्रतिभाव होत नाहीत. कारण त्याला जागृतीच नसते ना, की हे चुकीचे होत आहे. 'ज्ञानीं'ना देखील प्रतिभाव होत नाहीत कारण त्यांना भावच उत्पन्न होत नाहीत, मग प्रतिभाव कसे

होतील? ती संपूर्ण जागृतीची निशाणी आहे. आणि ज्यांना सम्यक्‌दर्शन झाले आहे, अशा जागृत महात्म्यांना प्रतिभाव होतात, चुकीचे भाव झाले की जागृती त्यांना लगेच दाखविते आणि त्यांच्यासमोर प्रतिभाव उत्पन्न होतात.

## स्वभाव - स्वक्षेत्र : परभाव - परक्षेत्र

**प्रश्नकर्ता :** जेव्हा पाहावे तेव्हा आपण असेच्या असेच दिसता. काहीच फरक वाटत नाही, ते काय आहे?

**दादाश्री :** हे काय फूल आहे की जे कोमेजून जाईल? इथे तर आत परमात्मा प्रकट होऊन बसले आहेत! नाही तर जर्जर दिसलो असतो. जिथे परभावाचा क्षय झालेला आहे, निरंतर स्वभाव जागृती आहे, परभावाबद्दल ज्यांना किंचितही रुची राहिली नाही, एका अणू-परमाणू एवढीही रुची राहिली नाही, मग आणखी काय पाहिजे?

परभावाच्या क्षयाने आणखी जास्त आनंद अनुभवास येतो. आणि तुम्हीही त्या क्षयाकडे दृष्टी ठेवा. जितका परभाव क्षय झाला तेवढा स्वभावात स्थिर झाला. बस, एवढेच समजण्यासारखे आहे. दुसरे काही करण्यासारखे नाही. जोपर्यंत परभाव आहे, तोपर्यंत परक्षेत्र आहे. परभाव गेला की स्वक्षेत्रात थोडा काळ राहून मग सिद्धक्षेत्रात स्थित होतो. स्वक्षेत्र हा सिद्धक्षेत्राचा दरवाजा आहे.



# [ 38 ]
# ‘स्व’मध्येच स्वस्थता

## अवस्थेत अस्वस्थ

**प्रश्नकर्ता :** मिथ्यात्वाची व्याख्या काय?

**दादाश्री :** मिथ्यात्व म्हणजे अवस्थेत तन्मयाकार होणे, त्याचे फळ काय? तर अस्वस्थता. आणि सम्यक्‌दर्शनाची व्याख्या काय आहे? तर स्वस्थ. ‘स्व’मध्ये मुक्काम करणारे अवस्थेत मुक्काम करत नाहीत. ते अवस्थेला निकाली म्हणतात आणि त्यांचा ‘स्व’ मध्येच निराकूल मुक्काम असतो. निराकूलता सिद्ध भगवंतांचा स्वगुण आहे. आपले विज्ञान इतके सुंदर आहे की तुम्हाला काहीच विचार करावा लागत नाही. निकाल म्हटले की सुटले!

संपूर्ण जग अवस्थेत राहते, अवस्थेतून बाहेर पडता येत नाही. अवस्थेत राहणाऱ्याला तर रात्रंदिवस अस्वस्थता असते. गाडीत जागा मिळाली नाही तरी देखील आत बैचेनी-बैचेनी वाटते. अरे, त्यात बैचेन कशाला व्हायचे? म्हण ना की माझ्या कर्मांचा उदय असा आहे. अरे, गाडीत बसलेल्या लोकांकडे बघत बसतो की आता कोणी उभा होत आहे का!!

मिथ्यात्वीची समज कशी असते? तो अवस्थेतच तन्मयाकार असतो. गरीबीची अवस्था उत्पन्न झाली तर गरीबीत, श्रीमंती मिळाली

तर त्यात तन्मयाकार होतो, छाती फुगवून चालतो! ताप भरला तर त्यातही तन्मयाकार होतो, आणि म्हणतो मला चालवत नाही. माझ्यासारखा कोणी म्हणेल की 'याच्या मागे वाघ सोडा.' मग तो धावेल की नाही? चालवत नाही, चालवत नाही असे म्हणून तर उलट कमजोर होतो. जसे बोलेल तसा तो होतो. कारण आत्म्याचा स्वभाव कसा आहे की जसे बोलेल तसा तो होतो. मग पाय समजतात की आपण चाललो नाही, तरी देखील कोणी रागावणार नाही. आपण पायांना म्हणावे 'का चालणार नाही? कारण त्यांचा करार अजून पूर्ण झालेला नाही.' असे एक-दोन वेळा टोकले तर आपोआप चालतील. वाघ मागे लागला तर कसे चालतात? या देहाला खाऊ-पिऊ देतो, मसालेदार चहा पाजतो, तरी चालणार नाही?

ज्या अवस्थेत येतो, त्या अवस्थेचे जतन करत राहतो. आयुष्यभर मोकळाच असतो, पण शेवटचे सहा महिने जेलमध्ये टाकले तर आरडाओरडा करतो की 'मी कैदी झालो!' लग्न झाले की सुवासिनीचे सुख वाटते आणि मग विधवा झाल्यावर वैधव्याचे दुःख निर्माण होते. 'मी तर विधवा झाले' असे म्हणते. मागच्या जन्मी विधवा झाली होतीस आणि या जन्मात परत सौभाग्यवती झालीच ना? लग्न आणि वैधव्य, दुसरे आहेच काय या जगात?

सर्व अवस्था बदलतात. आत्मा मात्र त्याच रूपात राहतो. आत्म्यात बदल होतच नाही. वस्तूंचा विनाश होतच नाही. अवस्थांचा प्रतिक्षण विनाश होतो. जग अवस्थेतच जगते. 'मी चंदू आहे, हा माझा मुलगा आहे, ही माझी पत्नी आहे' अशा अवस्थांमध्येच मुक्काम करतो! मग म्हणेल, 'मी म्हातारा झालो!' आत्मा कधी म्हातारा होतो का? या सर्व आत्म्याच्या अवस्था नाहीत. प्राकृत अवस्था आहेत. या कशामुळे उत्पन्न झाल्या आहेत? संयोगाच्या दबावामुळे. आत्म्याला केवळ स्पर्श झाल्याने कॉजेस् उत्पन्न होतात. ते चार्ज होतात आणि मग त्यांचा डिस्चार्ज होतो.

मागच्या जन्मातील मुलांचे काय झाले? ते सर्व अजून तुमची आठवण काढतात. पत्र वगैरे पाठवले आहे का त्यांना? हा तर मरायची

वेळ आली की म्हणेल 'माझी लहान मुलगी राहून गेली' मागील जन्मातील मुलांना सोडून आलास आणि या जन्मात 'माझी मुले, माझी मुले' म्हणून त्यातच तन्मयाकार होतोस. मागील अवस्था निरंतर विसरत जातोस आणि नव्या अवस्थेत तन्मयाकार होतोस! अवस्थेत तन्मयाकार राहणे, याचेच नाव संसार, तो संसारबीज टाकत राहतो. आणि स्वरूपात तन्मयाकार राहणे, त्याचे नाव मोक्ष.

या संसारात कसे आहे की दु:ख आले तेही विसरतो आणि सुख आले तर तेही विसरतो, लहानपणी वैर बांधले त्यालाही विसरतो. मग एकत्र बसून चहा पितात, आणि सर्व काही विसरून जातात. पण ज्यावेळी जी अवस्था उत्पन्न झाली त्या अवस्थेत एकाकार होऊन सह्या करून टाकतो. सह्या केल्या की मग त्या पुसल्या जात नाहीत. म्हणून या सह्या होतात त्याला हरकत आहे. लोक बोलता-बोलता सह्या करून टाकतात. सहज कोणी दबाव टाकला की लगेच सही करून टाकतात. अरे, आपल्या मुलीला कोणी पळवून नेले तरी पण तेव्हा सह्या करू नये. लोक अवस्थेतच सर्व चित्रण करून टाकतात, मारून टाकण्याचेही चित्रण करून टाकतात!

## अवस्था : पर्याय

**दादाश्री :** मनुष्याच्या किती अवस्था असतील?

**प्रश्नकर्ता :** बाल्यावस्था, युवावस्था, प्रौढावस्था आणि वृद्धावस्था.

**दादाश्री :** चारच अवस्था आहेत? मरणाला अवस्था म्हणता येणार नाही का?

**प्रश्नकर्ता :** तो फुलपॉइंट झाला.

**दादाश्री :** त्यालाही अवस्था म्हणतात. गर्भात आला ती गर्भावस्था झाली. त्याअगोदर मरणावस्था होती. म्हणजे अवस्थांचे पूर्ण चक्र चालूच राहते. तुम्हाला तर चारच अवस्था वाटतात ना? पण हे सर्व पाच-पाच मिनीटांनी बदलत असते. घटकेत घराचे विचार येतात, ते दोन-तीन मिनिटे राहतात, मग परत दुसरा विचार येतो. या सर्व अवस्था बदलत

राहतात. ही तर मोठ्या मोठ्या अवस्थांना नावे दिली आहेत. पण या सर्व अवस्थांमध्येच जगत असतो. 'ऑल दीज आर टेम्परररी ॲडजेस्टमेंटस्.'

**प्रश्नकर्ता :** आता आम्ही तर अवस्थेतच आहोत.

**दादाश्री :** ह्या अवस्थाही समाधानी नसतात. सर्व अवस्थांमध्ये नि:शंक समाधान राहते, त्याला ज्ञान म्हणतात. आपले ज्ञान कसे आहे की प्रत्येक अवस्थेत नि:शंक समाधानच राहते. आणि लोक तर खिसा कापला गेला तरी डिप्रेस होतात आणि कोणी फुले वाहिली की असे टाइट होतात.

**प्रश्नकर्ता :** अवस्था आणि पर्याय काय आहेत?

**दादाश्री :** सगळे सापेक्ष ज्ञान हे अवस्थेचे ज्ञान आहे. पर्याय फार बारीक, सूक्ष्म वस्तू आहे आणि अवस्था जाड-स्थूल वस्तू आहे. पाच इंद्रियांनी ज्याचा अनुभव येतो त्या सर्वांना अवस्था म्हटले आहे आणि पर्याय ज्ञानामुळे समजू शकतो.

प्रत्येक वस्तू अवस्थावाली आहे. हा पंखा आहे तो मूळ स्वरूपात पंखा आहे आणि आता त्याची चालण्याची अवस्था आहे, आणि मग बंद राहण्याची अवस्था असेल. अवस्था विनाशी आहे आणि मूळ स्वरूप हे तत्त्व स्वरूप आहे, ते अविनाशी आहे.

प्रत्येक अवस्था जाणण्यासाठीच आलेली असते. या जितक्या अवस्था उत्पन्न होतात, चांगल्या किंवा वाईट, शाता वेदनीय किंवा अशाता वेदनीय, पण त्या जाणण्यासाठीच येतात. अवस्था काय म्हणतात की, 'तुम्ही मुक्त व्हा.' तिथे आपण उपयोगपूर्वक राहिलो, तर बिलकुल शुद्ध होऊन मुक्त होऊन जाऊ, नाही तर तसेच डागाळलेले परत आले तर आपल्यालाच धुवावे लागेल ना?



# [ 39 ]
# ज्ञानाचे स्वरूप : काळाचे स्वरूप

## स्वरूपज्ञानाचा अधिकारी

**प्रश्नकर्ता :** प्रारब्धाच्या बंधनाने बांधलेल्या पुरुषाला ज्ञानाचा अधिकार आहे का?

**दादाश्री :** महावीर भगवंत सुद्धा प्रारब्धाने बांधलेले होते, आणि त्यांना केवलज्ञानाचा अधिकार होता, मग तुम्हाला आत्मज्ञानाचा अधिकार तर असेलच ना? प्रत्येक जण प्रारब्धाने बांधलेला असतो, म्हणून तर त्याचा जन्म होतो. अंतिम जन्म देखील प्रारब्धाने बांधलेला असेल तरच होतो.

**प्रश्नकर्ता :** मग प्रारब्ध सुटते का?

**दादाश्री :** मग प्रारब्ध बांधले जात नाही. आम्ही तुम्हाला ज्ञान देऊ मग तुम्हाला प्रारब्ध बांधणारच नाही. म्हणून मग कर्मे डिस्चार्ज होतील पण नवीन कर्मे चार्ज होणार नाहीत, असे हे विज्ञान आहे.

**प्रश्नकर्ता :** पत्नीसह ज्ञान घेण्याचा अधिकार आहे का?

**दादाश्री :** या काळात कोणाचा अधिकार पाहण्यासारखे नाहीच. या काळात कुणाला अधिकार नसतोच. म्हणून तर आम्ही जो येईल त्याला मोकळीक दिली आहे. हा कोणता काळ आहे माहीत आहे का? जैन दूषमकाल म्हणतात आणि वेदांती कलियुग म्हणतात? कलियुग म्हणजे काय? तर कधीही चैन पडत नाही तो काळ. उद्या काय होणार? उद्या काय होणार? असे वाटत राहून चैन पडत नाही. आणि दूषमकाल म्हणजे काय? अतिशय दु:ख भोगूनसुद्धा समता राहत नाही. आता अशा

काळात अधिकार पाहायला गेलो तर कोणाचा नंबर लागेल? अधिकारी नसतोच ना कोणी!!

**प्रश्नकर्ता :** मग आपण ज्ञान देता त्याला कृपेचे स्वरूप मानायचे का?

**दादाश्री :** कृपेनेच काम होईल. आत जे प्रकट झाले आहेत त्या 'दादा भगवान'यांची कृपाच सरळ तुमच्यात उतरते. त्याने आपले काम करून घ्यायचे आहे. प्रत्येकाच्या पात्रतेनुसार कृपा उतरते, मग जितका विनय अधिक तितकी कृपा अधिक. सगळ्यात मोठा गुण या जगात असेल तर तो आहे विनय गुण!

**प्रश्नकर्ता :** अशी म्हण आहे ना की कलियुगात मोक्ष लवकर मिळतो?

**दादाश्री :** खरे आहे. याचे कारण आहे. कलियुगात लोक पास होत नाहीत, त्यामुळे प्रोफेसरांनी निश्चित केलेल्या अभ्यासाची पातळी आणखी खाली आणावी लागते. नाही तर कुणी पास होईल का? कलियुगात मनुष्यत्वाचे मानक जास्त खाली आलेले आहे, म्हणून तर तुम्हाला किंमत आहे ना? नाही तर या काळातील लोकांना मोक्षात कोण घुसू देईल? परीक्षेत कोणाला तरी पास करावेच लागेल ना, नाही तर कॉलेज बंद करावे लागेल. म्हणून 'लेव्हल' (पातळी) खाली आणली आहे.

## वर्तमानात राहतात, ज्ञानी

**प्रश्नकर्ता :** युगाच्या परिभाषेत यापूर्वी कधी कलियुग आले होते का?

**दादाश्री :** प्रत्येक कालचक्रात कलियुग असतेच. कलियुग म्हणजे काय की दिवसानंतर रात्र येते ना? तसेच हे कलियुग आहे. कलियुग आहे म्हणून सत्युगाला सत्युग म्हणू शकतो. कलियुग नसते तर सत्युगाला काही किंमतच राहिली नसती ना?

**प्रश्नकर्ता :** युगाच्या आधीन मनुष्य आहे की मनुष्याच्या आधीन युग आहे?

**दादाश्री :** असे आहे ना, सध्या तर लोक काळाच्या आधीन आहेत. परंतु मूळ काळ 'आपल्या'पासूनच उत्पन्न झाला आहे. तुम्हीच राजे आहात आणि राजाच्या मागे हे सर्व उत्पन्न झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** काळच ईश्वर आहे आणि काळच परमेश्वर आहे?

**दादाश्री :** काळ परमेश्वर नसतो. नाही तर लोक 'काळ, काळ करत राहिले असते. परमेश्वर तर तुम्ही स्वतःच आहात, त्याला ओळखण्याची गरज आहे. काळ तर मध्ये केवळ निमित्त आहे.

आमच्यात आणि तुमच्यात फरक किती? आम्ही काळाला वश केले आहे. लोकांना तर काळ खाऊन टाकतो. तुमचे काळाला वश करणे अजून बाकी आहे. काळ कसा वश होतो? भूतकाळ विस्मृत झाला, भविष्यकाळ 'व्यवस्थित'च्या हातात आहे, म्हणून वर्तमानात राहा. मग काळ वश होतो. आपल्या 'अक्रम'चे सामायिक करता-करता वर्तमान काळाला पकडणे जमते. असे सरळ सरळ जमणार नाही. तुम्ही एक तास सामायिकमध्ये बसता त्यावेळी वर्तमानातच असता ना?

वर्तमानात राहणे म्हणजे काय? आता तुम्ही जर हिशोब लिहित असाल तर 'एक्झॅक्ट' (नेमके) त्यातच राहता ना? त्यावेळी भविष्यात जाल तर हिशोबात चूक होईल. वर्तमानातच राहिलात तर एकही चूक होणार नाही. प्राप्त वर्तमान भोगा, असे मी म्हणतो. भूतकाळ तर निघून गेला. भूतकाळाला तर हे बुद्धीशाली लोकही उकरत नाहीत. आणि भविष्याचा विचार करणे म्हणजे अग्रशोच आहे. म्हणून वर्तमानात राहा. वर्तमानात सत्संग होत असेल तर तो एकाग्र चित्ताने ऐकावा. हिशोब लिहित असाल तर तो एकाग्र चित्ताने लिहा आणि शिव्या देत असाल तर त्यासुद्धा एकाग्र चित्ताने द्या! सदैव वर्तमानात असतात ते ज्ञानी. लोक भविष्याच्या चिंतेमुळे आणि भूतकाळामुळे वर्तमान उपभोगू शकत नाहीत, आणि हिशोबातही चूक करून टाकतात. 'ज्ञानी पुरुष' वर्तमान बिघडवत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** तर मग भूत आणि भविष्याला विसरून जावे का?

**दादाश्री :** नाही, विसरायचे नाही, वर्तमानातच राहायचे. विसरणे

म्हणजे एक बोजाच म्हणायचा. विसरून जाऊ म्हटले तरी विसरले जात नाही, उलट जे विसरायचे त्याचीच जास्त आठवण येते. एक जण मला म्हणत होता की, 'मी सामायिक करायला बसतो तेव्हा मनात वाटते की आज दुकानाची आठवण न येवो.' त्यादिवशी सामायिकमध्ये नेमकी सगळ्यात आधी दुकानाचीच आठवण येते! असे का होते? कारण दुकानाचा तिरस्कार केला की दुकान न आठवो! आपण तर कोणाचाही तिरस्कार करायला नको. वर्तमानात राहणे ही एकच गोष्ट आहे. भूतकाळ आणि भविष्यकाळ यांच्याशी आपल्याला काही देणेघेणे नाही. वर्तमानात राहणे यालाच अमरपद म्हणतात. आम्ही वर्तमानात असेच्या असेच राहतो. रात्री उठविले तरी असेच आणि दिवसा उठविले तरी असेच. जेव्हा पाहाल तेव्हा असेच्या असेच असतो.

## काळद्रव्य

**प्रश्नकर्ता :** काळ नावाचे द्रव्य कसे काम करते?

**दादाश्री :** काळ तर नैमित्तिक आहे. एक परमाणू त्याचा अवकाश भाग सोडून जेवढ्या काळात दुसऱ्या अवकाश काळात प्रवेश करतो, तेवढ्या काळाला 'समय' म्हटले आहे. हा संसार समसरण आहे, निरंतर प्रवाहमान आहे. अजिबात स्थिर राहत नाही. बऱ्याच समयांचा एक *'पल'* बनतो.

आम्ही सांगितल्याबरोबरच तुम्हाला समजते ही चांगली डेव्हलपमेंट म्हणावी लागेल. जितका कमी काळ लागतो तेवढी डेव्हलपमेंट जास्त आणि जितका जास्त काळ लागतो तेवढी डेव्हलपमेंट कमी. काळ सूक्ष्म आहे. समय सूक्ष्माहूनही सूक्ष्म आहे. आमचा काळ हा समयाच्या जवळचा असतो आणि तीर्थंकरांचा समयच असतो. आज जर समयापर्यंत पोहोचले तर मोक्ष होईल. पण या काळाची विचित्रता अशी आहे की समयापर्यंत पोहोचता येत नाही.



# [ 40 ]

# वाणीचे स्वरूप

## वाणी हा आत्म्याचा गुण नाही

**दादाश्री :** हे जे बोलत आहे ते कोण बोलत आहे?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही, दादा भगवान बोलत आहेत.

**दादाश्री :** मी स्वत: बोलत नाही. मला बोलण्याची शक्तीच नाही ना! हा तर ओरिजिनल टेपरेकॉर्ड बोलत आहे. त्यावरून दुसरी रेकॉर्ड टेप करायची असेल तर करता येते, तिसरी, चौथी रेकॉर्डही तयार करता येते. आणि तुला तर असेच वाटते ना की 'मी स्वत:च बोलत आहे?' तू बोलतोस म्हणून तुला हे 'पझल' (कोडे) वाटते, आणि मी कोडे सोडवून बसलो आहे. तू बोलतोस तेव्हा असा अहंकार करतोस की मी बोलतो. बाकी तुझीसुद्धा टेपरेकॉर्डच बोलत असते.

आत्मा बोलू शकेल असा नाहीच. आत्म्यात वाणी नावाचा गुणधर्मच नाही. शब्द हा आत्म्याचा गुणधर्म नाही आणि पुद्गलाचाही गुणधर्म नाही. जर तो त्यांचा गुण असता तर तो कायमस्वरूपी असता. पण त्याचा तर नाश होतो. खरे तर, शब्द हा पुद्गलाचा पर्याय आहे. ती पुद्गलाची अवस्था आहे. दोन परमाणू आदळले की आवाज उत्पन्न होतो. या गाडीचा हॉर्न असा दाबला तर काय होईल? वाणी निघते.

**प्रश्नकर्ता :** असे दाबल्याने जी वाणी निघते तिला तर यांत्रिक वाणी म्हणतात. पण 'ज्ञानीं'ची वाणी यांत्रिक नसते ना?

**दादाश्री :** आमची वाणी टेपरेकॉर्ड आहे आणि तुमची वाणीसुद्धा टेपरेकॉर्ड आहे. पण 'ज्ञानीं'ची वाणी स्याद्वाद असते.

**प्रश्नकर्ता :** स्याद्वाद वाणीला चेतन वाणी म्हणतात का?

**दादाश्री :** वाणी चेतन असूच शकत नाही; मग ती आमची असो की तुमची. हो, आमची वाणी संपूर्ण शुद्धचेतनाला स्पर्श करून निघते म्हणून चेतनासारखी भासते.

**प्रश्नकर्ता :** 'वाणी जड आहे' असे म्हणू शकतो?

**दादाश्री :** 'वाणी जड आहे' असे म्हणू शकतो, पण चेतन आहे असे तर म्हणताच येणार नाही. गाडीचा हॉर्न दाबला तर तो वाजतो की नाही? असा दाबला की आत जे परमाणू असतात ते धावाधाव करतात, एकमेकांवर घासले जातात, त्यामुळे हा आवाज येतो. बाज्यातून कसा निघतो? तसाच या बाज्यातून घासून घासून निघते सर्व. हे सर्व 'मेकॅनिकल' आहे. आत्मा स्वतः परमात्मास्वरूप आहे.

## स्याद्वाद वाणी

**प्रश्नकर्ता :** आपली वाणी, 'ज्ञानीं'ची वाणी कशी असते?

**दादाश्री :** स्याद्वाद वाणी, तिला अनेकांत म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** स्याद्वाद म्हणजे काय?

**दादाश्री :** कुठल्याही धर्माचे किंचिमात्रही प्रमाण दुखावले जाणार नाही, अशी वाणी. या वाणीला वैष्णव, जैन, श्वेतांबर, दिगंबर, स्थानकवासी, पारसी, मुस्लिम सगळेच 'एक्सेप्ट' (मान्य) करतात. ही एकांतिक नसते, यात अनेकांत असते.

**प्रश्नकर्ता :** तिला निराग्रही म्हणता येईल?

**दादाश्री :** हो, म्हणता येईल. यात कसल्याही प्रकारचा आग्रह नसतो.

**प्रश्नकर्ता :** निराग्रही वाणीसाठी तुम्हाला विचार करून बोलावे लागते का?

**दादाश्री :** नाही. विचार करून जे बोलले जाते ती निराग्रही वाणी नसतेच. ही तर 'डिरेक्ट' चेतनाला स्पर्श करून निघते. 'ज्ञानीं'ची वाणी जागृतीसहित असते. ती समोरच्याच्या हितासाठीच असते. कोणाचे थोडेदेखील अहित होणार नाही, अशा प्रकारची जागृती असतेच.

'ज्ञानी पुरुषा'ची वाणी उल्हासपूर्वक ऐकत राहिल्याने तशीच वाणी होत जाते. नुसती नक्कल करून काही होत नाही.

**प्रश्नकर्ता :** स्याद्वाद वाणी केव्हा निघते?

**दादाश्री :** सर्व कर्मांचा क्षय झाल्यावर, क्रोध-मान-माया-लोभ यांचा क्षय झाल्यावर स्याद्वाद वाणी निघते. संपूर्ण वीतराग विज्ञान हजर असले पाहिजे, आत्म्याचा स्पष्ट अनुभव आला असेल तरच स्याद्वाद वाणी निघते. तोपर्यंत सर्व बुद्धीच्या गोष्टी, व्यावहारिक गोष्टी गणल्या जातात. स्याद्वाद वाणी निघत नाही तोवर मोक्षमार्गात उपदेश देणे हे भयंकर धोक्याचे आहे.

## उपदेशाचा अधिकारी

उपदेश कोण देऊ शकतो? ज्याच्या बोलण्यावर समोरची व्यक्ती विवाद उभा करू शकणार नाही तोच. बाकी आपल्या मार्गात चर्चा होतच नसते. आमचे पुस्तक समजून घेण्याची रीत काय आहे? दोघांना सारखेच समजत नाही. एकाला खरोखर समजते, दुसऱ्याला अर्धवट समजते, त्यातील अर्धवट समजलेल्याने हट्टाने म्हटले की 'माझेच खरे आहे' तर त्याला तुझेच खरे आहे असे म्हणून पुढे निघून जावे. सत् समजण्यात वाद-विवाद असता कामा नये.

माझे खरे आहे असे मानू नये. 'माझे आहे म्हणून खरे आहे'

असे आतून वाटत असेल, तर रोग उत्पन्न झाला असे म्हणावे. आपले खरे बोलणे समोरचा कबूल करतोच. जर नाही केले तर आपण सोडून दिले पाहिजे. मी जे बोलतो ते समोरच्याचा आत्मा कबूल करतोच. जर कबूल करत नाही तर तो त्याचा आडमुठेपणा आहे. कारण ही वाणी माझी नाही. आणि म्हणूनच त्यात चूक होत नाही. 'माझी वाणी आहे' असे जिथे असेल तिथे वाणीत चूक होते.

आता या काळात कोणी उपदेश द्यायला गेला तर बंधन पडेल असे आहे. कषायसहित प्ररूपणा (उपदेश) नरकात जाण्याची निशाणी आहे. फार फार तर मंदकषायीला चालवून घेता येईल. नाही तर ही फार मोठी जोखीमच आहे.

अकषाय वाणीचा अर्थ काय? तर वाणीचा मालक 'स्वत:' नाही याची जाणीव. वाणीचा मालक असेल तर तो काय म्हणेल,' मी किती छान बोललो! तुम्हाला आवडले ना?' म्हणजे त्याचा चेक वटवून घेतो. आम्ही तर वाणीचे मालक नाही, मनाचे नाही आणि या देहाचेही नाही.

स्याद्वाद वाणी केव्हा उत्पन्न होते? तर अहंकाराची भूमिका पूर्ण झाल्यावर सर्व जगत निर्दोष दिसते, कोणी दोषी दिसतच नाही! आम्हाला चोरही दोषी दिसत नाही. लोक म्हणतात, चोरी करणे गुन्हा आहे. पण चोर काय समजतो की चोरी करणे हा माझा धर्म आहे. आमच्याकडे कुणी चोराला घेऊन आले तर आम्ही त्याच्या खांद्यावर हात ठेऊन एकांतात विचारू की, 'बाबा, हा बिझनेस तुला चांगला वाटतो का? आवडतो का?' मग तो आपली सगळी हकीकत सांगेल. आमच्याजवळ त्याला भीती वाटत नाही. माणूस भीतीमुळे खोटे बोलतो. मग त्याला समजावतो की, 'हे जे तू करत आहेस, त्याची काय जबाबदारी घ्यावी लागेल, त्याचे फळ काय आहे, हे तुला माहीत आहे का?' आणि त्यावेळी 'तू चोरी करतोस' असे आमच्या मनातही नसते. असे जर कधी आमच्या मनात आले तर त्याच्या मनावर परिणाम होईल. प्रत्येक जण आपापल्या धर्मात आहे. कुठल्याही धर्माचे प्रमाण दुखावले जाणार नाही,

अशा वाणीला स्याद्वाद वाणी म्हणतात. स्याद्वाद वाणी संपूर्ण असते. प्रत्येकाची प्रकृती वेगवेगळी असते. तरी देखील स्याद्वाद वाणी कोणाच्याही प्रकृतीला अडचणरूप होत नाही.

'ज्ञानी पुरुष' सर्व औषधे सांगतात. रोगाचे निदान पण करतात आणि औषधही सांगतात. आपण फक्त विचारले पाहिजे की खरे काय आहे? मला तर असे असे समजले आहे? मग ते लगेच सांगतात, आणि 'बटण' दाबायचे म्हणजे सर्व चालू होईल!

धर्मातील चर्चेत समोरच्याला समजावण्याच्या पद्धती वेगवेगळ्या आहेत.

(1) वाणीने स्वत:चे स्व-रक्षण, स्व-बचाव करणे. हा एक प्रकार म्हणतात.

(2) आणि समोरच्याला स्वत: 'कन्वीन्स' करणे (पटविणे) - हा एक प्रकार झाला. समोरचा कोणत्याही धर्माचे पालन करणारा असो, तरीही तो सहमत होईल असे बोलता आले पाहिजे ना? तेवढी शक्ती असायला हवी ना? ज्ञान जेवढे समजेल तेवढी शक्ती उत्पन्न होते. आणि समोरच्याला 'कन्वीन्स' करताना (पटवून देताना) जरा सुद्धा क्रोध-मान-माया-लोभ व्हायला नकोत, नाही तर समोरचा 'कन्वीन्स' होणारच नाही. कषाय उत्पन्न होणे हा तर कमकुवतपणा आहे.

(3) काही लोक कच्चे असतात आणि समोरच्याला समजवायला जातात पण समोरच्याच्या प्रभावाने स्वत:च बदलून जातात! समोरचा असे काही प्रश्न विचारतो की त्यामुळे स्वत: गोंधळात पडतो आणि त्याला वाटू लागते की मला तर काहीच ज्ञान नाही.

## हृदयस्पर्शी सरस्वती

'ज्ञानी पुरुषां'ची वाणी गोड-मधुर, कोणावर आघात न करणारी, प्रत्याघात न करणारी असते. कोणाला किंचितही दु:ख होणार नाही अशी वाणी निघणे, हेच चारित्र्य आहे. वाणी कशी निघते यावरून चारित्र्यबळ

ओळखता येते. इतर कोणत्याही गोष्टीने चारित्र्यबळ ओळखता येत नाही. जर बुद्धी स्याद्वाद असेल तर स्याद्वादासारखी लक्षणे दिसतात, पण ते संपूर्ण नसतात. परंतु जर ज्ञान-स्याद्वाद असेल तर त्याचे चारित्र्य वीतराग चारित्र्य असते. ज्ञान-स्याद्वाद याला प्रत्येक धर्माचे लोक प्रमाण म्हणून स्वीकारतात. त्या वाणीत अजिबात आग्रह नसतो.

हे तर विज्ञान आहे. जेव्हा वाणी सरस्वती स्वरूप होते तेव्हा लोकांच्या हृदयाला स्पर्श करते, तेव्हाच तर लोकांचे कल्याण होते. जगात हृदयस्पर्शी वाणी मिळणे कठीण आहे. आमची वाणी हृदयस्पर्शी असते, त्यातील एक शब्द जरी तुमच्यात सरळ उतरला तर तो तुम्हाला थेट मोक्षाला घेऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** अशी वाणी कोणाला प्राप्त करायची असेल तर काय करावे ?

**दादाश्री :** त्यासाठी आपण रोज भावपूर्वक मागणी करावी की माझ्या वाणीने कोणालाही दु:ख होऊ नये, आणि सुखच व्हावे. असे 'कॉज' टाकले पाहिजेत, तर प्राप्त होईल.

## 'ज्ञानीं'चे वचनबळ

'ज्ञानी पुरुषां'च्या एक एक शब्दात आश्चर्यकारक वचनबळ असते. वचनबळ कशाला म्हणायचे ? मी म्हटले की सगळे उठून उभे राहा. तर त्या वचनाप्रमाणे सर्व माणसे वागतात, याला वचनबळ म्हणतात. वचनबळातून वचन सिद्ध होत राहते. आता तर वचनबळच राहिले नाही ना ? बाप मुलाला सांगतो की, 'तू झोप.' तर मुलगा म्हणतो 'नाही, मी सिनेमा बघायला जात आहे.' वचनबळ तर त्याचे नाव की तुमचे वचन निघेल त्याप्रमाणेच घरातील सर्व लोक करतील.

**प्रश्नकर्ता :** वचनबळ कसे प्राप्त होईल ?

**दादाश्री :** वचनबळ कशामुळे संपले आहे ? तर वाणीचा दुरुपयोग केल्यामुळे. खोटे बोलले, लोकांना खडसाविले, कुत्र्याला घाबरविले,

कावेबाजी केली, त्यामुळे वचनबळ तुटून जाते. खोटे बोलून स्वबचाव केला, सत्याचा आग्रह आणि दुराग्रह केला तरी वचनबळ तुटते.

मुलाला खडसावतात, 'साल्या, सरळ बस'. त्यामुळे मुलासमोर वचनबळ राहत नाही. जर समोरच्याला जिव्हारी लागेल अशी वाणी निघाली तर पुढील जन्मात वाणी पूर्ण बंदच होऊन जाते, दहा पंधरा वर्षे मुकेच राहावे लागते.

जेवढे तुम्हाला समजेल तेवढे खरे बोला. समजत नसेल तेव्हा नाही बोललात तर चालेल. त्यात काही वावगे नाही. तर तेवढे वचनबळ उत्पन्न होईल. 'कुणाला दुःख होईल असे बोलायचे नाही' असे तुम्ही ठरवा आणि 'दादां'कडे सतत वचनबळासाठी शक्ती मागा, त्यामुळे ते प्राप्त होईल. आमचे वचनबळ आणि तुमची दृढ इच्छा असली पाहिजे. आमचे वचनबळ तुमचे सर्व अंतराय दूर करेल. तुमची परीक्षा होईल पण तुम्ही पार पडाल.

## मौन तपोबळ

**प्रश्नकर्ता :** मौनाला तपोबळ म्हणतात ते कुठल्या अर्थाने?

**दादाश्री :** मौन तपोबळ म्हणजे माणूस अमुक ठिकाणी मौन राहू शकत नाही, तिथे जर मौन राहता आले तर त्याला मौन तपोबळ म्हणतात. नोकराने ग्लास फोडला आणि तेव्हा जर मौन राहिला तर ते तप झाले. मौनासारखी सक्ती या जगात दुसरी कुठलीही नाही. बोलले की सारी शक्ती वाया जाते. सर्वात मोठे तप ते मौन. बापाबरोबर भांडण झाले तर मौन धरले की तप झाले. त्या तपामुळे आतील सर्व विरघळून जाते आणि त्यातून सायन्स उभे राहते. आज तर लोक मौन धरतात आणि दुसऱ्या दिवशी सगळा राग एकदमच काढतात! मौन तपोबळाने तर कामच होऊन जाते. संपूर्ण जगाचे कल्याण होऊन जाते. म्हणूनच कविने लिहिले आहे ना,

*''सत्पुरुषनुं मौन तपोबळ,*
*निश्चय आखा जग ने तारे!''* – नवनीत.

(सत्पुरुषाचे मौन तपोबळ संपूर्ण जगाला नक्कीच तारते)

या दादांना सगळे काही बोलण्याची सूट आहे, तरी मौन राहतात, त्याला मौन तपोबळ म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** मौन कशाला म्हणतात?

**दादाश्री :** आत्मार्थासाठी जे जे काही बोलाल ते सर्व मौनच मानले जाते.

**प्रश्नकर्ता :** स्थूल बोलणे बंद करून मौन पाळले तर ते हितकारी म्हणायचे का?

**दादाश्री :** स्थूल मौन तर स्थूल अहंकाराला अगदी छिन्न-भिन्न करून टाकते. या संसाराचे जंजाळ शब्दातूनच उभे राहिले आहे. मौनाने तर शक्ती खूप वाढते. बाहेरच्या (स्थूल) वाणीने लोकांना दु:ख होते, शब्द दगडासारखे लागतात. मौनाच्या दिवशी तेवढे तरी थांबेल ना? मौन संयम आणतो. स्थूल मौन देखील संयम आणतो, त्याला अहंकाराचे मौन म्हणतात. आणि 'मी शुद्धात्मा आहे' अशा प्रकारे जागृत राहिला तर त्याला शुद्धात्म्याचे मौन म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** तर मग मौन कसे असावे?

**दादाश्री :** मौन कशाला म्हणतात, तर ज्यात नोकषाय नसतात. हास्य, शोक, जुगुप्सा वगैरे नसतात. आत सूक्ष्म वाणी देखील नसते. मौनात स्थूल तर बोलले जात नाही पण लिहितात तीही वाणीच आहे. मौनात लिहायचेही नसते. मौन असेल तेव्हा तो सगळी चंचलता बंदच करून टाकतो. लिहून सांगणे, खाणाखुणा करणे, असे काहीही नसेल तर ते खरे मौन म्हणायचे.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला आतून राग येत असेल पण बाहेरून मौन असेल, तर काय करावे?

**दादाश्री :** म्हणूनच आम्ही म्हणतो की वाणीने हवे ते बोल,

वेड्यासारखे वाग, पण शेवटी 'तू' भगवांताच्या पक्षात रहा. सैतान पक्षाला मत दिले की सर्व संपलेच समज.

**प्रश्नकर्ता :** या सर्व बाबतीत मनच जास्त काम करते ना?

**दादाश्री :** मनामुळे हा संसार उभा राहिला आहे. एका मनाने संसाराचा अस्त होतो आणि एका मनाने उदय होतो.

**प्रश्नकर्ता :** समोरच्याचा व्ह्यू पॉइंट समजला नाही तर काय करावे?

**दादाश्री :** मौन राहावे. मौन राहिल्यामुळे बुद्धीहीन मनुष्यदेखील शहाणे मानले जातात. कधी कोणी म्हटले की 'तुला अक्कल नाही' तर तेव्हा मौन राहावे. आणि त्यावेळी जर तुम्ही विरोध केलात तर ते त्याच्या लक्षात राहील आणि म्हणेल की, 'हा तर बेअक्कलच आहे.'

या दूषमकाळात वाणीमुळेच बंधन आहे. सुषमकाळात मनामुळे बंधन होत असे. हे शब्द नसते ना, तर मोक्ष मिळविणे अगदी सोपे आहे. म्हणून कोणाबद्दल एक अक्षरही बोलू नये. कोणाची चूक काढणे, हे स्वत:च्या आत्म्यावर धूळ उडविण्यासारखे आहे. शब्द बोलणे म्हणजे खूप धोकादायक आहे. उलटे बोलले गेले तर त्यामुळेही आत स्वत:वर धूळ उडते, उलटा विचार केला तर त्यामुळे देखील आत स्वत:वर धूळ उडते. म्हणून या उलटे बोलण्याबद्दल किंवा उलटा विचार करण्याबद्दल तुम्ही प्रतिक्रमण करून घ्यावे, तर त्यापासून सुटका होऊ शकेल.

## जिवंत टेपरेकॉर्डर, केवढी जबाबदारी!

हे टेपरेकॉर्डर आणि ट्रान्समीटर अशी कितीतरी साधने आता बनली आहेत. त्यामुळे मोठमोठ्या माणसांना सतत भीती वाटत राहते की कोणी काही टेप केले तर? आता त्यात तर फक्त शब्दच टेप होत असतात. पण या मनुष्याचे शरीर, मन हे सर्व टेप होईल असे आहे. त्याची थोडीदेखील भीती लोकांना वाटत नाही. जर समोरचा माणूस झोपलेला असेल, आणि तुम्ही म्हणालात की 'हा नालायक आहे', तर ते त्याच्या

आत टेप होते! मग त्याचावर त्याचा परिणाम होतो. म्हणून झोपलेल्या माणसाबद्दलही बोलू नये. एक अक्षरदेखील बोलू नये. कारण सर्व काही टेप होऊन जाईल, अशी ही मशिनरी आहे! बोलायचेच असेल तर चांगले बोला की, 'साहेब, तुम्ही खूप चांगले आहात.' चांगला भाव ठेवा तर त्याच्या फळरूपात तुम्हाला सुख मिळेल. पण जराही उलटे बोलाल, अंधारात बोलाल किंवा एकांतात बोलाल, तरी त्याचे फळ विषासारखे कडू येईल. हे सर्वच टेप होणार आहे. तेव्हा आता चांगले टेप होईल असे पाहा.

**प्रश्नकर्ता :** कडू तर नकोच.

**दादाश्री :** तुम्हाला कडू हवे असेल तर कडू बोला, आणि नको असेल तर बोलू नका. कोणी मारले, तरी त्याच्याशी कडू बोलू नका. त्याला म्हणा, 'मी तुझे उपकार मानतो.'

या काळात जरी कोणी शिव्या दिल्या असतील तरीही तुम्ही त्याला जेवायला बोलवा, असे भगवंतांनी सांगितले आहे. कारण त्याची वाइल्डनेस (गुंडगीरी) इतकी अधिक आहे, म्हणून तुम्ही त्याला क्षमाच करा. जर तुम्ही सूड घ्यायचा विचार कराल तर परत संसारात अडकाल. या काळात सूड घ्यायचा नसतो. या दूषमकाळात तर वाइल्डनेसच असते. कसले कसले विचार येतील ते सांगता येत नाही. जगाविरुद्ध विचार पण येतात! या काळातील लोक खूप भांडाभांड करतील. तुम्ही जर त्यांच्याशी शत्रुत्व केले तर तुम्हालाही भांडत बसावे लागेल. म्हणून आपण म्हणतो, 'सलाम साहेब.' या काळात ताबडतोब माफ करायला हवे, नाहीतर तुम्हालाही अडकून बसावे लागेल. आणि हे जग तर वैरावरच उभे आहे.

या काळात कोणाला समजावण्यासारखे नाही. जर समजावणे जमत असेल तर चांगल्या शब्दात समजावावे, जेणेकरून ते टेप झाले तरी तुमची जबाबदारी राहणार नाही. म्हणून 'पॉजिटिव्ह' राहा. जगात 'पॉजिटिव्ह'च सुख देईल आणि नेगेटिव्ह दुःख देईल. म्हणजे ही किती

मोठी जोखिमदारी आहे? न्याय-अन्याय पाहणारा तर खूप लोकांना शिव्या देत राहतो. न्याय-अन्याय तर पाहण्यासारखाच नाही. न्याय-अन्याय हे तर जगाचे एक थर्मामीटर आहे, की कोणाला किती ताप चढला आणि किती उतरला? जग कधीही न्यायी होणार नाही आणि अन्यायीही होणार नाही. असेच सर्व चालत राहील.

हे जग नेहमीच असे आहे. सत्युगात जरा कमी बिघडलेले वातावरण असते, आता जरा जास्त आहे. श्रीरामाच्या काळात सीतेचे हरण करणारे लोक होते, तर काय आता नसतील? असे तर चालतच राहील. पूर्वीपासूनच ही मशिनरी अशी आहे. त्याला काही कळतच नाही. स्वतःच्या जबाबदाऱ्या कोणत्या याचेही भान नाही, म्हणूनच तुम्ही बेजबाबदारीने बोलू नका. बेजबाबदार आचरण करू नका, बेजबाबदारीने काहीच करू नका, सर्व काही पॉजिटिव्ह घ्या. कोणाचे चांगले करायचे असेल तर करा, पण वाईटात मात्र पडूच नका, आणि वाईट विचारही करू नका. कोणाबद्दल वाईट ऐकूही नका. फार धोक्याचे आहे. नाहीतर हे एवढे मोठे जग, त्यात मोक्ष तर स्वतःच्या आतच पडलेला आहे, तरी पण सापडत नाही!!! आणि कितीतरी जन्मांपासून भटकतच राहिला आहे!!!

सामान्य व्यवहारात बोलले तर हरकत नाही, पण देहधारी बद्दल मात्र काहीही वेडे-वाकडे बोलाल तर लगेच आत रेकॉर्ड होऊन जाईल. या संसारातील लोकांची टेप तयार करायची असेल तर कितीसा वेळ लागतो? जरासे डिवचले तरी प्रतिपक्षी भाव टेप होतच राहतील. आणि 'तुझ्यात तर इतका कमकुवतपणा आहे की छेडण्याआधीच तू बोलायला लागशील.'

**प्रश्नकर्ता :** वाईट बोलायचे तर नाहीच, पण मनात वाईट भावही येऊ नयेत ना?

**दादाश्री :** वाईट भाव येऊ नयेत, ही गोष्ट खरी आहे. भाव झाला की त्याप्रमाणे बोलले जातेच. म्हणून बोलणे बंद झाले तर भाव

बंद होतील. हे भाव तर बोलण्यामागे असलेले प्रतिघोष आहेत. प्रतिपक्षी भाव उत्पन्न झाल्याशिवाय राहतच नाहीत ना! आम्हाला प्रतिपक्षी भाव होत नाहीत, तुम्हाला देखील त्या स्थितीपर्यंत पोहोचायचे आहे. प्रतिपक्षी भावच उत्पन्न होणार नाहीत, तेवढा तुमचा कमकुवतपणा निघून जायला हवा. आणि कधी झालेच तर तुमच्याकडे प्रतिक्रमणाचे हत्यार आहे त्याने पुसून काढावे. पाणी जरी कारखान्यात गेले असेल तरी पण बर्फ बनत नाही तोपर्यंत ठीक आहे. बर्फ बनला की मग आपल्या हातात काहीच राहत नाही.

आपल्याकडून पत्रात कोणाबद्दल काही वाईट लिहिले गेले असेल, पण ते पत्र पोस्टात टाकण्यापूर्वी आपल्याला खाली लिहिता येते की वर आपल्याबद्दल दोन शब्द वाईट लिहिले गेले आहेत, पण त्यावेळी माझ्या डोक्यात काही वेडेपणा शिरला असेल म्हणून असे लिहिले गेले, तेव्हा तुम्ही मला माफ करा. असे लिहिले की सर्व माफ होते. पण असे केल्याने तर त्यांची अब्रू जाते, म्हणून लिहीत नाहीत. आले मोठे अब्रूदार! कितीतरी कपडे घालतात तेव्हा तर त्यांची अब्रू राहते. शिवाय कपडे फाटले तर दुरुस्तही करावे लागतात. कपडे मळले तरी बोंबलतात, 'माझी पांढरी टोपी का धुतली नाहीस? नावछाप टोपी वापरतो ना, ती? इस्त्री का केली नाहीस?' मग इस्त्रीसाठीही भांडतात. अरे, कशासाठी अब्रू सांभाळतोस? नागडा फिरलास तरी लोक पूजा करतील अशी अब्रू शोधून काढ ना.

आत अनंत शक्ती आहेत. ज्या दिशेला वळवायच्या असतील त्या दिशेला वळवू शकता. रस्ता माहीत असला पाहिजे.

जेवढे प्रेममय डीलिंग असेल तेवढीच वाणी या टेपरेकॉर्डरमध्ये परवडेल अशी आहे, त्याचे चांगले यश मिळेल.

शास्त्रांनी सांगितले की वाईट बोलू नका, वाईट विचार करू नका. तेव्हा आपल्याला वाटते की हे असे तेच तेच का सांगत बसतात? ही मशिनरीच अशी आहे की सगळे टेप होऊन जाते. मग जेव्हा पुरावे एकत्र येतात तेव्हा फजिती होते.

**प्रश्नकर्ता :** पुरावे संयोगांच्या रूपात बाहेर येतात?

**दादाश्री :** हो. संयोग एकत्र आले की बाहेर येतात आणि काही पुरावे आपल्याला आतल्या आतच त्रास देतात. तेसुद्धा आत जेव्हा संयोग एकत्र येतात तेव्हा. त्यांना आतील संयोग म्हणतात. ते 'सायंटिफिक सरकस्टेन्शियल एविडन्स' आहेत.

घरी पत्नीला ओरडतो तेव्हा त्याला वाटते की 'मी ओरडलो ते कोणीही ऐकले नाही, हे तर असेच आहे ना!' लहान मुलांसमोर पती-पत्नी वाटेल ते बोलतात. त्यांना वाटते या लहान मुलाला काय समजणार आहे? अहो, आत टेप होत आहे त्याचे काय? तो मोठा झाला की ते रेकॉर्ड झालेले सर्व बाहेर येणार!

**प्रश्नकर्ता :** ज्याला टेपमध्ये काही रेकॉर्ड करायचे नसेल त्याच्यासाठी कोणता मार्ग आहे?

**दादाश्री :** कुठलेही स्पंदन निर्माण करायचे नाही. सर्व काही फक्त पाहतच राहायचे. पण असे होत नाही ना? ही देखील मशीन आहे आणि पराधीन आहे. म्हणून आम्ही दुसरा मार्ग सांगतो की जर टेप झाले तर लगेच पुसून टाका, मग चालेल. प्रतिक्रमण हे पुसून टाकण्याचे साधन आहे. त्यामुळे एखाद्या जन्मात सर्व परिवर्तित होऊन असे बोलणे बंद होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्म्याचे लक्ष बसल्यावर निरंतर प्रतिक्रमणे चालूच राहतात.

**दादाश्री :** मग तुम्ही जबाबदार राहत नाही.

आम्हाला तर कविराजांची भक्तीपदे 'एक्झॅक्ट' त्याच आवाजात, त्याच रागात, दोन-दोन, तीन-तीन तास सतत ऐकू येतात. तर हे काय असेल? ही तर मशीन आहे. हे देखील सर्वात मोठे सायन्स आहे. तो टेपरेकॉर्ड माणसाने बनविला आहे आणि हा तर अनौपचारिक आहे. माणसाला बनविताच येणार नाही अशी ही मशीन आहे. याला इलेक्ट्रिक

करंटची गरज नसते, बॅटरीची गरज नसते. रात्रंदिवस पाऊस असो वा उन्हाळा, बर्फ पडत असो तरी ही मशीन चालूच राहते.

पंधरा वर्षांपूर्वी आपण एखाद्या माणसाला पाहिले असेल, त्याला आज पाहिले तरी आपल्याला आठवते की याला आपण पाहिले आहे. अशी ही मशीन आहे.

प्रत्येक परमाणूत टेप करण्याची शक्ती आहे. डोळ्यांना फिल्म तयार करण्याची शक्ती आहे, आत अपार शक्ती आहेत. या एका आतील मशिनरीपासून दुसऱ्या अपार मशिनरी बनतात. म्हणजेच ही मशीन जबरदस्त पॉवरफूल आहे.

जोपर्यंत जगातील व्यवहाराची तुम्हाला गरज आहे, तोपर्यंत मनोहर वाटेल असे बोला. ज्याची वाणी, वर्तन आणि विनय मनोहर झाले आहे तो प्रेमात्मा झाला. पण ते कसे होणार? कारण वाणी अशी असते की समोरचा चहा देत असेल तरीही देणार नाही.

आपण एखाद्या अनोळखी गावात गेलो, आणि तिथे बोलत राहिलो की 'ही सर्व मूर्ख, अडाणी माणसे आहेत' असे सारखे बोलत राहिलो तर सायंकाळी जेवण मिळेल का? त्याऐवजी 'तुम्ही सर्व खूप चांगले आहात', असे म्हटले तर लोक आपल्याला समोरून विचारतील, तुम्ही काही खाणे-पिणे केले आहे की नाही?

या काळात तर थट्टा-मस्करीही करू नये. एक शब्दही बोलू नये. जाड असेल तरी त्याला जाड म्हणू नये. उंच असेल तरी त्याला उंच म्हणू नये. हे लोक तर प्लास्टिकसारखे झाले आहेत. आपले लोक तर कुणाचीही निंदा करत असतात. माणसांची सोडा पण फळांची देखील निंदा करतात. हे फळ बाधक आहे म्हणतील. हे गरम पडेल. अरे, तुला बाधक आहे, दुसऱ्यांना नाही. पण यांची भाषाच वाकडी, त्याचे काय?

बोलण्यामुळेच जग उभे राहिले आहे आणि बोलण्यामुळेच जग बंद पडेल.

या सुधारलेल्या घरांमध्ये–सभ्यलोकांकडे असभ्य वर्तनाची दु:खे नसतात तर असभ्य वाणीची दु:खे असतात. या लोकांच्या घरात काय दगड मारले जात असतील? नाही, वचनबाण मारतात. दगड मारणे चांगले की वाक्‌बाण मारणे चांगले?

**प्रश्नकर्ता :** दगड चांगले.

**दादाश्री :** आपल्याकडे लोक दगड पसंत करतात आणि जे जखमी करत नाही त्याला पसंत करीत नाहीत. लागल्यावर रक्त येते, झोबंते, डॉक्टरला सांगून त्यावर औषधोपचार करू शकतो, असे घाव तर भरून येतात. पण शब्दाचे घाव भरून येत नाहीत. पंधरा–पंधरा वर्षे झाली तरी तो घाव झोबंतच राहतो! त्याचे काय कारण आहे? तर हे स्वत:च बोलतो आहे, असे मानल्यामुळे. आम्ही गॅरंटी देतो की जीवमात्राची वाणी रेकॉर्ड आहे. ही आमचीसुद्धा रेकॉर्डच आहे ना! ही रेकॉर्ड वाजत असेल की 'चंदुलाल चांगला माणूस नाही, चांगला माणूस नाही.' तर तुम्हाला राग येईल का?

**प्रश्नकर्ता :** ती तर मशीन आहे ना?

**दादाश्री :** तर ही माणसे बोलतात तेसुद्धा टेपरेकॉर्डरच बोलत असते. तुमच्या शब्दांना 'रेकॉर्ड' मानाल आणि समोरच्याच्या शब्दाला देखील 'रेकॉर्ड' मानाल तरच सुटका होईल. हे जग जिंकण्याचा दुसरा कोणताच उपाय नाही. 'रेकॉर्ड' म्हटले की निर्दोष झालात!

अज्ञान दशेत असे वाटते की 'हा मला असे बोलतो, हे मला कसे सहन होईल?' तोपर्यंत रोग कमी होणार नाही. आपल्याला सहन करायचे नसतेच. फक्त समजून घेण्याची गरज आहे की ही रेकॉर्ड आहे. जर तुम्ही वाणीला रेकॉर्ड स्वरूप मानले नाही, तर तुमची वाणी तशीच निघेल. म्हणजेच कार्य–कारण, कार्य–कारण असे चालतच राहील.

वाणी तर पूर्ण थर्मामीटर आहे.

हे विज्ञान असे आहे की समाधान आणते. कोणी आपल्याला

रागावले, आपल्यावर हसले, तर आपणसुद्धा हसू लागतो कारण आपल्याला माहीत आहे की ही रेकॉर्ड अशी वाजते आहे. समोरचा कसा बोलू शकेल? कारण तो तर भोवरा आहे. या बिचाऱ्यांची तर दया आली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** एवढे त्यावेळी लक्षात येत नाही.

**दादाश्री :** प्रथम 'वाणी रेकॉर्ड आहे' हे निश्चित करा. वाणी रेकॉर्ड आहे, रेकॉर्ड आहे, रेकॉर्ड आहे... 'स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग आणि वाणीचे संयोग पर आहेत आणि पराधीन आहेत.' वाणी ही बोलणाऱ्याच्या हातातही नाही आणि ऐकणाऱ्याच्या हातातही नाही. वाणीचे संयोग पर आहेत आणि पराधीन आहेत. अशा उडत्या आतिशबाजीत कोण हात घालेल?

वार्तालाप करताना कोणतीही गोष्ट दोन मिनीटांपेक्षा जास्त खेचली तर भगवंत तिथून निघून जातात. वार्तालाप करण्यास हरकत नाही, पण त्या गोष्टी धरून ठेवायच्या नाही. धरून ठेवल्या की बोजा वाढत जातो.

## वाणी, हे अहंकाराचे स्वरूप

वाणी म्हणजे फक्त उघड अहंकार आहे. जे जे काही बोलतात, जेवढे बोलतात ते सर्वच उघड अहंकार आहे. फक्त 'ज्ञानी पुरुष' जी स्याद्वाद वाणी बोलतात, त्यावेळी त्यांचा अहंकार नसतो. पण ते जेव्हा दुसरे काही बोलतात तेव्हा त्यांचाही अहंकारच निघत असतो. त्याला जाणारा अहंकार, 'डिस्चार्ज' अहंकार म्हटले आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अहंकार नसलेली वाणी निघते ना?

**दादाश्री :** त्याला निर्जीव अहंकार म्हणतात. वाणीत सजीव अहंकार असेल तर ती वाणी समोरच्याला बोचेल. आमची वाणी निर्ममत्व आणि निर्‌अहंकारी असते, म्हणून सर्वांना आनंद होतो.

वाणीवरून किती प्रमाणात आणि कसा अहंकार चार्ज झाला होता ते कळते. स्याद्वादाशिवायचे जितकेही बोल आहेत तो सर्व अहंकारच

आहे. आचरणात तसा जास्त अहंकार दिसत नाही. तो तर कधी लग्नाला गेला असेल आणि छाती फुगली की दिसतो.

'मी कसा बोललो' हा वाणीचा परिग्रह आहे. 'मी बोलतो आहे' हे जे भान आहे, त्याने नवीन बीज पडते.

**प्रश्नकर्ता :** साहजिक वाणी म्हणजे काय?

**दादाश्री :** ज्यात किंचितमात्र अहंकार नसतो ती साहजिक वाणी. आम्ही या वाणीचे एक सेकंददेखील मालक होत नाही, म्हणून आमची वाणी साहजिक वाणी आहे.

आत्मा सचराचर आहे. सचरमध्ये तीन चर आहेत. आचार, विचार आणि उच्चार. हे तिन्ही जर नॉर्मेलिटीत असतील तर हरकत नाही. तिन्ही नॉर्मेलिटीत असतील तर माणसाचा सुगंध येतोच. माणसाची सर्वात मोठी परीक्षा कोणती? त्याच्या आचारावरून परीक्षा करू नका, त्याच्या विचारावरून परीक्षा करू नका, तर त्याच्या वाणीवरून परीक्षा करा!

## वीतराग वाणीशिवाय अन्य उपाय नाही

भगवंतांना कोणीतरी विचारले, 'मोक्ष मिळविण्यासाठी काय साधन आहे?' तेव्हा त्यांनी सांगितले, 'वीतराग वाणीशिवाय दुसरा कोणताच उपाय नाही.' त्या वाणीला सिद्ध वाणी म्हणतात, ती समोरच्या माणसात रुजते.

**प्रश्नकर्ता :** वीतराग वाणीचे प्रमाण काय?

**दादाश्री :** वीतराग वाणी म्हणजे जी प्रत्येक आत्म्याला मान्य होतेच, प्रत्येक धर्माचे लोक तिला मान्य करतात. फक्त आडमुठाच त्याला मान्य करीत नाही. वीतराग वाणी आत्मरंजन करणारी असते, दुसऱ्या सर्व वाणी मनोरंजन करतात. वीतराग वाणी ऐकल्याबरोबर अगदी नवीन वाटते, अपूर्व वाटते. अपूर्व म्हणजे पूर्वी कधीही न ऐकलेली, न वाचलेली, अशी वाणी. वीतराग वचन कशाला म्हणतात की जे वादी-प्रतिवादी दोघेही मान्य करतात. प्रतिवादी देखील मान्य करतो की 'गोष्ट तर खरी आहे, पण ती आम्हाला जमत नाही.'

## वाणीचे रेकॉर्डिंग

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणता की हे मी बोलत नाही, तर टेपरेकॉर्ड बोलतो आहे, तर ते कसे?

**दादाश्री :** त्याच्या गुणधर्मावरून. त्यात आत्म्याचे गुणधर्म नाहीत. पुद्गलाचेही गुणधर्म नाहीत. ती पुद्गलाची अवस्था आहे. वाणी अहंकाराच्या प्रेरणे टेप होते. अहंकार स्वतः ती टेप करीत नाही. पण त्याच्या प्रेरणेने टेप होते. आत अहंकार प्रेरणा देतो, कोर्टात असे बोलायचे आहे, तसे बोलायचे आहे वगैरे, त्यानंतर तशीच रेकॉर्ड वाजते.

**प्रश्नकर्ता :** आपली वाणी कधी टेप झाली असेल?

**दादाश्री :** मागील जन्मात झाली होती, ती या जन्मात बोलली जात आहे.

**प्रश्नकर्ता :** वाणी म्हणजे सूक्ष्मातून स्थूल झाले आहे का?

**दादाश्री :** हो, सूक्ष्मातून स्थूल झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** सुरुवातीला सूक्ष्म कुठून उत्पन्न झाले?

**दादाश्री :** तसे तर त्या स्थूलातून परत सूक्ष्म उत्पन्न होते. स्थूल असते त्यात राग-द्वेष झाल्यामुळे पुन्हा नवीन सूक्ष्म उत्पन्न होते. जर एकच जन्म वीतराग राहिला तर सर्व संपेल! पण परत बीज टाकतच राहतो.

**प्रश्नकर्ता :** आपण जे काही बोलता त्याला समाधी भाषा म्हणता येणार नाही का?

**दादाश्री :** तुम्हाला समाधी भाषा म्हणायचे असेल तर समाधी भाषा म्हणा, आणि स्याद्वाद म्हटलेत तर स्याद्वाद आहे. आमची भाषा कोणालाही दुःखदायक होत नाही, सुखदायकच होते प्रत्येकाला. ही वाणी आमच्या मालकीची नव्हेच. अहंकार पूर्णपणे शून्य झाला की रेकॉर्ड शुद्ध होते. आम्हाला ज्ञान झाल्यावर आमची रेकॉर्ड शुद्ध झाली.

**प्रश्नकर्ता :** वाणी रेकॉर्ड आहे, असे कोण केव्हा म्हणू शकतो?

**दादाश्री :** जेव्हा चेहऱ्यावर भावाभाव दिसत नाहीत, तेव्हा समजावे वाणीचा मालकपणा सुटला आणि तिथेच आपला 'अंत' येतो! (संपूर्ण बंधनमुक्त दशा)

## वाणीचा चार्ज पॉइंट

**प्रश्नकर्ता :** ही सारी 'डिस्चार्ज' टेप आहे, तर नवी टेप कशी बनवावी?

**दादाश्री :** तुम्ही हे सर्व बोलत आहात, त्याच्या मागे-मागे नवीन टेप बनत राहते. ती भावामुळे टेप होते. जसा आपला भाव असेल त्यानुसार टेप होऊन जाते. माझ्या बोलण्यातील भाव कसा आहे? 'मला तुमचा अपमान करायचा आहे' तर तसे टेप होईल, 'मान द्यायचा आहे आणि प्रेमाने वागायचे आहे' तर तसे टेप होईल. म्हणजे जसा भाव असेल तसे टेप होते.

**प्रश्नकर्ता :** भाव ठेवला तर नवीन तयार होते?

**दादाश्री :** हो, आणखी काय? भाव ठेवला की नवीन टेप होते. मग बदलायला जाल तरीही काही होणार नाही. वाणी हा पुद्‌गलचा धर्म नाही, ही औपचारिक वस्तू आहे. म्हणजे मागील जन्मातील जे भाव आहेत, गतभाव आहेत, ते आता आत उदयास येतात आणि त्यानुसारच टेप होऊन जाते आणि शब्द निघतात. हे काम फार वेगाने होते. हे ही आश्चर्यच आहे! ही जी वाणी निघते त्यात मूळ भाव नाहीत, गतभाव आहेत. गतभाव हे डिस्चार्ज भाव आहेत, आणि त्यानुसार वाणी निघते. म्हणजेच वाणी ही 'डिस्चार्ज'चाही 'डिस्चार्ज' आहे. आणि मन हे 'प्युअर' डिस्चार्ज आहे. 'डिस्चार्ज' भाव म्हणजे निर्जीव भाव.

**प्रश्नकर्ता :** वाणीची मूळ टेप कशी बनली?

**दादाश्री :** आत्म्याला परमाणूंचे संयोग भेटतात आणि तिथे चार्ज

होऊन जातात. आत्म्याच्या उपस्थितीत भावाभावाची स्पंदने होतात, त्यात अहंकार मिसळला की स्पंदने टेप होतात.

वाणीचे असे आहे की ती दोन व्ह्यू पॉइंटस् 'ॲट अ टाइम' (एकाच वेळी) सांगू शकत नाही. म्हणून ते व्यक्त करण्यासाठी दुसरे वाक्य दुसऱ्यावेळी बोलावेच लागते. 'दर्शन'मध्ये 'ॲट अ टाइम' समग्र प्रकाराने पाहता येते, पण त्याचे वर्णन करायचे असेल तर कोणीही 'ॲट अ टाइम' व्यक्त करू शकत नाही. म्हणून वाणी स्याद्‌वाद म्हणविली जाते.

मंत्र बोलणे स्थूल आहे. स्थूलचा फायदा मिळतो, पण मग सूक्ष्मात गेले पाहिजे. 'दादा भगवानांना नमस्कार करीत आहे' असे बोलल्यावर 'दादा' दिसले पाहिजेत, समोर फोटो नसूनही 'दादा' दिसले पाहिजेत. मग सूक्ष्मतममध्ये गेले पाहिजे, आणि सूक्ष्मतममध्ये तर लगेच फळ मिळते!

## जिथे प्रकट दिवा, तिथेच काम होते

आत्म्याला न जाणल्यामुळे हे सर्व जग खालच्या स्तरावर गेले आहे. हे चालते-फिरते दिसते, त्यामुळे ते असे मानतात की आत्म्याशिवाय काही चालणे शक्य नाही. पण ते ज्याला चेतन म्हणतात ते चेतन नसते. आम्ही त्याला 'निश्चेतन-चेतन' म्हणतो. ते खरे चेतन नाही, तर डिस्चार्ज चेतन आहे, चावी दिलेले चेतन आहे. खरे चेतन तर आत आहे, जे कायम स्थिर आहे आणि अचर आहे, आणि निश्चेतन-चेतन तर सचर आहे. म्हणून या जगाला सचराचर म्हटले आहे. ज्याचा विनाश होणार आहे ते सचर आणि जे कायम स्वरूपी आहे ते अचर.

म्हणून सर्व शास्त्रांमध्ये लिहिले आहे की आत्मज्ञान जाणा, पण आत्मज्ञान जाणता येईल असे नाही. ते तर पूर्वीपासून खूप खूप करत आला असेल तर प्रकट होते, किंवा मग कोणा 'ज्ञानी पुरुषा'कडून त्याला प्रकट होते! अन्यथा आत्मज्ञान जाणता येईल असे नाहीच. सर्व शास्त्रे समजून घेतली, तरी पण त्याने आत्मा जाणता येत नाही. कितीतरी

शास्त्रे पाठ असतात पण त्याने आत्मा जाणता येत नाही, जाणलाच तर शाब्दिकच जाणता येतो. ते कसे असते? तर 'आत्मा असा आहे, तसा आहे', असे फक्त बोलणे असते. अरे, तू असे म्हण ना की 'मी असा आहे, तसा आहे!' तर म्हणेल की 'नाही, मला असे कसे म्हणता येईल?' म्हणजे जो 'ते' रूप झाला असेल तोच बोलू शकतो की 'मी अनंत ज्ञानवाला आहे, अनंत दर्शनवाला आहे, अनंत शक्तीवाला आहे.' तुम्ही असे बोलता की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, बोलतो.

**दादाश्री :** कारण तुम्ही 'ते' रूप झाला आहात.

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी, आत्म्याची ओळख तर ज्याने आत्मा ओळखला आहे तोच करू शकतो ना? दुसरा कोणी करू शकत नाही ना?

**दादाश्री :** म्हणूनच म्हटले आहे ना की आत्मज्ञानीला देहधारी परमात्माच्या रूपात जाण. पूर्वीच्या ज्ञानींनी सांगून ठेवले आहे की 'ज्ञानी पुरुष' देहधारी रूपात परमात्मा आहेत, म्हणून त्यांच्याकडून (मोक्षाचे) काम करून घे. 'ज्ञानी पुरुषां'च्या आतच आत्मा प्रकट झालेला आहे, त्याला जाणले पाहिजे. तुला आत्मा जाणायचा असेल तर 'ज्ञानी पुरुषां'पाशी जा. अन्य कुठल्याही शास्त्रातला किंवा पुस्तकातला आत्मा चालणार नाही. पुस्तकात मेणबत्तीचे चित्र छापलेले असेल त्यामुळे मेणबत्ती कशी असते हे दिसते जरूर, पण त्याने प्रकाश पडत नाही. त्याने काहीही निष्पन्न होत नाही. आत्मा जाणण्यासाठी तर प्रत्यक्ष 'ज्ञानी पुरुषां'ची भेट व्हायला हवी, तरच काम होईल.

– **जय सच्चिदानंद**

## मूळ गुजराती शब्दांचे समानार्थी शब्द

*अटकण* : जी पुढे जाऊ देत नाही, अडकवून ठेवते
*अजंपा* : बैचेनी, अशांती, भीती
*आरा* : कालचक्राचा बारावा भाग
अबंध : बंधनरहित
*उपाधी* : बाहेरून येणारे दु:ख
*उपरी* : बॉस, वरिष्ठ, मालक
*कल्प* : कालचक्र
*कढापा* : कुढणे, क्लेश
*घेमराजी* : अत्यंत घमेंडी, स्वत: समोर दुसऱ्यांना तुच्छ मानणारा
*चीकट फाइल* : गाढ ऋणानुंबध असलेली व्यक्ती किंवा संयोग
*तंतीली वाणी* : विवादयुक्त, बोचणारी वाणी
*निकाल* : निपटारा
*पुद्‌गल* : जे पूरण आणि गलन होते
*पोतापणुं* : मी आहे आणि माझे आहे, असे आरोपण करणे
*भोगवटो* : सुख-दुखाचा परिणाम होणे
*राजीपो* : गुरुजनांची खुशी, प्रसन्नता
*शिल्लक* : जमापुंजी
*शाता-अशाता* : देहाचा सुख परिणाम-देहाचा दु:ख परिणाम
गच्छ : संप्रदायाचा एक वर्ग
आश्रव : कर्म उदयास येणे
*संवर* : कर्म चार्ज होण्याचे बंद होणे
अकाम निर्जरा : नवीन कर्मबंधन होऊन जुनी कर्मे अस्त होणे
संवरपूर्वक निर्जरा: पुन्हा कर्मबीज न टाकता कर्मफळ संपविणे
नोंद : अत्यंत राग किंवा द्वेषसहित दीर्घ काळापर्यंत लक्षात ठेवणे, नोंदून ठेवणे
*नियाणां* : आपले सारे पुण्य खर्चून फक्त एका ध्येयाची कामना करणे
*निर्जरा* : आत्मप्रदेशापासून कर्मांचे वेगळे होणे, कर्म अस्त होणे

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
10. भावना सुधारे जन्मोजन्म
11. कर्माचे विज्ञान
12. पाप-पुण्य
13. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
14. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
15. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
16. मानव धर्म
17. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
18. सेवा-परोपकार
19. दान
20. त्रिमंत्र
21. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
22. चमत्कार
23. सत्य-असत्याचे रहस्य
24. वाणी, व्यवहारात (सं)
25. पैशांचा व्यवहार (सं)
26. क्लेश रहित जीवन
27. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
28. प्रेम
29. गुरू-शिष्य
30. अहिंसा
31. आप्तवाणी-1 ते 4
35. आत्मसाक्षात्कार
36. जगत कर्ता कोण ?
37. कर्माचा सिद्धांत

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)
57. आप्तवाणी - 12 (पू)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

★ **दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

★ **प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

## संपर्क सूत्र


### दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन** : 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | : 9810098564 | **बेंगलूर** | : 9590979099 |
| **कोलकता** | : 9830080820 | **हैदराबाद** | : 9885058771 |
| **चेन्नई** | : 7200740000 | **पूणे** | : 7218473468 |
| **जयपुर** | : 8890357990 | **जलंधर** | : 9814063043 |
| **भोपाल** | : 6354602399 | **चंडीगढ** | : 9780732237 |
| **इन्दौर** | : 6354602400 | **कानपुर** | : 9452525981 |
| **रायपुर** | : 9329644433 | **सांगली** | : 9423870798 |
| **पटना** | : 7352723132 | **भुवनेश्वर** | : 8763073111 |
| **अमरावती** | : 9422915064 | **वाराणसी** | : 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229

**www.dadabhagwan.org**

## आप्तवाणी, किती क्रियाकारी!

ही 'ज्ञानी पुरुषां'ची वाणी आहे आणि ताजीच वाणी आहे. वर्तमान पर्याय आहेत, म्हणून ती वाचताच आपले सर्व पर्याय बदलत जातात आणि तसतसा आनंद उत्पन्न होत जातो. असे करता करता कोणाला आपोआपच समकित होऊन जाते! कारण ही वीतरागी वाणी आहे. राग-द्वेष रहित वाणी असेल तरच काम होते, नाहीतर काम होत नाही. महावीर भगवंतांची वीतराग वाणी होती, त्याचा परिणाम आजपर्यंत होत आहे. 2500 वर्षे झाली तरी देखील त्याचा परिणाम होतो, तर 'ज्ञानी पुरुषा'च्या वाणीचा देखील परिणाम होतो, दोन-चार पिढ्यांपर्यंत तर होतोच. वीतराग वाणीशिवाय, दुसरा कोणताच उपाय नाही, मोक्ष प्राप्त करण्यासाठी.

\- दादाश्री

आत्मविज्ञानी 'ए.एम.पटेल' यांच्या आत प्रकट झालेल्या

**दादा भगवानना**
**असीम जय जयकार हो**




Printed in India

Price ₹ 200



dadabhagwan.org